श्रीवासुदेवानन्दसरस्वतीग्रंथमाला

# तृतीयपुष्पम् ( ३ )

( १ सप्तशतीगुरुचरित्रसार, २ श्रीदत्तलीलामृताब्धिसार, ३ माघ-माहात्म्य, ४ स्त्रीशिक्षा, ५ प्राकृत मनन, ६ नवीन मिळालेलीं स्तोत्रें, ७ श्रीदीक्षितमहाराजकृतस्तोत्रादिसंग्रहः )

---


श्रीदत्तजयंती सोमवार १८७४. | दि. १ डिसेंबर १९५२

किंमत ५ रुपये

# प्रकाशकाचें निवेदन



नमः श्रीदत्तगुरवे हृद्रासोधौतिकारवे ।
स्वात्मज्योतिःप्रकाशाय सुखायानर्थशान्तये ॥ १ ॥

श्रीपरमेश्वरकृपेनें श्रीवासुदेवानन्दसरस्वतीग्रंथमालेचें तृतीयपुष्प आज प्रकाशित करण्याचा सुयोग येत आहे यामुळें अत्यंत आनंद वाटतो. श्रीमहाराजांचे सर्व ग्रंथ प्रकाशित करण्याचें हें महत्कार्य सुरू होऊन दोन वर्षें झालीं. इतक्या अल्पावधींत अनेक संतप्रेमी गुरुभक्तांच्या आत्मीयतापूर्वक मिळालेल्या साहाय्यामुळेंच ग्रंथमालेचे तीन खंड मंडळाला प्रकाशित करतां आले यांत संशय नाहीं. जवळ जवळ चौथा हिस्सा कार्य झालें असें समजण्यास हरकत नाहीं. पण आतां मंडळावर व साहाय्य करणाऱ्या सश्रद्ध जनतेवर 'प्रारब्धस्यान्तगमनम्' या सद्बुद्धिलक्षणास अनुसरून अवशिष्ट कार्य पार पाडण्याची मोठी जबाबदारी येऊन पडलेली आहे हें विसरून चालणार नाहीं. यापुढील राहिलेल्या सर्व ग्रंथांच्या मुद्रणकार्याकरितां पंचवीस हजार (२५०००) रुपये खर्च येईल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. याकरितां मंडळाचे प्रयत्न विशेष रूपानें चालू आहेत. ते सफल होण्याचे दृष्टीनें सर्वही पूर्वीच्या ग्राहकांनीं हस्तें परहस्तें मंडळास द्रव्यसाहाय्य मिळवून देण्याकडे अधिक लक्ष पुरवावें अशी विनंती आहे. श्रीमहाराजांचा जन्म शके १७७६ श्रावण कृष्ण पंचमी दिवशीं झाला. शके १८७६ श्रावण कृष्ण पंचमीस श्रीमहाराजांची शताब्दी पूर्ण होत आहे. तोंपर्यंत म्हणजे आजपासून दीड पावणे दोन वर्षांत हें ग्रंथप्रकाशनकार्य पूर्णतेस जावें अशी मंडळाची उत्कट इच्छा आहे. याकरितां, श्रद्धालु उदार धनिकांचें साहाय्य मिळविण्याचा मंडळाचा प्रयत्न चालू राहीलच. पण त्याबरोबरच ग्रंथमालेचे संपूर्ण बाराही खंड घेणारे ग्राहक निदान पांचशें तरी मंडळाला आज मिळवावयाचे आहेत. ग्रंथ मुद्रित झाले तरी ते योग्य ठिकाणीं पोंचविणें हेंही एक कर्तव्यच आहे. प्रत्येक खंडास पांच रुपये

किंमत ठेवलेली आहे. एकंदर बारा खंडांस साठ रुपये पडतील. पण सर्व खंड घेऊं इच्छिणाऱ्यांना पन्नास रुपयांत सर्व खंड द्यावेत असें मंडळानें ठरविलें आहे. तरी याप्रमाणें शक्य तितके ग्राहक मिळवून देण्याचा प्रयत्न सर्व गुरुभक्तांनीं करून निर्दिष्ट कालांत हें सत्कार्य पार पाडण्याचें श्रेय संपादन करावें. तशी सद्बुद्धि, सर्वांतर्यामी परमात्म्यानें सर्वांना देऊन हें कार्य या पुढेंही सर्वांचेकडून करवून घ्यावें अशी त्या प्रभूचे चरणाजवळ निरंतर प्रार्थना आहे.

प्रस्तुत खंडांत, सप्तशती गुरुचरित्र, श्रीदत्तलीलामृताब्धिसार, माघमाहात्म्य हे तीन ओवीबद्ध ग्रंथ व स्त्रीशिक्षा, प्राकृत मनन व आत्मचिन्तन हे तीन गद्यात्मक संवादरूप ग्रंथ आलेले आहेत. दुसरा ग्रंथ छापून झाल्यानंतर मिळालेली श्रीमहाराजांचीं कांहीं स्तोत्रेंही 'नवीन स्तोत्रें' या सदराखाली दिलेलीं आहेत. यापुढेंही मिळणारें स्तोत्रादिवाङ्मय पुढील खंडांत यथासंभव द्यावें लागणार आहे. सप्तशतीगुरुचरित्र म्हणजे सातशें ओव्यांत संपूर्ण गुरुचरित्र संक्षेपानें दिलेलें आहे. यांतही मूळ प्राकृत गुरुचरित्राप्रमाणें एकावन्न अध्याय केले आहेत. मूळ गुरुचरित्र हें ब्राह्मणांनीं स्नानसंध्या करून सोवळ्यांनी वाचण्याचा संप्रदाय सर्वत्र आहे. शिवाय त्यांतील ओवीसंख्याही बरीच आहे. करितां ज्यांना मूळ गुरुचरित्र वाचण्याची शक्यता नाही अशा सर्व स्त्रीपुरुषांनाही गुरुचरित्र वाचनाचें श्रेय मिळावें व त्यांचेकडूनही शास्त्रानुसारी वाङ्मय तप घडावें या उद्देशानें सप्तशतीगुरुचरित्र हा ग्रंथ श्रीमहाराजांनीं निर्माण केला असावा. यांत दुसरा एक चमत्कार असा दिसून येईल की, प्रत्येक ओवीतील तिसरें अक्षर क्रमानें वाचीत गेल्यास श्रीमद्भगवद्गीतेंतील पंधरावा अध्याय तयार होतो. म्हणजे या ग्रंथाचे वाचनानें पंधराव्या अध्यायाच्या पठणाचेंही श्रेय सहज मिळणारें आहे.

यानंतर या खंडांतील दुसरा ग्रंथ 'श्रीदत्तलीलामृताब्धिसार' हा एक सहस्र ओव्यांचा प्राकृत ग्रंथ आहे. 'श्रीदत्तपुराण' म्हणून सटीक संस्कृत ग्रंथ साडेतीन हजार श्लोकांचा श्रीमहाराजांनीं केलेला आहे. याचाच प्राकृत अनुवाद 'दत्तमाहात्म्य' हा पांच हजार ओव्यांचा ग्रंथ केलेला आहे व याचें सार म्हणून 'श्रीदत्तलीलामृताब्धिसार' हा ग्रंथ झालेला आहे.

'दत्तपुराण संस्कृत। माहात्म्य सार प्राकृत। ग्रंथत्रय रसभरित। वदवी दत्त वासुदेवमुखें॥' असें श्रीमहाराजांनींच याबद्दल सप्तशतीगुरुचरित्राचे शेवटीं म्हटलें आहे. या ग्रंथांत एकंदर दहा तरंग किंवा लहरी असून प्रत्येकांत शंभर ओव्या आहेत. यांतही कार्तवीर्यार्जुन, अलर्क, नहुष, यदु यांच्यावर श्रीदत्तराजांनीं केलेल्या अनुग्रहांचें वर्णन आलेलें आहे. 'अधिकार तैसा करूं उपदेश' अशी संतांची सुयोग्य दृष्टी सर्वत्र सारखी असते. यामुळें भिन्नभिन्न जीवांचें रुचिवैचित्र्य व मतिवैचित्र्य ओळखूनच संतांना जगत्कार्य करावें लागतें. आणि असें तें असतें म्हणूनच चिरकाल-पर्यंत सश्रद्ध जीवांना तें उद्धारक्षम ठरतें. कचाला जिवंत करण्याचें सामर्थ्य शुक्राचार्यांचे जवळ जसें होतें तसें त्याला कोणत्या ठिकाणीं कोणी मारलें हें ओळखण्याचें सामर्थ्यही त्यांचेचजवळ होतें. याप्रमाणें ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति या दोनही शक्तींनी संपन्न असणारे जीवन्मुक्त महात्मे जगत्कार्य स्वसुखनिरभिलाष होऊन करीत असतात म्हणूनच पतितांना पावन होण्याची आशा तरी आहे. या दृष्टीनें श्रीमहाराजांनीं संग्रहविस्तरा-त्मक असे विविध ग्रंथ करून ठेवले असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणजे याचा अर्थ असा नाहीं कीं, संस्कृतज्ञांनी श्रीमहाराजांचे प्राकृत ग्रंथ वाचण्याचें कारणच नाही. प्राकृत ग्रंथांतूनही शास्त्ररहस्य स्पष्ट करण्याची श्रीमहाराजांची शैली अपूर्व आहे. सप्तशतीगुरुचरित्राचे शेवटीं असलेली 'जय तत्त्वज्ञाननिदान। अनसूयात्रिनंदन। त्वत्पदपद्मावरून। पंचप्राण ओवाळीन' ही नुसती आरती जरी पाहिली तरी तेवढ्यावरूनच श्रीमहा-राजांच्या अंतःकरणांतील भगवत्प्रेम व साधकांनीं कसें व्हावें हें वर्णन करण्याची त्यांची अप्रतिम हातोटी सहृदय वाचकांच्या लक्षांत आल्या-वांचून राहणार नाहीं. भगवत्प्रेमानें संतांचें अंतःकरण ओथंबलेलें अस-ल्यानें, ज्या ज्या वेळी भगवद्गुणवर्णनाचा प्रसंग येईल त्या त्या वेळीं त्या दिव्य प्रेमरसाचा आविर्भाव त्यांच्या वाङ्मय कृतींत होत असतो. म्हणूनच या दृष्टीनें पाहिलें असतां केवळ पंडितांच्या वाङ्मयांत पुनरुक्ति हा दोष ठरत असला तरी भगवत्प्रेमप्रधान संतवाङ्मयांत तरी त्याला दोष समजणें उचित होणार नाहीं. श्रीकृष्णप्रभु हस्तिनापुराहून द्वारकेंत आले ही बातमी कळल्याबरोबर त्यांना पहाण्याकरितां हजारों लोक रस्तोरस्तीं

धांवून आले. कारण अत्यंत प्रेम ज्या वस्तूवर असतें ती वस्तु त्या प्रेमामुळें प्रत्येक वेळी नवीनच वाटत असते. हेंच वर्णन माघ कवीनें पुढील श्लोकांत केलें आहे—'दिदृक्षमाणाः प्रतिरथ्यमीयुर्मुरारिमारादनघं जनौघाः। अनेकशः संस्तुतमप्यनल्पा नवं नवं प्रीतिरहो करोति ॥' अशा प्रेममय भूमिकेवरून श्रीमहाराजांकडून संग्रहविस्तरात्मक विविध ग्रंथ निर्माण झाले असावेत असेंही, त्यांचे ग्रंथाकडे या दृष्टीनें पाहिलें असतां सर्वांना कळून येईल. तिसरी एक दृष्टी अशी कीं, 'जे जें भेटिजे भूत। तें तें मानिजे भगवंत' या उक्तीप्रमाणें श्रीमहाराजांनीं विविध प्रकृतिरूपानें नटलेल्या विश्वात्म्याची, प्राकृत, संस्कृत विविध ग्रंथरूपानें सेवाच केली आहे असेंही समजण्यास हरकत नाहीं. कोणाला अल्प ग्रंथ आवडेल तर कोणाला मोठा पसंत पडेल. कोणाला संस्कृत ग्रंथ वाचणें शक्य व आनंददायक होईल तर कोणाला प्राकृत ग्रंथ वाचनच तसें वाटेल. अशा विश्वरूपी श्रीहरीला त्या त्या अपेक्षित प्रकारांनी संतुष्ट करणें हें फार मोठें ईश्वरपूजन आहे. हें एक 'किंबहुना चराचर। आपणचि जाहला' अशा पूर्ण स्थितीला पोंचलेला ब्रह्मनिष्ठ पुरुषच करूं शकेल. इतरांस तें केव्हांही शक्य नाहीं. परमात्माच विश्वरूपानें नटलेला आहे. 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हें ज्ञानच होणें अत्यंत कठीण आहे. त्याच्यानंतर तसें आचरण. श्रीकृष्णप्रभूंचे संवगडी आणि वासरें ब्रह्मदेवांनी उचलून नेली व ते श्रीहरीची परीक्षा पाहूं लागले, त्या वेळी त्या अनंतशक्तिसंपन्न प्रभूनें सर्व रूपें आपणच धारण केलीं हें वर्णन श्रीशुकमुनींनी पुढील श्लोकांत फारच बहारीनें केलें आहे—'यावद्वत्सपवत्सकाल्पकवपुर्यावत्कराङ्घ्र्यादिकं यावद्यष्टिविषाणवेणुदलशिग्यावद्विभूषाम्बरम्। यावच्छीलगुणाभिधाकृतिवयो यावद्विहारादिकं सर्वं विष्णुमयं गिरोऽङ्गवदजः सर्वस्वरूपो बभौ ॥' ते गोपाल, तीं वासरें जशीं होतीं; त्यांच्या हातांतील काठ्या, वाद्यें, शिदोऱ्या वगैरे जितक्या वस्तु होत्या, इतकेंच नव्हे तर त्या प्रत्येकांचे जसे स्वभाव, गुण होते तशीं सर्व स्वरूपें त्या वेळी गोपालनंदनानें धारण केली. हें श्रीहरीचें विविधरूप कांहीं कालपर्यंत ब्रह्मदेवांनासुद्धां ओळखूं आलें नाहीं. मग इतरांची कथा काय ! म्हणूनच ब्रह्मदेवांनींच याबद्दल निर्णय दिला आहे की—'तथापि भूमन् महिमागुणस्य ते विबोध्दुमर्हत्यमलान्तरात्मभिः'—हे सर्वरूपी परमेश्वरा !

तुझा खरा महिमा शुद्धचित्त झालेले पुरुषच जाणूं शकतील. असो. वरील सर्व विवेचनाचें तात्पर्य हेंच कीं, श्रीमहाराजांच्या ग्रंथांचें जसें जसें परिशीलन होत जाईल तसें तसें त्यांचे, पूर्ण ज्ञान, उत्तम भगवद्भक्ति, विश्वात्मभाव, अकर्त्रात्मता इत्यादि अनेक लोकोत्तर गुण निदर्शनास आल्यावांचून राहाणार नाहींत. 'कर्ता करविता दत्त। वासुदेव निमित्त येथ। तत्पदीं अर्पिला हा ग्रंथ। तोच येथ आदिमध्यांतीं ॥' (स. गु. च.) 'गुरु तूंची देव तूंची। हेचि भक्ति करी साची। मनीं नाणीं मी भेदाची। कच्ची वार्ता ॥ रूप तुझें हेंचि जग। कोणाही न दे उद्वेग। नमीं सर्वां तेणें व्यंग। सांग होयी ॥' इत्यादि ओव्या पाहिल्या म्हणजे हें सर्व लक्षांत येईल.

या खंडांतील तिसरा ग्रंथ 'माघमाहात्म्य' हा श्रीदत्त व सहस्रार्जुन यांचा संवादरूप लहानसाच आहे. श्रीदत्तात्रेयांच्या दर्शनास एकदा अर्जुन गेला असतां श्रीदत्त मोठ्या पहाटें उठून माघस्नान करीत असलेले पाहून अर्जुनानें देहरक्षणाची आवश्यकता वर्णन केली व अशा थंडीच्या वेळीं माघस्नान करणें बरोबर नाहीं असें सांगितलें. त्यावेळीं त्याला श्रीदत्तप्रभूनीं शास्त्रविहित कर्मांचें महत्त्व युक्तीनें पटवून दिलें आहे. ज्ञानानेंच मोक्ष मिळतो हें खरें पण तें ज्ञान पापी माणसाला उत्पन्न होत नाहीं म्हणून त्या पापांचा नाश व्हावा व झालेलें ज्ञान चांगलें ठसावें याकरितांच शास्त्रानें कर्मादि साधनें सांगितलीं आहेत. त्यांतही यज्ञयागादि कर्में सर्वांना करतां येणें अशक्य म्हणून तीर्थस्नानासारखीं विशिष्ट कर्में कोणालाही केव्हांही करतां येण्यासारखीं शास्त्रानें सांगितलीं आहेत. प्रपंचाकरितां देहाला कितीही कष्ट पडले तरी माणसाला कांही वाटत नाहीं. मग शास्त्राधार घेऊन पुण्यकर्म करीत असतां कांही कष्ट झाले म्हणून काय हरकत आहे ? यामुळें ईश्वराचा क्षोभ तरी होणार नाहीं; इत्यादि शास्त्ररहस्य श्रीमहाराजांनीं आपल्या अधिकारी वाणीनें सडेतोडपणानें व्यक्त केलें आहे. याबद्दल त्यांच्या मननीय व संदेह दूर करणाऱ्या कांहीं ओव्या पुढीलप्रमाणें आहेत—'टाळावया विषयाशा। वेद योजी युक्ती अशा। सद्धर्में क्षाळुनी दुराशा। क्रमें पाशा तोडवितो ॥ १ ॥ यज्ञादिक धीशुद्ध्यर्थ। योजिले ते यथार्थ। न घडती त्याला हा स्वार्थ। दावी समर्थ वेदराज ॥ २ ॥'

‘ मनुष्यें स्वदेहपीडन । व्यर्थ न कीजे साच जाण । शास्त्राधारें करितां कोण । अकारण वदेल तें ॥ ’ ‘ ज्ञानेंच मोक्ष होतो खास । परंतु तें न पापियास । लाभे म्हणोनि पापऱ्हास । शास्त्र खास करवी असे ॥ १ ॥ न होतां पापक्षालन । न लाभे ज्ञानसाधन । साधनाविना न ठसे ज्ञान । म्हणोन योजी शास्त्र हें ॥ २ ॥ प्रकृति प्राक्तन चेष्टा करवी । ह्या सद्धर्मे तिला बरवी । वळवितां मोक्षपदवी । अचूक पाविजे न कष्टें ॥ ३ ॥ दारपुत्रादिकांकरितां । देहा कष्टविती त्या परता । शास्त्राधारें पुण्य करितां । ईशक्षोभता न घडे ॥ ४ ॥ ’ अशा अनेक ओव्या दाखवितां येतील. जसें जसें श्रीमहाराजांच्या ग्रंथांचें परिशीलन श्रद्धेनें व तीव्र जिज्ञासेनें केलें जाईल तसें तसें ‘ घृष्टं घृष्टं पुनरपि पुनश्चन्दनं चारुगन्धं ’ या उक्तीप्रमाणें अधिकारी जनांना, शास्त्रविहित मार्गाचें निश्चित ज्ञान होऊन ते सहज कृतार्थ होतील यांत मुळीच संशय नाही.

‘ माघमहात्म्य ’ या ग्रंथांत प्रत्येक ओवीचें आद्याक्षर वाचीत गेल्यास श्रीदत्तमालामंत्र तयार होतो. या मंत्राचा पाठही या ग्रंथाचे पठणाबरोबर साहजिकच साधकांना घडतो. मंत्रशास्त्रांतील नियमाप्रमाणें सर्वांनाच सर्व मंत्रांचा अधिकार संभवनीय नाही. त्रिपादगायत्रीमंत्राचाच अधिकार द्विजांना आहे. पण त्या गृहस्थांना चतुर्थपादाचा अधिकार नाहीं. केवल प्रणवजपाचा अधिकार संन्याशांना आहे तर तो तसा गृहस्थांना नाही. त्यांना तो इतर मंत्रांना जोडूनच जपावा लागतो. पण आपणांकडून कांहीं साधन घडावें व ते साक्षात् श्रुतिमंत्रपठनादि रूपानें व्हावें अशी आज पुष्कळ धर्मश्रद्धालु लोकांचीही मनःप्रवृत्ति दिसून येते. त्यांचीही मनीषा पूर्ण होऊन त्यांना त्या कर्माचें शास्त्रोक्त फलही मिळावें या सदिच्छेनें श्रीमहाराजांचे कडून अशा मंत्रगर्भ स्तोत्रांची, ग्रंथांची रचना झाली असावी. एखादा जितरस पुरुष नुसतें एरंडेल तेलही मधाप्रमाणें चाटून खाऊं शकतो. पण त्याच तेलाचा एखाद्याला वासही सहन होत नाही. मग त्याला तें एरंडेल दुसऱ्या कशांत तरी मिसळूनच घ्यावें लागतें. याप्रमाणें येथें तर श्रीमहाराजांच्या ग्रंथांत–प्रतिपाद्य, परमात्मा किंवा त्याच्या प्राप्तीचें शास्त्रोक्त साधन, प्रतिपादन करणारी श्रीमहाराजांची दिव्यवाणी, ती अशी कीं जिचें वर्णन ‘ सत्यवादाचें तप । माझ्या वाचें केलें कोटी कल्प ’ या

श्रीज्ञानराजांच्या शब्दांतच करतां येईल. आणि त्या वाणींतही साक्षात् परमात्मप्रतीक असणारे महामंत्र ग्रथित केले गेलेले असा खरोखर त्रिवेणी संगमच झालेला असल्यानें, ही भावना ठेवून श्रीमहाराजांच्या ग्रंथांचें परिशीलन करणाऱ्या साधकांना 'याचि देही याचि डोळा' अशी इष्टफलाची सिद्धि होणार नाहीं काय ? खात्रीनें होईलच होईल.

स्त्रीशिक्षा व प्राकृत मनन हे दोन संवादात्मक ग्रंथ या खंडांत माघ-माहात्म्यानंतर दिलेले आहेत. हे ग्रंथ वेदान्तशास्त्रांतील प्रमेयें सुलभ रीतीनें समजण्यास अत्यंत उपयोगी पडणारे आहेत. थोडक्यांत मराठी भाषेमध्यें या ग्रंथांतून श्रीमहाराजांनी वेदान्ताचें सर्व सार आणलें आहे. श्रीमहाराजांचे बरेच ग्रंथ संस्कृत भाषेंतच लिहिलेले आहेत. तथापि सामान्य जनांकरितां मराठी भाषेंतही त्यांचे ग्रंथ आहेत. मराठी भाषेंत ग्रंथ करण्याचें कारण श्रीमहाराजांनी एके ठिकाणी सांगितलें आहे.—:— 'त्रेधा पापतापहर ! त्याणें केला जो सादर । कार्तवीर्या बोध रुचिर । भाषांतर करूं त्याचें ॥ १ ॥ या भाषेची प्रौढि आज । लोकां असे प्रायः मज । धीप्रेरकें दिधला उमज । निजगुज समजावया ॥ २ ॥' (मा. मा) याप्रमाणें लोकांची अपेक्षा व योग्यता ओळखूनच ज्ञानी पुरुषांचा व्यवहार होत असतो हें सिद्ध झालें.

या खंडाचे शेवटीं श्रीमहाराजांचे एकनिष्ठ प्रियशिष्य श्री. प. प. नृसिंहसरस्वती दीक्षितस्वामिमहाराज यांनी केलेली संस्कृत, प्राकृत स्तोत्रें, आरत्या, पदें हा संग्रह मिळाला तितका दिलेला आहे व शेवटीं त्यांचाच गुरुशिष्यसंवाद दिलेला आहे. श्रीभगवंतांनी अर्जुनाला ज्ञानप्राप्तीचे उपाय 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया' या श्लोकांत तीन सांगितले आहेत. त्यांपैकी परिप्रश्न म्हणजे संतांच्या जवळ वेदान्तादि संदिग्ध विषयावर चर्चा करणें हा एक महत्त्वाचा उपाय आहे. तो उपाय अवलंबून 'गुरुशिष्य-संवाद' हा ग्रंथ तयार झालेला आहे. याची थोडक्यांत हकीकत अशी समजते कीं—श्रीदीक्षितमहाराज नरसोबावाडीहून तीर्थयात्रा करण्याकरितां निघाले असतां त्यांचा मुक्काम सांगलीस ज्यावेळीं झाला त्यावेळीं त्यांचेकडे अनेक जिज्ञासू मंडळींनीं येऊन जे प्रश्न विचारले व त्यांची उत्तरें जीं महाराजांनीं दिली ती प्रश्नोत्तरें संकलित करून लिहिलेला असा हा ग्रंथ

आहे. श्रीमहाराजांच्या संपूर्ण ग्रंथांचें प्रकाशन करण्याकरितां स्थापन झालेल्या मंडळातर्फे हें आणखी दुसरे ग्रंथ प्रकाशित करण्याचें कारण काय अशी शंका वाचकांना कदाचित् येईल. याकरितां मंडळाचे प्रधान उद्देश काय आहेत याबद्दल थोडें विवेचन करणें अप्रासंगिक ठरणार नाही.

प्रस्तुत चालू असलेलें मंडळाचें कार्य हें, श्रीमहाराजांची सांप्रत चालू असलेली संप्रदायपरंपरा अविच्छिन्न चालू राहण्याचे दृष्टीनें विशेष पोषक असल्यानें तें मंडळानें प्रथम करण्याचें ठरविलें आहे. धर्मरक्षणाकरितांच संतांचेही अवतार होत असतात. धर्माचें रक्षण याचा अर्थ, त्याचें निश्चित खरें ज्ञान व त्याप्रमाणें प्रत्यक्ष आचरण हाच होय. अधिकारी पुरुषांच्या ग्रंथांवरून लोकांना धर्माचें निश्चित ज्ञान होऊं शकेल. पण त्याप्रमाणें वागणें हा भाग शिल्लक राहातोच. संतांच्या प्रत्यक्ष उपस्थितीत त्यांच्या असामान्य व्यक्तिमत्त्वामुळें पुष्कळ लोक स्वधर्माचरणाकडे प्रवृत्त होणें शक्य आहे. पण त्यांच्या पाठीमागें औदासीन्य, बुद्धिभेद इत्यादि अनेक कारणांनी समाजांतील धर्माचरणांत पुष्कळ शैथिल्य उत्पन्न होतें. तें दूर करण्याचाही यावच्छक्य प्रयत्न करणें हीही एक गुरुसेवा व्यवहारी माणसांना करतां येण्यासारखी आहे. याकरितां श्रीमहाराजांच्या परंपरेंतील ज्या ज्या प्रांतांत जी जी देवस्थानें आहेत त्या त्या स्थानांतील व्यवस्थापकांशी सहकार्य करून व परस्पर विचार विनिमय करून त्या त्या स्थानांची उत्तम उर्जितावस्था आणण्याचा व राखण्याचा विशेष प्रयत्न करणें हेंही एक सर्व सांप्रदायिकांचें व संतप्रेमी लोकांचें मुख्य कर्तव्य आहे. तीं तीं संतांनी स्थापन केलेली स्थानें म्हणजे, साधकांना सर्व तापांतून मुक्त करणारे दवाखानेच आहेत. प्रत्येक गांवांत सर्व उपकरणांनी युक्त असा दवाखाना असणें शक्य नाहीं. म्हणून तशा विशिष्ट रोग्यांना कोठल्यातरी शहरांतील मोठ्या दवाखान्यांत राहून औषध घ्यावें लागतें. त्याप्रमाणें संतांनी ज्या ठिकाणी आपली दिव्यशक्ति ठेवली आहे, त्या स्थानांतील ती दिव्यशक्ति नित्य जागृत ठेवण्याकरितां, ज्यांच्याकरितां ती शक्ति संतांनी ठेवली त्यांनी प्रयत्न करणें हें त्यांचें कृतज्ञता व्यक्त करणारें कर्तव्य नाही काय ? याप्रमाणें त्या त्या स्थानांचा उत्कर्ष व श्रीमहाराजांनीं ग्रंथांतून प्रतिपादन केलेल्या शास्त्रोक्त साधनांचा प्रचार

आणि त्याबरोबरच आपल्या भारतीय विशुद्ध संस्कृतीच्या रक्षणार्थ वेद-शास्त्रांच्या अध्ययनाध्यापनाची परंपराही अबाधित चालण्याकरितां प्रयत्न करणें असे फार मोठे उद्देश मंडळाचे आज अमूर्तावस्थेंत आहेत. त्याचें एक महत्त्वाचें अंग म्हणून आज हें ग्रंथप्रकाशन कार्य सुरू आहे. त्याचेच बरोबर श्रीमहाराजांच्या संप्रदायांतील प्रसिद्ध अशा व्यक्तींचें कांहीं मिळेल तें वाङ्मय थोडें थोडें प्रकाशित करणें, त्या त्या व्यक्तींनीं गुरुसंप्रदायाच्या प्रचारार्थ स्थापन केलेल्या स्थानांची संपूर्ण माहिती देणें हेंही कार्य श्रीमहाराजांच्या ग्रंथ-प्रकाशनाबरोबरच थोडें थोडें होणें उचित आहे असें मंडळास वाटतें. या दृष्टीनें श्रीदीक्षितमहाराजांचें वाङ्मय या खंडाचे शेवटीं जोडलें आहे. दुसराही एक उद्देश हें वाङ्मय देण्याचा आहे तो असा—श्रीदीक्षितमहाराज हे श्रीमहाराजांचे एकनिष्ठ भक्त होते. यांची गुरुभक्ति अत्यंत वाखाणण्याजोगी होती. यांच्यावर श्रीमहाराजांचें प्रेमही अप्रतिम होतें. कोणताही नवीन ग्रंथ लिहून झाला की लेखी मूळ प्रत श्रीदीक्षितमहाराजांकडे श्रीमहाराज पाठवून देत असत. ‘ आसुप्तेरामृतेः कालं नयेद्वेदान्तचिंतया ’ या उक्तीप्रमाणें श्रीदीक्षितमहाराजांनी अहर्निश श्रीमहाराजांच्या ग्रंथांचेंच चिंतन केलें. त्यामुळें त्यांच्या ठिकाणी जी अप्रतिम ज्ञानशक्ति निर्माण झाली ती लोकांच्या निदर्शनास यावी व श्रीगुरुमहाराजांच्या ग्रंथांत काय काय ज्ञान भरलेलें आहे, हें तशा अधिकारी व्यक्तीकडून कळून यावें, या उद्देशानेंही श्रीदीक्षितमहाराजांचें वाङ्मय छापलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे श्रीदीक्षितमहाराजांचें वाङ्मय हें श्रीमहाराजांच्या ग्रंथार्थांचें यथायोग्य आविष्करण करणारे टीका-ग्रंथच होत.

श्रीदीक्षितमहाराजांचें वाङ्मय, मंडळांतील भूतपूर्व घटक कोल्हापूर येथील रहिवासी महान् गुरुभक्त कैलासवासी हरी गणेश कडेकर यांनीं दिल्यामुळें तें प्रकाशित करण्याचा सुयोग मंडळास आला. बिचारे हरिभाऊ हें कार्य पूर्ण झालेले पाहाण्यास आणखी कांहीं दिवस तरी राहिले नाहींत ही खेदाची गोष्ट आहे. त्यांच्या झालेल्या साहाय्याबद्दल मंडळ त्यांचे सदैव ऋणी आहे.

आतां एकाच गोष्टीचें स्पष्टीकरण करावयाचें आहे तें असें कीं-श्रीमहाराजांच्या ग्रंथांचे संपूर्ण १२ खंड घेणारांना ५० रुपयांत ते सर्व खंड देतां येतील असें मंडळानें ठरविलें आहे. हें वाचून यापेक्षां अधिक देणगी देणाऱ्यांना कदाचित् असें वाटण्याचा संभव आहे कीं, आमच्याकडून अधिक देणगी कां घेतली ? तर याबद्दलचा खुलासा पुढीलप्रमाणें आम्ही करीत आहों. तो वाचून सर्वांनी निःशंक होऊन शक्यतेप्रमाणें यापेक्षांही अधिक साहाय्य करण्यास प्रवृत्त व्हावें अशी विनंति आहे. मंडळास ५० रुपयांपर्यंत देणगी देणारे फक्त **ग्राहक** समजले जातील. त्यांना संकल्पाप्रमाणें १२ खंड पोचविल्यानंतर त्यांच्या व्यावहारिक ऋणांतून मंडळाला आपण मोकळे झालों असें समजतां येईल; परंतु ५० पेक्षां अधिक देणगी देणारे हे मंडळाचे **प्रतिपालक** म्हणून समजलेले आहेत. त्यांचा संबंध मंडळाचे वर वर्णन केलेले अमूर्त उद्देश यशस्वी होईपर्यंत अविच्छिन्न राहाणारच आहे. उलट वरील उद्देश मंडळांकडून पार पडावेत याकरितां मंडळाकडे अधिकाधिक लक्ष देऊन त्याचें सर्वस्वीं प्रतिपालन करण्याची जबाबदारी मंडळानें या देणगीदारांवरच टाकली असल्यानें यांच्या ऋणांतून मंडळाला मुक्त होतां येणार नाहीं हें वास्तव सत्य या ठिकाणीं नमूद करण्यास संकोच वाटत नाहीं. मंडळांतील सर्व सद्गृहस्थ ' अंतःप्रच्छन्नपापानां शास्ता वैवस्वतो यमः ' या वचनावर पूर्ण विश्वास ठेवूनच ही श्रीगुरुसेवा करीत असल्यानें, त्यांना आपण देत असलेल्या देणगीचा योग्य विनियोग होईल की नाही याबद्दल देणगीदारांनींही साशंक होण्यांचें कारण नाही. ' इन्द्रोपि लघुतां याति स्वयं प्रख्यापितैर्गुणैः ' अशी शास्त्राज्ञा असूनही आधुनिककालाच्या विपरीत व्यवहाराला अनुसरून मंडळाचें हृद्गत मंडळालाच उघडें करावें लागलें. मंडळाचे विनंतीस मान देऊन इचलकरंजी येथील लोकप्रिय पुढारी श्रीज्ञानेश्वरभक्त श्री. कल्याण श्रीपाद ऊर्फ आण्णासाहेब कुलकर्णी यांनीं या खंडावर हृदयंगम अशी प्रस्तावना लिहून दिली याबद्दल आम्ही त्यांचे

अत्यंत आभारी आहोंत. तसेंच इतरही देणगीदारांचे व या कार्याच्या प्रचारार्थ झटणाऱ्या सर्वही स्त्रीपुरुषांचे आम्ही ऋणी आहोंत. हा खंड व्यवस्थित छापून दिल्याबद्दल समर्थ भारत प्रेसचे मालक श्री. सरदेसाई यांना मनःपूर्वक धन्यवाद. या पुढीलही सर्व प्रकाशन सर्वांतर्यामी सर्व सत्ताधीशाच्या कृपेनें लवकरच निर्विघ्नपणें पार पडावें हीच शेवटीं श्रीगुरुचरणाजवळ अखंड प्रार्थना आहे.

श्रीगुरुभक्त

श्रीदत्तजयंती १८७४ सोमवार

**वामन दत्तात्रेय गुळवणी**

नाराणपेठ २० पुणें २

---

॥ श्रीलक्ष्मीनृसिंह प्रसन्न ॥

# प्रस्तावना



चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन।
ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे होतु ॥ श्रीज्ञानेश्वर.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वरील उक्तीप्रमाणें श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदस्वरस्वती स्वामिमहाराज हे वाङ्मयीन मूर्तीनें विचारी जीवांना आनंदस्थान होऊन राहिले आहेत. संत हे चालते बोलते कल्पतरूंचे बाग, जिवंत चिंतामणीचे गांव किंवा अमृताचे चालते बोलते समुद्रच होत. हें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें संतवर्णन श्रीटेंबेमहाराज यांनाही यथार्थ लागू पडत आहे. येथील हरिदासवर्य कै. वासुदेव गणेश पलुसकर यांनीं लिहिलेल्या महाराजांच्या आर्याबद्ध चरित्रास शके १८४३ च्या नृसिहजयंतीस प्रस्तावना लिहिण्याचा सुयोग आला होता. त्यानंतर पुनः आज स्वामीमहाराजांच्या ग्रंथप्रकाशनमंडळाच्या आज्ञेप्रमाणें महाराजांच्या वाङ्मय सागराशीं प्रस्तावना सरितेचा अत्यंत आनंददायक संबंध येत आहे हेंही मी माझें सद्भाग्यच समजतों.

शरद् इंदुसारखा संत वाङ्मयाचा धवल यशोध्वज गेलीं सहाशें वर्षे अवघ्या महाराष्ट्रांत फडकत राहिला आहे. अवघ्या महाराष्ट्राचें वातावरण साधुसंतांच्या नामघोषांनीं दुमदुमून गेलें आहे. शेकडों मैल त्यांच्या पालख्या मिरवल्या जात आहेत. असें म्हणतात कीं इंग्लंडमध्यें कोणत्याही स्थानापासून ७० मैल दूर गेलें कीं समुद्रदर्शन घडतें. त्याचप्रमाणें आपण असें म्हणूं कीं महाराष्ट्रांत कोणत्याही स्थानापासून पंचवीस तीस मैल दूर गेले कीं एखाद्या संत-समाधीचें दर्शन होतें. आधुनिक कालांत महाराष्ट्रांतली संतांची ही परंपरा ज्यांनीं प्रामुख्यानें टिकवून धरली त्यांत श्रीवासुदेवानंदसरस्वतींचें स्थान अग्रभागीं आहे. संत आणि संतवाङ्मय यांनीं गेलीं सहाशें वर्षे आपल्या जीवनांत जें मानाचें स्थान पटकावलें आहे तें अनन्य-

साधारण होय. या संतांनी मोक्षकल्पनेवर चढलेलीं रूढींची पुटें पार झाडून टाकलीं, आणि मोक्षासाठीं ईश्वराचें नामस्मरण हा साधा आणि सोपा मार्ग जनतेला दाखविला. नामभक्तीचा संदेश त्यांनीं घरोघर पोंचविला असेंच नव्हे तर साधुसंतांच्यामुळेंच परमेश्वराची मूर्ति आणि कीर्ति या गोष्टी वाढीला लागल्या असंच म्हणणं भाग आहे. " भक्त प्रसिद्ध झाले ज्ञानेश्वर नाथ नामदेव तुका। म्हणुनी विठ्ठल नामा रूपाचा गजर जाहला इतुका ॥" भगवद्भक्त पांगारकरांनीं भक्तीचे वसंत जे संत त्यांचा केलेला हा गौरव अगदीं यथार्थ होय. ईश्वरभक्तीमुळें दुबळी मनोवृत्ती तर नष्ट झालीच, शिवाय जीवनांत समतोलता आली, व्यवहारांत पावित्र्य आणि जीवनांत स्वास्थ्य आलं. एजल्सनं म्हटल्याप्रमाणें ईश्वराच्या कल्पनेचं साधुसंतांनी लौकिकीकरण केलें हें त्यांचें सर्वांत मोठं कार्य होय.

संत केवळ बोलघेवडे नव्हते. पुराणांतली वांगी त्यांनी पुराणांतच ठेवली नाहीत तर ती स्वतःच्या जीवनांत उतरून दाखविलीं. त्यांच्या पवित्र जीवनांतच त्यांच्या यशाचीं बीजें रुजलेली आहेत. आधी केलें मग सांगितलें असा त्यांचा बाणा असल्यामुळें त्यांनीं सांगितलेल्या तत्त्वांचें आचरण करणं लोकांना फार सुलभ वाटल. तत्त्व आणि व्यवहार यांची दुर्मिळ सांगड संतजीवनांत आपल्याला पाहायला सांपडते. जागोजागीं असे जिवंत आदर्श निर्माण जाहल्यामुळें समाजांत सद्‌गुण नि सद्विचार यांचा सुगंध दरवळूं लागला. शुचिता, बंधुता, संयमशीलता, नम्रता, निर्भयता अशा शत गुणांनी संतचरित्रें नटलेली आहेत. श्रीस्वामीमहाराजांचें जीवनही याच उज्वल परंपरेंतलें आहे. महाराजांचें वैराग्य, त्यांची तपस्या, ईश्वरनिष्ठा स्मरणशक्ति, विद्वत्ता, चारित्र्य इतकें प्रखर नि तेजस्वी होतें की त्यांना लोक साक्षात् दत्तावतार असेच मानूं लागले. चराचर सृष्टींत जगन्नियामकांकडे कृतज्ञताबुद्धीनें मागें वळून पाहाण्याची शक्ति मानवी मनांतच दिसून येते; परंतु त्या शक्तीचा योग्य उपयोग करणारे महाराजांच्या सारखे संतच जगद्वंद्य ठरत असतात. सद्‌गुणसंवर्धनानें या जगांत शांतिसुखाची समृद्धि आजपर्यंत संतांनीच केली आहे. आत्मज्ञानानें महाराज कृतार्थ झाले होते, पण " नारायण असे विश्वी। त्याची पूजा करीत जावी।, किंवा " विरक्तें असावें जगमित्र " हाच त्यांचा

आग्रह होता. म्हणूनच संसारी जीवांच्या शांतिसुखाकरितां ते उपनिषदादि वाङ्मयरूपी ज्ञानजलाचा वर्षाव करीत असत. त्याप्रमाणेंच लोकांच्या शांतिसुखाकरितां मंत्रतंत्र व औषधादि व्यावहारिक प्रयत्नांनींहि अहर्निश झटत असत. यामुळेंच त्रिविध तापानें संतप्त झालेल्या जीवरूपी चातकांना महाराज हे शांतिजलानें पूर्ण असलेला मेघच वाटत. ज्ञानप्राप्तीनंतर प्रारब्धानुसार कोणतेंही कर्म घडल्यास तें सिद्धांना बाधक होत नाहीं हा वेदान्तशास्त्राचा सिद्धांत महाराजांच्या आचारांतून अबाधित प्रात्यक्षिक रूपानेंच प्रत्ययास येई. विचारांतीं विषवत् ठरणाऱ्या विषयाविषयीं कड-कडीत विरक्त बनून सदाचरणाचा मूर्तिमंत पुतळाच ते समाजापुढें उभा करीत असत. कितीहि संपत्ति असतां समाधान न मानणारे जीव व कांहींही नसतां अखंड आनंदांत रममाण असणारे सन्त हे पाहिले म्हणजे ईश्वराच्या या अतर्क्य सृष्टीचा चमत्कार वाटतो. आध्यात्मिक संपत्तीवरच आधिभौतिक संपत्ति अधिष्ठित असली तरच ती सुखदायी ठरते. संपत्ति ही मागून येत नसते तर ती मागून येत असते. म्हणजे असें कीं, आपली पात्रता उत्पन्न झाली की कोणतीही संपत्ति आपल्या मागून येत असते. या दृष्टीनेंच संतांनीं शमादिषट्क संपत्ति ही स्वाधीन करून घेतल्यामुळेंच ते स्वानंद-साम्राज्य संपत्तीचे अधिकारी झालेले असतात. आणि त्यामुळेंच मोरोपंत म्हणतात त्याप्रमाणें " विश्वात्मा मीच सत हे जाण " असें षडगुणैश्वर्य-संपन्न परमेश्वरालाही म्हणावें लागतें.

अशा थोर संतांचा वियोग म्हणजे मोठीच खेदाची नि शोकाची घटना होय. पण क्षणभंगुर देहासाठीं शोक खेद करणें ही सर्वांत दुःखाची गोष्ट असे या संतांनीच संसारी जीवांशीं हितगुज केलेलें असल्यामुळें त्यांच्या लौकिक वियोगासंबंधीचें दुःख आवरावेंच लागतें. आणि सर्व सामान्य माणसांना हें दुःख सुसह्य व्हावें म्हणूनच की काय ते आपल्या-मागें आपलीं वाङ्मयीन मूर्ति ठेवून जात असावेत. " थोर पुरुष आपल्या हातांनींच आपलीं स्मारकें उभारून जातात." या सुभाषिताचा अर्थही हाच होय. महाराजांच्या वैराग्यसंपन्न जीवनांतून निर्माण झालेलें वाङ्मय हें तसेंच सद्विचारप्रवर्तक असावें हें अगदीं स्वाभाविकच म्हटलें पाहिजे. महाराजांनीं आपल्या या वाङ्मयीन स्मारकमंदिरावर काव्यकलेचीं कोरीव

लेणी खोदल्याचें फारसें आढळत नाहीं. इथें काव्यालंकाराची फारशी सजावट डोळे दिपवीत नाहीं पण इथें भक्तीचा देव आहे. भक्तीच्या उमाळ्यांतूनच हें काव्य बाहेर आलेलें असल्यामुळें इथें फारसा कलाविलास आढळत नाही हें खरें; पण काव्यबुद्धीचे चमत्कार आपल्याला चकीत केल्यावांचून सोडीत नाहीत. सप्तशतीगुरुचरित्रसार या ग्रथांत प्रत्येक ओवीचें तिसरें अक्षर वाचीत गेल्यास श्रीमत्भगवद्गीतेचा पंधरावा अध्याय साधतो तर दत्तमालावर्णांकित माघमाहात्म्यांतही असेच दत्तस्तवनाचे श्लोक बनतात. महाराजांचें हें भाषाप्रभुत्व निःसंशय उल्लेखनीय आहे. या चमत्काराबरोबरच कलेचा मोहक विलास मधेंच येऊन जातो. सहज-सुंदर-तेनें चरित्र कथन करण्याच्या महाराजांच्या शैलीला कृष्णेचा संथ नि प्रसन्न ओघ आहे. शैलीचा हा प्रसाद त्यांच्या ( स्त्रीशिक्षा ) या प्रकरणांत विखरुन राहिला आहे. स्त्रीशिक्षा वाचतांना एकनाथांच्या " भारुडांची " आठवण जाहल्यावाचून राहात नाही. वेदान्त हें सूज्ञांना मिष्टान्न असलें तरी सर्व सामान्य माणसांना तें रुचकर लागतेंच असें नाही. तो रुचकर-पणा वेदान्तांत निर्माण व्हावा यासाठीं भिन्न भिन्न लोकांना तो त्यांच्या त्यांच्या भाषेंतच सांगितला गेला पाहिजे. या जाणिवेनेंच महाराजांनीं स्त्रियांना त्यांच्या भाषेतच वेदान्त सांगितला आहे. तो सांगतांना काव्य आणि तत्त्व यांचे पेच अगदीं बेमालूम बसून गेले आहेत. " प्रबोध पहाट बाहेर जहाली उघडी विवेक लोचन । उठी उठी सत्वर बाई सोडि या मायाशयना, सरली आवघि निशा आता गाढतमा उरविना, गुरुप्रसाद अरुणोदय हा सांवर सायनबसना ।

अहा मायबापा लोटुनि देशी । मज दिननिशी सासुरवाशी ॥ चिंतोबा मामाजी फजितो माजी । करिती प्रवृत्ती सासू मज माजी ॥ तृष्णा हे नण-दूली लावालावी भली करी । लावी कली आपण ही भली ॥ २ ॥

स्त्रियांनाही मोक्षाचा दरवाजा खुला करणारे स्वामी महाराज हे चंद्र-भागेच्या तीरीं ज्यांनीं साऱ्यांना आध्यात्मिक समतेचा संदेश ऐकविला त्यांच्याच परंपरेंतले होते. भागवत धर्माचा संदेश दत्तसंप्रदायांत होताच. या दत्तसंप्रदायाचे पुनरुज्जीवन स्वामींच्या दिव्य विरागी व्यक्तिमत्वामुळेंच होऊं शकलें. आणि पुनः चंद्रभागा नि इंद्रायणी यांच्या वाळवंटांत जगद्-

गुरु श्रीतुकाराममहाराजादि संतांनीं केलेल्या नामघोषाप्रमाणेंच कृष्णा व नर्मदेच्या वाळवंटांतही कर्म, उपासना व ज्ञान या त्रयीच्या उपदेशाचा डांगोरा स्वामीमहाराजांचेकडूनही पिटला गेला. असो.

आतां सर्वच गुरुभक्त बंधूभगिनींचे मीच आभार मानणें योग्य असतांना ब्रह्मीभूत व मूर्तिमंत सद्गुरुभक्तिरूपच असणारे श्रीनृसिंहसरस्वती दीक्षितस्वामी महाराज यांनी अमरापूर येथें जें गुरुभक्तीचें मूर्तिमत स्मारक असें श्रीवासुदेवानंदसरस्वतीपीठ स्थापन केलें आहे त्यांत असलेले मूळ हस्तलिखित कागदपत्र दिल्याबद्दल आम्हां विश्वस्तांचे श्री. गुरुभक्त वामनराव दत्तात्रय गुळवणी यांनी श्री. वासुदेवानंदसरस्वतीग्रंथमालेच्या शिक्षात्रयम् व स्तोत्रादिसंग्रह या दोन्ही पुष्पांच्या प्रकाशनांत जे आभार मानले आहेत त्यांत त्यांच्या मनाचाच मोठेपणा व्यक्त होत आहे. वास्तविक हें कार्य आर्थिक अडचणीमुळें विश्वस्तांना करता आलें नसतांही तें त्यांनी आपल्या दीर्घ प्रयत्नांनीं व गुरुभक्तीच्या सामर्थ्यामुळें घडवून आणलें, याबद्दल मीच त्यांचे सर्व विश्वस्तांतर्फे हार्दिक अभिनदन करीत आहे. त्यांच्या या पुण्यकार्यांत ज्या ज्या गुरुभक्त बंधुभगिनींचें वेगवेगळ्या प्रकारचें सहाय्य झालें त्यांनाही धन्यवाद देण्यांत मलाही धन्यता वाटत आहे.

गुरुमहाराजांच्या वाङमयसेवेविषयी माझ्यापेक्षांही सर्व दृष्टीनें गुरुभक्त पंडित दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर हे अधिकारसंपन्न असतां केवळ माझा गौरव करावा म्हणूनच हें प्रस्तावना-लेखनाचें कार्य मीं करावें असें सुचविलेबद्दल त्यांचाही कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें हें माझें कर्तव्यच समजतों.

श्रीसमर्थ रामदासस्वामी महाराजांच्या कालानंतर विद्वत्ता व वैराग्यादि सद्गुणांनाही भूषविणाऱ्या संतांचें नांव सांगावयाचें झाल्यास श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांचेंच नांव प्रामुख्यानें सांगतां येईल असें मला वाटतें. सुखदुःखामिश्रित अशा या व्यवहारप्रधान जगांत केवळ सोलीव सुख कोणतें हें फक्त साधुसंतांनीच स्वानुभवानें आमच्यासारख्या सामान्य संसारी जीवांना सांगून ठेविलें आहे.

शेवटीं श्रीवासुदेवानंदसरस्वतीसारख्या ब्रह्ममूर्ती संतांचें वाङ्मय दिवसेंदिवस जनतेला अधिक प्रिय वाटत जावो व तद्द्वारा सद्गुणसंवर्धन-मूलक शांतिसुखाची समृद्धी सर्वेच जगामध्यें होत जावो हीच त्या जगन्नि-यामक परमेश्वराच्या चरणकमलीं अनन्य भावानें प्रार्थना आहे. हीच प्रार्थना श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या भाषेंत आपण सर्वेच मंडळी म्हणूं या, कीं—

**किंबहुना सर्व सुखी ।**
**पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।।**
**भजिजो आदिपुरुषीं ।। अखंडित ।।**

ता. २३-१०-५२<br>
पांडवपंचमी शाके १८७४

श्रीज्ञानेश्वरभक्त—<br>
**कल्याण श्रीपाद कुलकर्णी**<br>
इचलकरंजी

---

# अनुक्रमणिका



## १ संक्षिप्त श्रीदत्तचरित्र

आदावत्रिवरप्रदानमनसूयातो जनिर्बालक-
क्रीडार्थं ह्रदमज्जनं वरवधूलीलार्जुनानुग्रहः ।
रामाचार्यकसाध्यपिंगलयदुप्रल्हादबोधौ तथा-
लर्कायुर्वरदानमित्यवगतं श्रीदत्तलीलामृतम् ।। १ ।।

---

## २ श्रीदत्तात्रेयस्तोत्रम्

दत्तात्रेयं महात्मानं वरदं भक्तवत्सलं। प्रपन्नार्तिहरं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। १ ।। दीनबंधुं कृपासिंधुं सर्वकारणकारणं । सर्वरक्षाकरं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। २ ।। शरणागतदीनार्तपरित्राणपरायणम् । नारायणं विभुं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। ३ ।। सर्वानर्थहरं देवं सर्व-मंगलमंगलम् । सर्वक्लेशहरं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। ४ ।। ब्रह्मण्यं धर्मतत्त्वज्ञं भक्तकीर्तिविवर्धनम् । भक्ताभीष्टप्रदं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। ५ ।। शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः । तापप्रशमनं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। ६ ।। सर्वरोगप्रशमनं सर्वपीडानिवारणं । आपदुद्धरणं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। ७ ।। जन्मसंसारबंधघ्नं स्वरू-पानन्ददायकम् । निश्श्रेयसप्रदं वन्दे स्मर्तृगामी स मावतु ।। ८ ।। जय-लाभयशःकामदातुर्दत्तस्य यः स्तवम् । भोगमोक्षप्रदस्येमं प्रपठेत्स कृती भवेत् ।। ९ ।।

---

( स्तोत्रादिसंग्रह नं. १०२ हें स्तोत्र थोडें मागेंपुढें झाल्यानें येथें पुनः व्यवस्थित दिलें आहे. )

## श्रीवासुदेवानन्दसरस्वतीग्रंथप्रकाशनमंडळ-पुणें

१ श्री. वामन दत्तात्रेय गुळवणी, ( अध्यक्ष, पुणें )
२ श्री. भुजग बळवंत भालेराव ( कार्यवाह, पुणें )
३ साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास नागपूर
४ वे. दत्तात्रयशास्त्री कवीश्वर ( कार्यवाह, पुणें )
५ श्री. शंकर कृष्ण देशमुख, वकील आजेगांव
६ श्री. विश्वनाथराव जोशी, वकील हिंगोली
७ ,, विष्णुपंत पंची, हैद्राबाद
८ ,, लक्ष्मणराव वरूडकर, वकील हैद्राबाद
९ ,, नानासाहेब नाईक, उमरेड
१० ,, बापूसाहेब कुबडे, सोलापूर
११ ,, दिगंबरराव एरंडे, एम्. ए. बी. टी., पुणें
१२ ,, हरिभाऊ कडेकर, कोल्हापूर

श्रीवासुदेवानंद सरस्वती ग्रंथमाला

## देणगीदारांचे प्रकार

३००१ रुपये देणारे—( यांचें नांव प्रकाशक म्हणून घातलें जाईल. )

५०१ ते ३००१ पर्यंत देणारे ( सन्मान्य आश्रयदाते

५१ ते ५०० पर्यंत देणारे ( मंडळाचे प्रतिपालक

५१ रुपये देणारे ग्राहक यांना सर्व खंड मिळतील.

प्रत्येक खंडास किंमत ५ रुपये. टपालखर्च निराळा. पानें ४००चे पुढें. उत्तम कापडी बाइंडिंग.

## श्रीमहाराजांच्या ग्रंथांची सूची

**खंड पहिला.** ( प्रकाशित )

१ कुमारशिक्षा १०४ श्लोक सटीक व मराठी भाषांतरासहित.

२ युवशिक्षा सटीक सभाषांतर

३ वृद्धशिक्षा ,, ,,

**खंड दुसरा** ( प्रकाशित )

४ स्तोत्रादिसंग्रह

**खंड तिसरा** ( प्रकाशित )

५ सप्तशती गुरुचरित्र ७०० ओव्या

६ दत्तलीलामृतसिंधु १००० ,,

७ स्त्रीशिक्षा, स्त्रीगीतें

८ माघमाहात्म्य

९ प्राकृतमनन

१० श्रीनृसिंहसरस्वतीदीक्षित-महाराजांचा स्तोत्रादिसंग्रह

**खंड चवथा** ( यंत्रस्थ )

११ दत्तमाहात्म्य ५००० ओव्या

**खंड पांचवा**

१२ त्रिशतीकाव्यं सटीक सभाषांतर

१३ श्रीदत्तचंपू सटीक सभाषांतर

**खंड सहावा व सातवा**

१४ समश्लोकी गुरुचरित्र सटीक

**खंड आठवा व नववा**

१५ द्विसाहस्री गुरुचरित्र सटीक

**खंड दहावा व अकरावा**

१७ दत्तपुराण सटीक ३५०० श्लोक

**खंड बारावा**

१७ श्रीमहाराजांचें विस्तृत चरित्र.

सोईप्रमाणें या क्रमांत कदाचित् बदल केला जाईल.

कार्यालयाचा पत्ता:—

**भुजंग बळवंत भालेराव** २० नारायण पेठ, गोवईकर बिल्डिंग पुणें २.

---

## श्री. प. प. वासुदेवानन्दसरस्वतीस्वामिमहाराज



जन्म शक १७७६ श्रावण वद्य ५   समाधि शक १८३६ आषाढ शुद्ध १

धर्मं गोप्तुं सतत्रातुं चचार धरणीतले ॥
मेनिरे भगवद्रूपं वासुदेवं ह्यधीश्वरं ॥

॥ श्रीदत्त ॥

# अथ श्रीसप्तशतीगुरुचरित्रसार

## ॥ प्रारम्भ ॥

॥ ॥ ॐ नमः श्रीगणेशाय ॥ श्रीसद्‌गुरवे नमः ॥
अथ श्रीसप्तशतीगुरुचरित्रसारप्रारंभः ॥ ॥

नमः[1] **श्री** दत्तगुरवे हृद्वासोधौतिकारवे ॥
स्वात्मज्योतिःप्रकाशाय सुखायानर्थशांतये ॥१॥

भूतं[2] **भ** व्यं भवच्चास्माज्जायते येन जीवति ॥
लीयते यत्र तद्ब्रह्म श्रीदत्ताख्यं त्र्यधीश्वरम् ॥२॥

भक्ति[3] **ग** म्यस्य तस्येदं चरितं चित्तशुद्धये ॥
संक्षेपेण स्फुटं वक्ति वासुदेवसरस्वती ॥३॥

ग्रंथीं **वा** सुदेव निमित्त । कर्ताकरविता दत्त ।
तत्पदीं ठेवीनि चित्त । चरित ऐकोत संत हें ॥४॥

---

१ हृदयरूपी वस्त्रास धुवून साफ करणारा, आपल्या आत्मरूप ज्योतीचा प्रकाशरूप, सुखरूप व सर्व अनर्थांची शांति करणाऱ्या श्रीदत्तगुरूला नमस्कार करितों. २ ज्यापासून भूत, भव्य व भवत् [सर्वविश्व] उत्पन्न होतें व ज्याच्या योगानें जीवंत राहतें तसेंच ज्याचे ठायीं लय पावतें तें त्रिगुणावर सत्ता करणारें ब्रह्म श्रीदत्तनामक आहे. ३ भक्तीनें ज्याची प्राप्ति होते अशा त्या दत्तगुरूचें हें चरित्र चित्ताची शुद्धी होण्यासाठीं प० प० वासुदेवानंद सरस्वती संक्षेपानें स्पष्ट करितात.

**विशेष टीपः**—प्रत्येक ओवींतील तिसरें अक्षर रांगेनें वाचीत गेल्यास श्रीमद्भगवद्गीतेंतील पंधरावा अध्याय वाचल्याचें श्रेय अनायासें पदरीं पडतें. हें तिसरें अक्षर स्पष्ट दिसावें म्हणून निराळ्या टाइपांत घातलें आहे.

हें मा **नु** नी जे वाचिती । किंवा भक्तीनें ऐकती ।
तेचि भवाब्धि तरती । उद्धरती निजकुळा ॥५॥

मना **वा** चा अगोचर । तो स्वच्छंदें हो गोचर ।
कलियुगीं यतीश्वर । नरसिंहसरस्वती ॥६॥

त्याचें **च** रित्र ऐकून । नामधारक ब्राह्मण ।
गाणगापुरीं दर्शन । घ्यावें म्हणून पातला ॥७॥

प्राणी **ऊ** ष्मानें तापून । इच्छिती छाया जीवन ।
तैसा त्रितापें तापून । ये लक्षून निजजीवना ॥८॥

जो ऊ **र्ध्व** खालीं भरला । आंत बांहेर सांचला ।
नामधारक म्हणे त्याला । दत्ता मला भेट देई ॥९॥

तूंचि **मू** र्तिमंत ब्रह्म । त्रिमूर्ति तूं गुरू परम ।
कलियुगीं मंगलधाम । भक्तकामपूरक ॥१०॥

बिशा **ल** तव सत्कीर्ती । परिसोनि केली विनंती ।
तव कर्णावरी न ये ती । वाटे खंती सर्वज्ञा हे ॥११॥

जरी **म** ज तूं नेणसी । तरी सर्वज्ञ कीं होसी ।
किंवा मातें उपेक्षिसी । दयाळूसी साजे हें कीं ॥१२॥

मी अ **धः** पाता जाईन । जरी देसी उपेक्षून ।
सेवा इच्छी कीं तव मन । तेणें होसी कीं दाता ॥१३॥

सेवा **शा** न ठेवून । मेघापरी दे जीवन ।
पूर्वीं जेवीं दिल्हें दान । बिभीषणध्रुवादिकां ॥१४॥

किं मु **ख** पसरितां । बाळापाशीं मागे माता ।
जरी बाळ मारी लाथा । तया माता टाकून दे कीं ॥१५॥

तूंची **म** म माता पिता । तूंची एक कुळदेवता ।
भिन्नभाव येथें नसतां । कोण दाता मज दुजा ॥१६॥

नरे **श्व** र[1] सेवकवंशा । रक्षी न धरितां आशा ।
तूं अस्मत्पूर्वजेशा । सर्वेशा कीं उपेक्षिशी ॥१७॥

मी इ **त्थं** भूत सर्व । कथितां ही नये द्रवे[2] ।
जेणें पाषाणा ये द्रव । तूं निर्द्रव होसी कैसा ॥१८॥

अशी **प्रा** र्थना करून । हो मूर्छित हें जाणून ।
दत्त चित्तीं प्रगटून । आश्वासन देयी स्वप्नीं ॥१९॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्वासुदेवानंदसरस्वतिविरचिते सप्तशतीगुरुचरित्रसारे चरितानुसंधानं नाम प्रथमोऽध्यायः ॥१॥

तें पा **हु** न येरू उठे । तया पुढें सिद्ध भेटे ।
तया पुसे कोण तूं कोठें । जासी वाटे मायबाप ॥१॥

सिद्ध **र** म्य बोले वाचे । त्रिमुर्ति गुरु आमुचे ।
न देखती भक्त ज्याचे । तापदैन्याचे पसारे ॥२॥

ऐसें **व्य** क्त ऐकून । नामधारक बोले दीन ।
मी त्याचा भक्त असून । कां लोटून देई मला ॥३॥

विश्व **यं** त्र चालक दत्त । तेथें हा अस्थिरचित्त ।
हें जाणून बोले व्यक्त । सिद्ध मुक्तसंग जो ॥४॥

तूं स्व **च्छं** दें वागसी । व्यर्थ देवा दोष देसी ।
कोप येतां इतरांसी । स्वभक्तांसी राखी गुरु ॥५॥

एक **दां** तो कोपे जरी । न राखती हरहरी ।

---

१ राजा. २ ओलेपण.

येरू पुसे कवणेपरी । वदे थोरीव गुरूची ॥६॥
म्हणे सि द्ध कलीप्रत । ब्रह्मा सांगे हें चरित ।
गोदावरीतीरस्थित । वेदधर्मशर्मा गुरू ॥७॥
तो स्वी य पातकान्त । करावया ये काशींत ।
तया दीपक सेवित । स्वयें कष्ट साहोनिया ॥८॥
सुहा स्य मुखें सेवा करी । गुरू शिव्या देई मारी ।
न धरी तें अंतरीं । क्षालन करी मळमूत्र ॥९॥
अंध प ङ्गु गलत्कुष्ठी । गुरू झाला महाकष्टी ।
शिष्या गाजी सेवेसाठीं । तरी करी सेवा शिष्य ॥१०॥
अप र्णा पति[२] हो प्रसन्न । शिष्या देयी वरदान ।
नाहीं गुर्वाज्ञा म्हणून । फिरवून धाडी शर्वा ॥११॥
त्याचा नि श्चय जाणून । वर दे विष्णूही येऊन ।
शिष्य बोले सर्व दान । देयील पूर्ण गुरू माझा ॥१२॥
निश्च य त्याचा ओळखून । विष्णू भुक्तिमुक्तिदान ।
दे, गुरूही हो प्रसन्न । काय न्यून तया शिष्या ॥१३॥
हो अ स्तं गत माया । गुरू प्रसन्न हो जया ।
भज सोडोनि संशया । करील दया त्रिमूर्ति हा ॥१४॥

इतिश्री० प० वा० स० वि० स० गु० दीपकाख्यानं नाम
द्वितीयो० ॥ २ ॥ ग्रं० सं० ॥ ३३ ॥

ऐसें वे दधर्माख्यान । नामधारक ऐकून ।
पुसे कां हा देव असून । अवतरून ये येथें ॥१॥

---

१ सांग. २ शंकर.

कां घे द शावतार हे । सिद्ध म्हणे ऐक तूं हें ।
अंबरीषाकरितां हें । नटन आहे नारायणा ॥२॥
दुर्वा स ऋषी द्वादशीसी । आला अंबरिषापाशीं ।
लावी विलंब कर्मासी । हो मानसीं खिन्न भूप ॥३॥
टळे वे ळा हें जाणून । राजा करी जलपान ।
गर्भवासा जा म्हणून । दे कोपून ऋषी शाप ॥४॥
तेव्हां द याळु येऊन । स्वयें शाप स्वीकारून ।
अवतरे नारायण । जो असोन सर्वव्यापी ॥५॥

इतिश्री० प० वा० स० अंबरीषोपाख्यानं नाम
तृतीयो० ॥ ३ ॥ ग्रं० सं० ॥ ३८ ॥

बहु वित् सिद्धा पुसे द्विज । अत्रि कोण सांग मज ।
त्रीश[1] केवीं हो अत्रिज[2] । सिद्ध गुज ऐक म्हणे ॥१॥
जाण अ त्रि ब्रह्मपुत्र । अनसूया तत्कलत्र[3] ।
दंपती परम पवित्र । त्यांचा पुत्र दत्तात्रेय ॥२॥
निर्बा ध अनसूयेचें । व्रत पाहुनी तें साचें ।
मन भ्यालें सर्व सुरांचें[4] । अबोधाचें बीज हें कीं ॥३॥
ते नि श्चो[5] तत्धैर्य देव । त्रिमूर्तीपाशीं घेती धांव ।
आश्वासोनी त्यांते देव[6] । भिक्षुभाव स्वीकारिती ॥४॥
ते ऊ र्ध्व लोक सोडुनी । भिक्षुकसे होवुनि ।
तिथे आले अत्रिसदनीं । जातां रानीं मुनिवर्य ॥५॥

---

१ तीन देवांचा स्वामी. २ अत्रिपुत्र. ३ भार्या. ४ देवांचें.
५ गळत आहे धैर्य ज्यांचें. ६ ब्रह्म, विष्णू, महेश्वर.

**त्यां कि म्प्र** योजन ऐसें । अनसूया पुसतसे ।
नग्नभिक्षा दे तूं ऐसें । याचितसे देवत्रय ॥६॥

**जरी स्रु** ती[1] सोडिती ते । तरी सती वदे त्यांतें ।
तसीच मी तुम्हां देतें । स्वस्थचित्तें भिक्षा करा ॥७॥

**स्वव्र ता** च्या सामर्थ्यें ती । अत्रिपदा चिंती चित्तीं ।
अतिथी बाळ कल्पुनी ती । सती नग्न होती झाली ॥८॥

**सुदु स्त** र ज्यांची माया । सहसा बालत्व ये तयां ।
तें पाहून अनसूया । विस्मया पावली ती ॥९॥

**सुहा स्य** मुखी घे बाळां । तंव स्तना पान्हा आला ।
पाजी एका एका बाला । जी विमला पातिव्रत्यें ॥१०॥

**त्यांचीं शा** न्त झालीं मनें । पतिव्रतास्तनपानें ।
पाळण्यांत घालुनि गाणें । ती प्रीतीनें गायी साध्वी॥११॥

**ती सु स्वा** नें गातां मुनि । तेव्हां आला वनांतुनि ।
ज्ञानें त्रिमूर्ति जाणुनी । स्तवुनी तोषवी त्याला ॥१२॥

**त्यांचें गु** ज तें जाणुनि । राहिले सुत होउनि ।
निजरूपेंहि स्वस्थानीं । जाती तीनी देव हर्षें ॥१३॥

**सगु ण** त्वा आले त्यांचीं । अत्रि नामें योजी साचीं ।
चन्द्र दत्त दुर्वासाचीं । ब्रह्म विष्णु महेश्वर ॥१४॥

**चंद्र प्र** णाम करूनी । चंद्रलोका गेला, मुनि ।
दुर्वासा फिरे भुवनीं । स्वसदनीं राहे दत्त ॥१५॥

**तो नि वृ** त्तिमार्ग[2] दावी । भक्तांचें काम पुरवी ।

---

१ मार्ग. २. मोक्षमार्ग.

स्मर्तृगामी[1] पुनः भुवि । अवतरे श्रीपादाख्य ॥१६॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे अनसूयोपाख्यानं नाम चतुर्थो० ॥ ४ ॥ ग्रं० सं० ॥ ५४ ॥

ये श्रो[2] **द्वा** हीं विप्राघरीं । उत्तरदेशीं भिक्षा करी ।
श्राद्धापूर्वीं द्विजनारी । दान करी श्राद्धान्नाचें ॥१॥

दत्त **वि** प्रस्त्रीचा भाव । पाहुनी सुत स्वयमेव ।
झाला श्रीपादराव । गृहभावें[3] स्वीकारीना ॥२॥

विशे **ष** विद्याभिज्ञ झाला । तात आरंभी विवाहाला ।
पुत्र म्हणे योगश्रीला । वरीं, अबला सर्व माता ॥३॥

निश्च **य** हा ते ऐकून । खिन्न होती त्यां दावून ।
त्रिमूर्तीरूप, आश्वासून । बंधू दोन पंग्वंध जे ॥४॥

करी **प्र** भू त्यांवरी डोळा । चालूं लागला पांगळा ।
पाहूं लागला आंधळा । अतर्क्य लीला श्रीपादाची ॥५॥

आशीर् **वा** द देई तयां । काशीपुरा जाऊनियां ।
बदर्याश्रम पाहुनियां । श्रीपाद ये गोकर्णासी ॥६॥

विम[4] **लाः** कीर्तयो यस्य । श्रीदत्तात्रेय एव सः ।
कलौ श्रीपादरूपेण । जयति स्वेष्टकामधुक् ॥७॥

इतिश्री० प० प० वा० स० सारे श्रीपादावतारकथनं नाम पंचमो० ॥ ५ ॥ ग्रं० सं० ॥ ६१ ॥

---

१ स्मरणमात्रें सांपडणारा. २ श्राद्धदिवशीं. ३ गृहस्थाश्रम. ४ ज्याच्या कीर्ति शुद्ध आहेत तोच श्रीदत्तात्रय कलियुगामध्यें आपल्या भक्तांचे इच्छित-मनोरथ पूर्ण करणारा श्रीपादरूपानें आहे.

कथा **अ** सी परिसून । नामधारक करी प्रश्न ।
म्हणे सर्व क्षेत्रें त्यजून । ये गोकर्णक्षेत्रीं कां हा ॥१॥

शैव **ध** र्में रावणमाता । कैलासाची धरूनि चिंता ।
मृन्मयलिंग पूजिता । ये श्रीमत्ता सुता खेद ॥२॥

तो आ **श्च** र्य मानून । म्हणे कैलास आणून ।
देतों, दे ही माती त्यजून । असें म्हणून चालिला ॥३॥

बळें **मू** ळासह कैलासा । उचलितां हाले सहसा ।
भिवूनी गौरी वदे गिरिशा । प्रळय कसा हा वारीं ॥४॥

तैं कै **ला** सा चेपी हर । खालीं रगडे निशाचर ।
मरणोन्मुख हो करी स्तोत्र । तेणें हर प्रसन्न हो ॥५॥

त्वद **न्य** न मला त्राता । तूंचि माझा प्राणदाता ।
दयाळू तूं राखें आतां । असें म्हणतां सोडी शंभू ॥६॥

त्वां अ **नु** मान न करितां । शिवा सोडविलें आतां ।
असें म्हणूनी तो गीता । गाता झाला सप्तस्वरें ॥७॥

गायीं **सं** म्यक् रागरागिणी । निजशिर छेदुनि ।
त्याचा वीणा करूनी । काल साधुनि प्रेमानें ॥८॥

शिव **त** याच्या गाण्यासी । भुलोनी ये तयापाशीं ।
आत्मलिंग देउनि त्यासी । म्हणे होसी तूंचि शंभू ॥९॥

ये हा **ता** अमरता । तीन वर्षें हें पूजितां ।
लंका कैलासचि ताता । होईल आतां निःसंशय ॥१०॥

अव[1] **नि** वरी मध्यें जरी । ठेवितां न ये करीं[2] ।

---

१ भूमीवर. २ हातांत.

येणे परी नेई पुरीं । काय करिसी कैलासा ॥११॥

शिवा **क** रूनी नमन । पुरा जाई रावण ।
त्वरें नारद जाऊन । करी कथन सर्व इंद्रा ॥१२॥

अध **र्मा** त्या जाणून । इंद्र ब्रम्ह्यां दे सांगून ।
तोही विष्णूसी कथून । ये घेऊन शिवाप्रती ॥१३॥

त्या अ **नु** चितकर्मे हर । पश्चात्तापें म्हणे विसर ।
पडला झाला पावप्रहर । गेला क्रूर येथोनियां ॥१४॥

देव **बं** धींत पडले । विष्णू म्हणे तुज कळलें ।
तरी कां हें असें केलें । जड ठेलें पुढें मज ॥१५॥

जो आ **धीं** मारी जीव । तया केला चिरंजीव ।
वरदान सांगे शिव । म्हणे उपाय करीं तूं ॥१६॥

ऐसें **नि** गुती ऐकून । नारदा दे पाठवून ।
विष्णू करावया विघ्न । धाडी विघ्ननायकातें ॥१७॥

मुनी **म** नो वेगें तया । गांठूनि लोटी काळ वांयां ।
धाडी संध्या करावया । गणराया तंव आला ॥१८॥

त्या मा **नु** नी ब्रह्मचारी । तो न घेतां त्याचे करीं ।
रावण दे लिंग तरी । अवधारी म्हणे बटू[१] ॥१९॥

स्वपो **ष्य** मी अतिदीन । तीन वार बोलावीन ।
जड होतां खालीं ठेवीन । दोष न मग मला ॥२०॥

स्वर्ग **लो** कीं सुर पाहतां । बोलावी त्या अर्घ्य देतां ।
तीन वेळ तो न येतां । तो स्थापिता झाला लिंग ॥२१॥

---

१ ब्रह्मचारी.

त्यानें के लें तें स्थापन । रावणा न हाले म्हणून ।
महाबळी हो गोकर्ण । क्षेत्र जाण भूकैलास ॥२२॥

इतिश्री० प० प० वा० वि० गोकर्णमहाबळेश्वरप्रतिष्ठापनं नाम
षष्ठो० ॥ ६ ॥ ग्रं० सं० ॥ ८३ ॥

होता न रपती[1] एक । मित्रसह तत्सेवक ।
श्राद्धीं नृमांसे[2] दे ठक । वसिष्ठादिक ऋषींसी ॥१॥

ऋषी रू से देयी शाप । ब्रह्मराक्षस हो भूप ।
विप्रा मारी तत्स्त्री[3] शाप । दे स्त्रीसंपर्कें मरसी ॥२॥

तो भू प बारा साल । जातां प्राग्वत् हो विमल ।
सांगे राणीसी सकल । शापबोल ब्राह्मणीचा ॥३॥

दुःखें म रू इच्छी राणी । राजा तिला सांवरोनी ।
केलें पाप सांगोनी । तारा म्हणूनी प्रार्थी विप्रां ॥४॥

मनें[4] स्ये कं वचस्येकं । असा नोहे हा सेवक ।
हें जाणोनी द्विज लोक । सांगे सम्यक् तीर्थयात्रा ॥५॥

ब्रह्म हृ त्या न जाय ती । मग भूपा वाटे भीती ।
मिथिला पुरीं महामती । सांगे खंती गौतमातें ॥६॥

मुनी त या आश्वासून । सांगे क्षेत्र गोकर्ण ।
तेथें दोष निवारून । तूं पावन होसील बा ॥७॥

ऐक थो डेंसें आख्यान । म्यां देखिलें तें सांगेन ।
शिवदूत येती धांवून । चंडाळी मरतां एक ॥८॥

---

१ राजा. २ नरमांस. ३ मारलेल्या विप्राची स्त्री. ४ मनांत एक, वाणींत दुसरें.

हर्ष प हात्तां हो तयां । ग्यां पुसतां, करूनी दया ।
ते सांगती मातें राया । विप्रजाया[1] प्राग्जन्मीं हे ॥९॥

ही बा ल[2] विधवा झाली । जारकर्मीं रमली ।
स्वजनांनीं सोडिली । व्यक्त झाली वैश्यकांता ॥१०॥

अस भ्य संगें दुष्ट । जारकर्में झाली भ्रष्ट ।
मद्यमांसें झाली पुष्ट । नेणे कष्ट पुढील ती ॥११॥

मत्ता ते मेष म्हणून । गोवत्सा खायी मारून ।
दुजे दिनीं शिर पाहून । शिव म्हणून छपवी तें ॥१२॥

असी नां दतां ती मेली । गोवधें हो चंडाळी ।
अविचारें हो आंधळी । व्रणें झाली जारकर्में ॥१३॥

असी तो कपेंणें झाली । मायबापें रक्षियेली ।
लवकर तेही मेले । पोरी झाली निराश्रय ॥१४॥

ती ज न संयोगेशीं । आली गोकर्णक्षेत्रासी ।
वस्त्रहीन उपवासी । व्रतदिवशीं मागे अन्न ॥१५॥

ती यां[3] चा वया कर । पुढें करी, कोणी नर ।
करीं[4] टांकी बिल्वपत्र । टांकी दूर हुंगोनी ती ॥१६॥

पडे दि ष्टें[5] लिंगावर । तेणें तुष्टे गौरीवर ।
करी इला भवपार । धाडी शीघ्र आम्हां येथें ॥१७॥

पुन र्नं जन्मेल ही । म्हणोनियां नेली त्यांहीं ।
गौतम म्हणे तूंही । नृपा पाहीं गोकर्णातें ॥१८॥

नृप च्च मत्कार मानून । जातांची हो पावन ।

---

१ ब्राह्मणभार्या. २ बाल्यपणीं. ३ मागावया. ४ हातांत. ५ दैवयोगानें.

तेथ साक्षाच्छिव जाण । म्हणोन ये श्रीपाद ॥१९॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० स० गु० गोकर्णक्षेत्रवर्णनं नाम सप्तमो० ॥ ७ ॥ ग्रं० सं० ॥ १०२ ॥

सिद्ध सं क्षेपें सांगत । श्रीपाद तेथूनि येत ।
कृष्णातीरीं होयी स्थित । कुरुपुरांत[1] तारक ॥१॥

मूर्ख प्र जासमवेत । लोकनिंदेनें हो त्रस्त ।
जीव द्याया कृष्णेंत । अकस्मात देखे देव ॥२॥

प्रभू ति ला निरोपिती । आत्महत्या दुस्तर म्हणती ।
जन्मांतरीं सुपुत्राप्ती[2] । व्हाया प्रार्थी मग ती नारी ॥३॥

तन्नि ष्ठा ओळखून । गुरु सांगती आख्यान ।
उज्जनींत चंद्रसेन । शिवार्चन करी प्रदोषीं ॥४॥

त्याचा अ मूल्य सन्मणी । हराया नृप तत्क्षणीं ।
घेवोनी अक्षौणी[3] । उज्जनी वेढिते ते ॥५॥

हस्त्य श्व रथपत्ती[4] । पाहोनी न भी चित्तीं ।
शिवा पूजी तो भूपती । तें देखती गोपपुत्र ॥६॥

अश्व त्थ संनिधानीं । अंगणीं ते पाषाणीं ।
पूजिती, त्यां नेती जननी । पूजनीं रमे एक बाळ ॥७॥

राहे मे ळा जातां एकला । पूजा लोटुनि माता त्याला ।
ओढी तो मूर्छित पडला । शिव त्याला दे सायुज्य ॥८॥

---

१ यास कुरुगडी म्हणतात. २ प्राप्ति. ३ २१८७० हत्ती, २१८७० रथ, ६५६१० अश्व, १०९३५० पायदळ मिळून २१८७०० संख्येस अक्षोहिणी म्हणतात. ४ पायदळ.

पुढें नं दन्नी होऊन । माता लाहे कृष्णनंदन ।
ज्योतिर्लिंग[1] तें देखून । द्वेष सोडून जाती राजे ॥९॥
पुढें सु त व्हावा तरी । शनिप्रदोष तूं करीं ।
येरू म्हणे तुम्हासरी । जन्मांतरीं पुत्र व्हावा ॥१०॥
जो भा वि कां देई वर । तथा म्हणूनी शिरावर ।
मूर्खपुत्राच्या धरी कर । विद्वद्वर तो जाहला ॥११॥
ती क रू नी प्रदोषपूजा । पुढें झाली विप्रात्मजा[2] ।
स्वसमान नाहीं दुजा । म्हणूनी हो तत्सुत दत्त ॥१२॥
इतिश्री० प० प० वा० स० वि० स० गु० शनिप्रदोषव्रतकथनं नाम
अष्टमो० ॥ ८ ॥ ग्रं० सं० ॥ ११४ ॥
सु रू ढ भक्ती एक । श्रीपादाचा सेवक ।
होता जातीचा रजक । नित्य एकभावें वंदीं ॥१॥
तो न मू नी गुरुवर्या । वस्त्रें धूतां भूपैश्वर्या ।
देखे इच्छी स्वयें तथा । गुरुराया तें जाणत ॥२॥
त्या बो ल ती तूं भक्ता । सुखें राज्य करीं आतां ।
पुढें देऊं कीं वद आतां । तो म्हणे झालों वृद्ध ॥३॥
पुढें म ला वा यौवनीं । असो तुझी स्मृती मनीं ।
गुरु बोले म्लेच्छसदनीं । राजा होसी अंतीं भेटूं ॥४॥
इतिश्री० प० प० वा० स० वि० स० रजकवरप्रदानं नाम
नवमो० ॥ ९ ॥ ग्रं० सं० ॥ ११८ ॥
सत्य सं कल्प दे तसें । स्वयें अवतरतसे ।

---

१ तेजोमय लिंग, हें स्वयंसिद्ध असतें. २ ब्राह्मणाची कन्या.

कुरुपुरीं भेटतसे । ऐक असे विप्र एक ॥१॥

करी ग रीब तो व्यापार । लाहे नवसें द्रव्य फार ।
यात्रे जातां मार्गीं चोर । तया ठार मारिती ॥२॥

श्रीश श स्त्रें मारी चोरां । जीववी द्विजवरा ।
राखी एका सभ्य चोरा । स्वयें गुप्त हो श्रीपाद ॥३॥

ते श स्त्रे मेले त्यांतें । द्विज जाणोनी धनांतें ।
घेउनी ये कुरुपुरातें । दे नवस हो कृतार्थ ॥४॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० स० मृतविप्रसंजीवनं नाम
दशमो० ॥ १० ॥ ग्रं० सं० ॥ १२२ ॥

ब्राह्म ण स्त्री करंजपुरीं । हो अंबाल्या सुंदरी ।
प्राक्संस्कारें प्रदोष करी । तिला वरी माधव विप्र ॥१॥

झाली दृ ढधी[1] गर्भिणी । बोले तत्वज्ञान जनीं ।
शोभली ती संस्कारांनीं[2] । शुभलग्नीं प्रसवली ॥२॥

तो प हे बाळ ओंकार । पिता करी तत्संस्कारें[3] ।
होती सर्व हृष्टतर । अवतार हा म्हणती ॥३॥

करू न नामकर्मा । नाम घेती नृहरि शर्मा ।
पिता वेंची धन धर्मा । चित्र नर्मीं[4] दावी बाळ ॥४॥

न इ च्छि शिशु बोलाया । तया मूक मानूनियां ।
ते करितीं बहु उपाया । शिशु तयां दावी खुणा ॥५॥

मूक त्वा टांकी तेव्हां । बांधाल मुंजी जेव्हां ।
असें म्हणूनी करी तेव्हां । बाल लोहाचें सुवर्ण ॥६॥

---

१ दृढनिश्चयी. २ पुंसवनादि. ३ जातकर्मादि. ४ लीला.

बोल **त** याचा मानून । करिती व्रतबंधन ।
मातेपाशीं भिक्षा दान । मागे तीन वेद पढे ॥७॥

जैं प्रा **तः** काल येतां । अंधःकार जाय अस्ता ।
तेवीं बाळें वेद पढतां । मर्त्यतांधी[1] लोपली ॥८॥

सर्वां **प** रम हर्ष झाला । बटू प्रार्थी मातेला ।
स्वीकारूं संन्यासाला । होती तुला पुत्र पुत्री ॥९॥

माता **दं** भोलीपातेंसे[2] । ऐकतांची पडतसे ।
सांवरोनी बोलतसे । क्रम असे संन्यासासी ॥१०॥

वेदां **त** ब्रह्मचर्यादि । क्रम असे नच आधीं ।
अन्यथा पडे मधीं । पुत्र सुधी ऐक म्हणे ॥११॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० स० नृसिंहावतारो नाम
एकादशो० ॥ ११ ॥ ग्रं० सं० ॥ १३३ ॥

सच्चि **त्प** रब्रह्म श्रवणा । न्यासें[3] हेतू तत्कारण ।
वैराग्य न क्रमं[4] जाण । आळस न कीजे येथ ॥१॥

कां वा **रि** सी तूं मज । आयुष्य जेवीं वीज ।
क्षणभंगुर देह तुज । कळे सहज मृत्यू न कीं ॥२॥

येथ **मा** नवांची काय । कथा मृत्यू देवां खाय ।
न ये गेलेलें आयुष्य । न कळे काय केव्हां पडे॥३॥

सन्मा **र्गि** न करीं विघ्न । सुपुत्रा तूं होसी म्हणून ।
मस्तकीं हस्त ठेऊन । पूर्व स्मरण तिला देई ॥४॥

म्हणे **त** नया श्रीपादा तूं । एक पुत्र होतां जा तूं ।

---

१ मनुष्यबुद्धि. २ वज्रपात. ३ संन्यास. ४ ब्रह्मचर्यादि.

सुत म्हणे पुरतां हेतू । आज्ञा दे तूं म्हणूनी राहे ॥५॥

ज्यांचें **व्यं** ग अध्ययन । जे म्हणविती प्राज्ञ[1] ।

तेही त्यापाशीं येवून । अध्ययन करिती नित्य ॥६॥

ती मा **य** गर्भिणी झाली । पुत्र दोन प्रसवली ।

त्या बाळें आज्ञा घेतली । वाट धरिली काशीची ॥७॥

तो स **स्मि** त बोले तयां । पुनः भेटें म्हणुनियां ।

काशीमध्यें येवोनियां । धरीं धैर्या करी योग ॥८॥

महा **न्ग** तस्मयें[2] जाणून । न्यासमार्ग[3] स्थापीं म्हणून ।

विप्रें प्रार्थितां तो प्राज्ञ । स्वयें संन्यासी होतसे ॥९॥

जो हो **ता** तेथें यती । वृद्ध कृष्णसरस्वती ।

तया वरूनी गुरू होती । नरसिंहसरस्वती ॥१०॥

होऊ **न** नर आपण । गुरूचे गुरू असून ।

रामकृष्णापरी जाण । गुरू करून घेती गुरू ॥११॥

स्थापू **नि** श्रौतधर्म[4] । फिरे सर्व तीर्थाश्रम ।

माधवा दे आश्रमें[5] । वळे जन्मभूमीकडे ॥१२॥

इतिश्री० प० प० वा० स० चि० सारे संन्यासदीक्षाग्रहणं नाम
द्वादशो० ॥ १२ ॥ ग्रं० सं० ॥ १४५ ॥

बाळ **व** र्य ज्ञानज्योति । कृष्णमाधवसरस्वती ।

सदानंदोपेंद्रयती । सातवा मी हे मुख्य शिष्य ॥१॥

अधू **र्त** सर्व शांत । गुरु ऐशां शिष्यांसहित ।

---

१ विद्वान्. २ मदहीन. ३ संन्यासमार्ग. ४ वेदधर्म (अग्निहोत्रादि).
५ संन्यास.

आले जन्मभूमीप्रत । हो माताही यतिवंद्या ॥२॥

विन न्ति करुनी नर । विश्वरुपा घरोघर ।

न्हेती देती गुरुवर । परपार[1] मायबापां ॥३॥

तो प्र भू म्हणे भगिनीला । दंपतीभेद केला ।

त्वां लातिलें हो धेनूला । पती त्यजील कुष्ठी होसी ॥४॥

ते भूं[2] यः प्रार्थितां म्हणती । वृद्धत्वीं पति हो यति[3] ।

कुष्ठाची करीन शांती । स्त्रियां पति गती न अन्य ॥५॥

असें त ये वेळीं तिला । सांगोन शिष्यमेळा ।

घेवोनि ये गोदावरीला । भूगोला उद्धरी जो ॥६॥

शिष्य मे ळवी आणिक । माधवारण्यसंज्ञक ।

ज्ञान देउनी सम्यक् । विशोकें[4] केला गुरूनें ॥७॥

गुरु व र्य पुढें येती । तेथ एका विप्रा पाहती ।

मराया ये गोदेप्रति । दगड पोटीं बांधोनियां ॥८॥

तया चा तो जाणून भाव । शिष्यां म्हणती ध्यारे धांव ।

शिष्यें घेवोनियां धांव । तयास जवळ आणिला ॥९॥

तो सा द्यं त पुसतां वदे । शूलपीडित मी प्राण दें ।

कुकर्म केलें पूर्वीं मदें । त्याचें फल दे देव हें कीं ॥१०॥

नाहीं पु ण्य पूर्वीपार । मी झालों भूमीभार ।

गुरु म्हणती अनिवार । दोष फार आत्मघातें ॥११॥

तूं म रू नको रोगावर । औषध देतों मी शीघ्र ।

ऐसें म्हणती गुरुवर । तंव ये विप्र सायंदेव ॥१२॥

---

१ मोक्ष. २ वारंवार. ३ संन्यासी. ४ शोकरहित.

तो तो ष वी श्रीगुरूसी । म्हणे द्विज मी कांचीवासी ।
गुरु म्हणती हा उपवासी । या द्विजासी जेवूं घालीं। १३।
हें सा म्प्र त करीं काज ! सायंदेव म्हणे हा द्विज ।
अन्नवैरी झाला आज । दोष ये मज हा मरतां ॥१४॥
अपूं[1] प दे म्हणती तया । तें मानून गुरुराया ।
भिक्षेला ने प्रार्थुनियां । द्विज शिष्यांसमवेत ॥१५॥
धूपों[2] द्ये गुरुचे पाद । पूजी विधीनें वंदी पाद ।
जेववी सर्वां हो सानंद । झाला विगर्दे[3] तोही विप्र ॥१६॥

इतिश्री० प० प० वा० वि० स० गु० सारे विप्रशूलहरणं नाम त्रयोदश० ॥ १३ ॥ ग्रं० सं० ॥ १६१ ॥

तो सा य न्देव म्हणे । म्लेच्छराजा माझें जिणें[4] ।
हरील वाटे आजी त्याणें । बोलवणें केलें आहे ॥१॥
मीं अ तः पर न डरें । गुरु म्हणती तूं जा त्वरें ।
परतवील तो सत्कारें । म्हणुनी करें[5] आश्वासिती ॥२॥
हाची प्र साद म्हणून । सायंदेव जातां यवन ।
मृतप्राय हो भिवून । गौरवून त्या बोळवी ॥३॥
वंश वृ द्धी निजभक्ती । गुरु देवून पुनः भेटी ।
सायंदेवा देवूं म्हणती । गुप्त होती पुढें स्वयें ॥४॥
निवृं[6] त्तिः श्रीगुरुपदैः । सर्वत्रात्र प्रकाशिता ।

---

१ पिठाचे पदार्थ. २ पाद्यानें. ३ रोगमुक्त. ४ वांचणें. ५ हस्तानें.
६ येथें श्रीगुरूंनीं सर्वत्र निवृत्ति दाखविली व आपल्या भक्तांस तीर्थयात्रेस पाठवून गुप्त झाले.

प्रस्थाप्य तीर्थयात्रार्थै । स्वान्गृहीताऽप्रकाशिता ॥५॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सायंदेववरप्रदानं नाम
चतुर्दशो० ॥ १४ ॥ ग्रं० सं० ॥ १६६ ॥

शिष्यां **प्र** ति गुरु म्हणती । तीर्थें हिंडा सर्वक्षिती ।
भेटूं श्रीशैलावरती । ते म्हणती दवडूं नका ॥१॥

हे सं[1] **सृ** तिहर पाद । हेची सर्वतीर्थास्पदें[2] ।
गुरु म्हणती निर्विवाद । चला खेद सोडूनियां ॥२॥

वाक्य **ता** दृश तें ऐकूनी । भावें शिरसा मानुनी ।
म्हणती जावें कोण्या स्थानीं । तें ऐकूनी गुरु बोले ॥३॥

सात **पु** री धाम चार । बारा ज्योतिर्लिंगें थोर ।
आचरतां बहु कृच्छ्र । फळ हो दूर जाय पाप ॥४॥

आच **रा** वें तीर्थीं क्षौर । जसा असे स्वाधिकार ।
तसा श्राद्धादिप्रकार । करितां दूर नसे क्षेमें[3] ॥५॥

जे को **णी** जितुके गांव । तीर्थां जाती ठेवूनि भाव ।
तितुके कृच्छ्रफळ अपूर्व । तरती पूर्वज तयांचे ॥६॥

पाहु **नि** नदीसंगम । न्हातां पुण्य उत्तम ।
ऋतु निवर्ततां ग्रीष्म । तीर्थधामें[4] विटाळे ॥७॥

स्वध **र्मा** नें आठ मास । फिरा ठरा चार मास ।
नवें जळ ये नदीस । दहा दिवस ये विटाळ ॥८॥

दोष **न** च तीरस्थांसी । तीन दिन महानदीसी ।
अहोरात्र ऱ्हदकूपांसी[5] । करा ऐसी यात्रा तुम्हीं ॥९॥

---

१ संसार. २ स्थान. ३ कल्याण. ४ स्थान किंवा तेज. ५ डोह.

पाप **मो** चन होयी ज्ञान । वर्ष येतां बहुधान्य ।
श्रीशैलावर मी भेटेन । तथास्तु म्हणून ते गेले ॥१०॥

इतिश्री० प० प० वा० स० गु० सारे तीर्थयात्रानिरूपणं नाम
पंचदशो० ॥ १५ ॥ ग्रं० सं० ॥ १७६ ॥

तो म **हा** त्मा लोटुनी शिष्यां । स्वयें कोठें राहोनियां ।
काय करी असे तया । विप्रें पुसतां सिद्ध सांगे ॥१॥

सवें **जि** तात्मा मी एक । वैजनाथीं गुरुनायक ।
असतां विप्र आला एक । सांगे दुःख गुरुनें दिल्हें ॥२॥

गुरू **त** या धिक्कारून । म्हणती तूं रे जा येथोन ।
येरु धरूनियां चरण । गुरुसेवन सांगा म्हणे ॥३॥

गुरु **सं** तोषें बोलती । ब्रह्मविष्णूशिवमूर्ति ।
गुरु ब्रह्म साक्षात् म्हणती । भक्तां देती ते सर्वार्थ ॥४॥

सेवा **ग** हन वाटे तरी । गुरु आपुल्या शिष्या तारी ।
कथा झाली हे द्वापारीं । अवधारीं मी सांगतों ॥५॥

धौम्य **दो** षज्ञ[1] गुरु भला । तिघे शिष्य होते त्याला ।
कठिण सेवा सांगे त्यांला । न वेदांसी सांगे पूर्वी ॥६॥

विशे **षा** र्थ न सांगती । हृच्छुध्यर्थ सेवा घेती ।
वळखूनी प्रसन्न होती । रहाटी ऐसी गुरूची हे ॥७॥

धौम्य **अ** शा रीतीं शिष्या । अरुणा म्हणे शेतीं तोयां[2] ।
न्हेयी म्हणतां तो न्हे तोया । तें न जाय शेताकडे ॥८॥

मनीं **ध्या** यी गुरुपद । जलामध्यें पडे सानंद ।

---

१ दोष जाणणारा. २ उदक.

जळ क्षेत्रीं ये स्वच्छंद । गुरु प्रसाद करी तेव्हां ॥९॥
अध्या **त्म** ज्ञानी तो झाला । तया गेहा पाठविला ।
धौम्य सांगे बैदाला । ह्या शेताला यत्नें राखीं ॥१०॥
राखो **नि** तो मळी धानें[1] । गुरुला तें दे सांगून ।
गाडा रेडा एक देऊन । म्हणे आण धान्य घरीं ॥११॥
गाडा **त्या** धान्यें भरून । आणितां पंकीं[2] तो गढून ।
गेला तंत्र गुरु येवून । त्या काढून प्रसन्न हो ॥१२॥
सर्व **वि** द्या आल्या त्याला । तया गेहीं पाठविला ।
गुरु म्हणे उपमन्यूला । तूं धेनूला वनीं चारीं ॥१३॥
नेवो **नि** तो गुरें रानीं । चरवी तेथें भिक्षा करूनी ।
गुरु मागे तें जाणुनी । भिक्षा आणुनि दे ती मला ॥१४॥
द्विरौं[3] **वृ** त्ती भिक्षा करी । शिष्य एक देई घरीं ।
तें जाणुनी गुरु दुसरी । भिक्षा घरीं देईं म्हणे ॥१५॥
दुश्चि **त्त** तो नच होई । दोनी भिक्षा घरीं देई ।
वत्सोच्छिष्टपय[4] घेई । गुरुमायी वारी तया ॥१६॥
तो अर्[5] **का** चें क्षीर पीतां । होई अंध कूपीं पडतां ।
कृपा आली गुरुनाथा । दृष्टी देता झाला मंत्रें ॥१७॥
सत्कां[6] **माः** फलंतु ते । असें म्हणुनि धाडी त्यातें ।
तो हो कृतार्थ कीर्तीतें । तच्छिष्यें मिरविली ॥१८॥
जग **द्वं** द्य शिष्य झाला । सतक्षकेंद्र[7] पाडिला ।

---

१ (हिंदुस्थानी शब्द) धान्य. २ चिखलांत. ३ दोन वेळ. ४ उष्टें दूध. ५ रुईचें. ६ चांगले मनोरथ. ७ तक्षकासह इंद्र.

गुरुतोषाची ही कला । जा तूं गुरुला पुनः सेवीं ॥१९॥
तो त **द्वै** रें अनुतापला । मग तारिती गुरु त्याला ।
आले भिल्लवाडीला । वास केला चार मास ॥२०॥

इतिश्री० प० प० वा० गु० सारे शिष्यत्रयाख्यानं नाम
षोडशो० ॥ १६ ॥ ग्रं० सं० ॥ १९६ ॥

जे च **र्वि** त चर्वणसे । विषय भोगिताति पिसे ।
तारावया तयां असें । करीतसे गुरु कर्म ॥१॥
विप्र **मु** ख्याचा सुत एक । कोल्हापुरीं होता मूर्ख ।
पशु म्हणती सर्व लोक । निंदिती दुःख वाटे त्यातें ॥२॥
विर **क्ता** परि तो येवून । भुवनेश्वरीसी प्रार्थून ।
न होतां ती सुप्रसन्न । जिव्हा छेदून देतसे ॥३॥
शिर **स्सु** मन वाया चिंती । देवी धाडी त्या गुरुप्रती ।
गुरु जिव्हा देती करिती । सुमती जाती गुरु पुढें ॥४॥

इतिश्री० प० प० वा० स० छिन्नजिव्हादानं नाम
सप्तदशो० ॥ १७ ॥ ग्रं० सं० ॥ २०० ॥

सुरे **ख** क्षेत्र गुरु पाहे । कृष्णा पंचगंगा वाहे ।
तेथें द्वादशाब्द राहे । अजुनी आहे तेथें गुप्त ॥१॥
तेथें **दुः** खि विप्राघरीं । गुरु शाकभिक्षा करी ।
घेवडा वेल तोडी करीं । ब्राह्मणी करी दुःख तेव्हां ॥२॥
तद्दुः **ख** हरावया । वेलातळीं देई तयां ।
धनकुंभ गुरुराया । म्हणे तया न प्रगटा हें ॥३॥

इतिश्री० प० प० वा० स० सारे धनकुंभप्रदानं नाम
अष्टादशो० ॥ १८ ॥ ग्रं० सं० ॥ २०३ ॥

हो हा **सं** न्यासी म्हणून । भिक्षा मागे शिव आपण ।
हिरण्यकशिपुदारण । करितां नखें तापलीं ॥१॥

जो वि **ज्ञै** कंगम्य[1] हरि । तो श्रीदत्त औदुंबरीं ।
शांत होतां तयावरी । वास करी श्रीसहित ॥२॥

दे मा **र्ग** कृष्णा तया । द्वीपीं राहे योगिनी तया ।
भिक्षा देती पूजूनियां । नेणूनियां विप्र म्हणती ॥३॥

न स्व **छं** दी गांवीं जायी । पाहूं येथें काय खायी ।
ऐसें म्हणुनि ते ठायीं । राहतां येयी भय त्यांला ॥४॥

तत्र **त्य** नर गंगानुज । भावें आला त्या गुरुराज ।
दाखवूनी तेथील गुज । देती निजप्रीती वर ॥५॥

तो न **मू** नी त्रिस्थली[2] पुसे । क्षणें गुरु दावितसे ।
गुरु जाऊं म्हणतसे । दुःख होतसे योगिनीसी ॥६॥

न गूं[3] **ढाः** केपि मे चेष्टां । विदुरित्येष पादुके ।
विन्यस्याश्वास्य ताः प्राप । श्रीगुरुर्गाणगापुरम् ॥७॥

इतिश्री० प० प० वा० स० योगिनीवरदानं नाम
एकोनविंशो० ॥ १९ ॥ ग्रं० सं० ॥ २१० ॥

ऐसें **प** रिसुनी विप्र । म्हणे तेथें कोणा वर ।

---

१ अनुभवज्ञानगम्य. २ काशी, प्रयाग व गया. ३ आपल्या गूढ चेष्टा कोणालाहि कळूं नयेत म्हणून आपल्या पादुका ठेवून योगिनींना आश्वासन देऊन श्रीगुरु गाणगापुरास गेले.

लाधला बोला सविस्तर । ऐकें उत्तर सिद्ध म्हणे ॥१॥

एक द शग्रंथी विप्र । शिरोळग्रामीं मृतपुत्रें[1] ।
तद्भार्येसी एक विप्र । सांगे उग्रकर्मविपाक ॥२॥

त्वां ब्रह् म स्वशत घेतलें । तया पिशाचत्व आलें ।
त्याणें तुझे सुत मारिले । कर्म[2] केलें पाहिजे त्याचें ॥३॥

दे द्र व्य तद्गोत्रासी[3] । सेवीं मास एक गुरूसी ।
येरू म्हणे न मजपाशीं । द्रव्य गुरूसी सेवीं भावें ॥४॥

अ भ यं कर रक्षु ऐसें । म्हणूनी सेवितसे ।
स्वप्नीं भूत मारीतसे । राखीतसे गुरु तिसी ॥५॥

सांगे तत् परिहार जसा । जागेपणें करी तसा ।
तेणें मुक्त झाला पिसा । गुरु प्रसाद दे तिला ॥६॥

ती दो न पुत्र प्रसवे । ते दोघे दिसती बरवे ।
थोर होतां व्रत करावें । म्हणुनी वेंचिती ते द्रव्य ॥७॥

श्रेष्ठ त नयाचें व्रत । आरंभितां धनुर्वात ।
होवोनि तो वांकत । सन्निपात न शमे यत्नें ॥८॥

तो त द्भा वें फिरवी नेत्र । मरे होतां अर्धरात्र ।
माता रडे पिटी गात्र । बोधमात्र नायके ती ॥९॥

दिव स मध्यान्हीही येतां । जाळाया ती न दे प्रेता ।
ब्रह्मचारी स्पष्ट वक्ता । तेथें येता झाला तेव्हां ॥१०॥

---

१ मृताः पुत्राः यस्य. २ क्रिया. ३ त्याच्या वंशजास किंवा त्या गोत्राच्या ब्राह्मणास.

इतिश्री० प० प० वा० स० गु० समंधपरिहारो नाम
विंशो० ॥ २० ॥ ग्रं० सं० ॥ २२० ॥

तो हो **य** गुरूनाथ । तियेप्रति सांगे हित ।
कोण कोणाचा हो सुत । वद ज्ञात असे तर ॥१॥
पृथ्व्यप् **ते** जो वाताकाश । हेच आले आकारास ।
मायामय संबंधास । तूंचि खास रडशी कीं ॥२॥
जरी **सू** नु तुझा हाचि । पूर्वापर असे साची ।
सांग कथा प्राग्जन्माची । तूं कोणाची स्त्री कीं माता ।३।
जैं सू **र्यो** दयास्तानें । नित्य दिन रात होणें ।
तेवीं कर्में जन्ममरणें । भोगणें सुखदुःख ॥४॥
कोणी **न** हें निवारिती । गुणमय ते मरती ।
देवादिकां हीच गती । मेला मागुती न ये शोकें ॥५॥
दे हा **श** व जाळावया । ती म्हणे जो दे अभया ।
बाध ये कीं त्याचा वाक्या । कोण तया पुढें भजे ॥६॥
सांगे **शां** त ब्रह्मचारी । हें जा पूस औदुंबरी ।
येरू शव बांधुनी उदरीं । पादुकेवरी शिर हाणी ॥७॥
बोल **को** णाचा ऐकेना । लोक गेले स्वसदना ।
पतिसह ती अंगना । आक्रोशना करीतसे ॥८॥
स्वप्नीं **न** को रडूं म्हणून । स्वामी देती आश्वासन ।
पाहे जागी होवून । पुत्र संजीवन झाला ॥९॥
विप्र **पा** हांटेस आले । त्याणीं नवल हें ऐकिलें ।
सर्वां आश्चर्य तें झालें । असें झालें वाणूं किती ॥१०॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे मृतपुत्रसंजीवनं नाम
एकविंशो० ॥ २१ ॥ ग्रं० सं० ॥ २३० ॥

गुरु व से गाणगापुरीं । तेथें काय लीला करी ।
असें विप्रें पुसतां बरी । लीला सारी सांगे सिद्ध ॥१॥

मी तों क: पदार्थ येथ । वर्णावया सर्व चरित ।
होती ब्रह्मादि कुंठित । तेव्हां संक्षिप्त सांगतों ॥२॥

अंमे य कीर्ति गुरु आले । भीमामरजासंगमीं भले ।
गाणगापुरीं राहिले । बैसले अश्वत्थीं ते ॥३॥

हो य द्व त्या गृह पावन । तो विप्रगृहीं येऊन ।
वांझमहिषी पाहून । ब्राह्मणस्त्रीतें बोले ॥४॥

सु स त्वा तूं दे क्षीरपान । ब्राह्मणी बोले वचन ।
वांझ म्हैस हे दुभे न । गुरु दोहून दावीं म्हणे ॥५॥

मानू न ती दोही क्षीर । दोन घडे दोहिलें क्षीर ।
गुरु पिऊनी देती वर । हो दारिद्र दूर म्हणूनी ॥६॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे वंध्यामहिषीदोहनं नाम
द्वाविंशो० ॥ २२ ॥ ग्रं० सं० ॥ २३६ ॥

ही का नि वार्ता ऐकून । सर्व पुसे नृप येऊन ।
गुरुमहात्म्य ऐकून । ससैन्य येऊन प्रार्थी ॥१॥

म्हणे व सूनी[2] गांवांत । उद्धरीं आम्हां तूं दैवत ।
तें मानी गुरुनाथ । पालखींत बसवी भूप ॥२॥

---

१ अपरिमित. २ राहून.

न वै **तैं** ते प्रभुधियः । परतंत्रास्तथाऽपि हि ।
भक्तिप्रियो भक्तिगम्यो । भक्ताधीनत्वमेत्यजः ॥३॥
भूपें **ते** व्हां उत्सवून । त्यां आणिलें पालखींतून ।
अश्वत्थातळीं येऊन । ब्रह्मराक्षसा पहाती ॥४॥
तोही **त** यापदीं लागे । गुरू राक्षसासी सांगे ।
संगमीं न्हातां तूं वेगें । होसी अंगें येथ मुक्त ॥५॥
तो त **द्धा** मीं पावला । ग्रामीं मठ गुरूला दिल्हा ।
ऐकूनि गुरूची लीला । निंदी तयांला एक यती ॥६॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० ब्रह्मराक्षसोद्धरणं नाम
त्रयोविंशो० ॥ २३ ॥ ग्रं० सं० ॥ २४२ ॥

तो कु **म** सीग्रामीं वसे । तेथ ससैन्य गुरु येतसे ।
त्रिविक्रमा ध्यानीं दिसे । देव येतसे नदीतीरीं ॥१॥
तेथें **प** ळत ये यती । तया दिसे सैन्य यती ।
गुरु त्याचा गर्व हरती । त्या दाविती निजरूप ॥२॥
तो क **र** जोडुनी प्रार्थी । गुरु तया गती देती ।
गाणगापुरीं मागुती । गुरु येती सैन्यासह ॥३॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे विश्वरूपदर्शनं नाम
चतुर्विंशो० ॥ २४ ॥ ग्रं० सं० ॥ २४५ ॥

हो ते **मं** दधी ब्राह्मण । म्लेच्छराजापुढें येऊन ।
सार्थवेद म्हणून । घेती धन उन्मत्त ते ॥१॥

---

१ परमेश्वराच्या बुद्धी परतंत्र असत नाहींत तथापि परमेश्वर भक्तिप्रिय असल्यामुळें भक्तांच्या स्वाधीन होतो.

म्लेच्छा म दोन्मत्त विप्र । म्हणती आज्ञा द्यावी क्षिप्र[1] ।
वादें जिंकूं लोकीं विप्र । हारिपत्र किंवा घेवूं ॥२॥
राव म हा नंदें देत । आज्ञा बसवी पालखींत ।
विप्र राजे म्हणवीत । भूमी जिंकिन येती तेथ ॥३॥
ते कु म सीमध्यें यती । त्रिविक्रमभारती ।
त्रिवेदी जाणुनियां येती । त्या म्हणती वाद करीं ॥४॥
जरी मै त्र द्विज असे । तरी करील कीं असें ।
कुबुद्धी हे विप्र जसे । हरती तसें करावें ॥५॥
यांची वां छा गुरु पुरवील । असें म्हणोनी त्यां तत्काल ।
यती आणी गुरूजवळ । सांगे सकळ त्रिविक्रम ॥६॥
वाद्यां शो धीत हे आले । यांणी माझें न ऐकिलें ।
मग येथें आणिले । यां शिक्षिले पाहिजेत ॥७॥
गुरू जी म्हणती तयां । नेणो आम्ही जयाऽजया ।
वाद आम्हां कासया । तुम्हीं वायां मरूं नका ॥८॥
विप्र व चन बोलती । तुम्हां काय विद्या येती ।
तें ऐकुनि गुरु म्हणती । गर्व किती करितां हा ॥९॥
गर्वें लो कीं किती मेले । बाण रावण खपले ।
व्यर्थ कौरवादी मेले । आरंभिलें काय हें तुम्हीं ॥१०॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे उन्मत्तद्विजाख्यानं नाम
पंचविशो० ॥ २५ ॥ ग्रं० सं० ॥ २५५ ॥

वेद के वळ म्हणावया । हो सायास ऋषित्रयीं ।

---

१ त्वरित.

कलियुगीं अल्पायुष्यां । केवीं आम्नायांतीं[1] गती ॥१॥

चिरं **जी** व भरद्वाज । ब्रह्मा पुसे वेदगुज ।

तीन राशी दावी अजें[2] । ऋषी लाजला तेधवा ॥२॥

दे दे **व** मुष्टी तीन । न तया आले अजून ।

हे अनंत वेद जाण । त्रिभागून ठेविले तूर्त ॥३॥

विष्णु **भू** तळीं व्यासरूपी । चौशिष्यां चार निरूपी ।

वेदशाखा विभागरूपी । पैला निरूपी ऋग्वेद ॥४॥

शुद्धां **तः** करणें पैला । ऐक सांगों ऋग्वेदाला ।

द्व्यरत्निमात्र रूप त्याला । व्यक्तगळा दीर्घदृष्टी ॥५॥

रवि **स** मान कांति ज्यांची । अत्रिगोत्र देवता ज्याची ।

ब्रह्मा गायत्री छंदची । आयुर्वेदचि उपवेद ॥६॥

शाखा **ना** में भेद पांच । सहा अंगें ब्राह्मणच ।

अरणेंशीं हो वेदच । पैलासच व्यास सांगे ॥७॥

शिष्य **त** याचा दुसरा । वैशंपायन नामें बरा ।

तया यजुर्वेद दुसरा । सांगे बरा विभागून ॥८॥

सुम **नः** प्रीती जो यजनें । करी पंचारत्नी मानें ।

भारद्वाज गोत्र जाणें । कृशपणें त्रिष्टुप्छंद ॥९॥

दैव **म** हा विष्णु ज्याचें । उपवेद धनु ज्याचें ।

सूर्याभ जो भेद त्याचे । जाण साचे ऱ्याऐशींच ॥१०॥

सुम **नः** प्रीती दे स्तवनें । सामवेद अभिधानें ।

षडरत्निमितमानें । जैमिनीनें घेतला हा ॥११॥

---

१ सर्व वेद. २ ब्रह्मदेव.

विशे ष हा शांत दांत । असे चर्मदंडहस्त ।
गोत्र काश्यप दैवत । रुद्रख्यात जगतीछंद ॥१२॥

जो ओ ष्ठा रक्त असे । याच्या भेदां मिती नसे ।
ज्याचा उपवेद असे । गंधर्व असें सांगे व्यास ॥१३॥

भुव नीं सांग भेद याचे । कोण बोलेल वाचे ।
सांगोपांग वदतां वाचे । शेषाचेही ये शीण ॥१४॥

अर्ती द्रि य ज्ञाता व्यास । ऐक म्हणे सुमंतूस ।
सांगे अथर्ववेदास । हो देवेश देव त्याचा ॥१५॥

असे या चा उपवेद । अस्त्र वेद तिसरा छंद ।
गोत्र बैजान स्वछंद । नऊ भेद कल्प पांच ॥१६॥

हे को णि चारही पूर्ण । एवढे न जाणिले जाण ।
एक शाखा ही अपूर्ण । तुम्हीं पढून सर्वज्ञ कीं ॥१७॥

जे वि प्र धर्मयुक्त । विष्णु मानी त्यां दैवत ।
वेदबळें हस्तगत । तयां होत देवादिक ॥१८॥

जे स्व कृ त्या सोडुनी देती । म्लेच्छापुढें वेद पढती ।
ब्राह्मणातें जिंकिती । ते होती ब्रह्मराक्षस ॥१९॥

वद ति असें गुरु तरी । ते म्हणती वाद करीं ।
जयपत्र द्या नातरीं । आमुची थोरवी न राहे ॥२०॥

इतिश्री० प० वा० स० वि० चतुर्वेदकथनं नाम
षड्विंशो० ॥ २६ ॥ ग्रं० ॥ २७५ ॥

हूं आ स्था पूर्ण करूं । असें म्हणूनि श्रीगुरू ।
दूर पाहती मांग नरू । शिष्यां निरूपिती आणाया ॥१॥

जाउ नि शिष्यें तयां । आणिती गुरुराया ।
सात रेखा काढूनियां । आणिती तयांवरी तया ॥२॥
तो एक एक लंघितां । सांगे सप्तजन्मवार्ता ।
अंतीं विद्वद्द्विज म्हणतां । जिंक विप्रां म्हणती गुरु ॥३॥
साम र्षे तो पुढें होतां । ये त्यां विप्रां मूढता ।
द्वादशाब्द राक्षसता । ये मुक्तता त्यानंतर ॥४॥
दुर्ग ति त्यां अनुतापानें । ये स्वल्प गुरुकृपेनें ।
विप्र होवुनि मांगानें । गाऱ्हाणें गुरूसी केलें ॥५॥
सद्वं शा जद्विज असून । केंवि झालों जातिहीन ।
हें सांगा विस्तारून । तें ऐकून गुरु सांगे ॥६॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे द्विजगर्वपरिहारो नाम
सप्तविंशो० ॥ २७ ॥ ग्रं० सं० ॥ २८१ ॥

जो दू री त्यजि धर्मास । मायबापदेवगुरूस ।
निर्दोष स्त्रीपुत्रास । चोर असत्यवादी जो ॥१॥
जो नि रं तर अशुद्ध । हरिहरां करी भेद ।
हो पाखंड दुर्वाद । पंक्तिभेद करी खळ ॥२॥
मारी य त्नें जीवा क्रूर । जाळी वनग्रामघर ।
विकी कन्या गोरस मंत्र । फिरवी विप्रअतिथीतें ॥३॥
जो निं द क श्राद्धातें । न करी फोडी कूपातें ।
तोडी मार्गाश्रयवृक्षातें । जेवी व्रतातें सोडून ॥४॥
जो दि वा पर्वणीं स्त्रीशीं । भोगी रमे परस्त्रीसी ।
करी विश्वासघातासी । दत्तदानासी घे पुनः ॥५॥

जो स्व **प्रो** पम सुखार्थ । मारणादि करी व्यर्थ ।
परतापी करी अनर्थ । नाडी नेणत दे औषध ॥६॥
तो प **ति** त होयी मांग । जो करी वृषलीसंग ।
करी स्नान संध्या त्याग । पंचयाग टाकून जेवी ॥७॥
जो हो **य** वृत्तिरत्नहर्ता । दुष्प्रतिग्रही दुर्भोक्ता ।
मद्य पीता ये हीनता । अनुतप्ता दोष थोडा ॥८॥
जो लु **चा** जिती विप्रांस । हूं तूं करी पितृगुरूंस ।
तो होयी ब्रह्मराक्षस । हो वायस निर्मंत्राशी ॥९॥
तो क **प्यु** दरीं जन्म घे । चोरूनि जो फळपत्र घे ।
जो धन चोरुनि घे । जन्म घे तो उंटाचें ॥१०॥
हो उ **त्क्रा** न्ती नंतर । नरकवास घोर ।
ह्या योनी त्या नंतर । दंभकर बगळा हो ॥११॥
माशी **म** धुहर उंदीर । धान्यहर जळहर ।
चातक पशु तृणहर । स्वर्णहर कृमिकीट ॥१२॥
दुर्ग **ती** आधीं भोगून । होतां पुण्यपाप समान ।
अंधपंग्वाद्यघचिन्ह । ये घेऊन येथें पुनः ॥१३॥
कृमी **श्व** खर जारकर्में । स्त्री नरां गती हे दुष्कर्में ।
जे वागती सत्कर्में । स्वधर्में तरती ते ॥१४॥
हो प **र:** स्पर दंपती । दोषी ऐसें गुरु बोलती ।
पुसे त्रिविक्रम निष्कृती । सांगती गुरु तया ॥१५॥
तरी **गृ** हीत ब्रह्मदंड । शरण विप्रां पापखंड ।
हो होतां पाप उदंड । कृच्छ्र मुंडपूर्वक कीजे ॥१६॥

शक्ति **ह्री** नें गोधन द्यावें । जप यात्रा होम करावे ।
शक्तें चांद्रायण करावें । गव्य प्यावें अनुतापें ॥१७॥
स्वात्म **त्वै** श्वर्ययुक्त । गुरु वारी सर्व दुरित ।
पितृत्यागें हो पतित । होई पूत मासस्नानें ॥१८॥
पति **ता** नें तें ऐकून । म्हटलें मी झालों पावन ।
घ्या विप्रांत मेळवून । तें ऐकून गुरू म्हणे ॥१९॥
होउ **नि** नृप विश्वामित्र । सायासें झाला पवित्र ।
तूं हीन वेदापात्र । ये परत्र विप्रकुळीं ॥२०॥
तो आ **सं** न येतां स्त्रीला । स्पर्शभयें मारूं आला ।
गुरु म्हणे त्यजीं न स्त्रीला । तो म्हणाला हीन होउं कीं२१
ते त **या** अंगींची विभूती । लुब्धाहातीं धुवविती ।
ज्ञान जाउनी त्या ये भ्राति । घराप्रति गेला सस्त्रीका२२
प्रण **ति** करी त्रिविक्रम । म्हणे वारा माझा भ्रम ।
अंग धूतां ज्ञान उत्तम । जाउनी भ्रम त्या हो केंवी ।२३।

इतिश्री० प० प० वा० स० सारे कर्मविपाककथनं नाम
अष्टाविंशो० ॥ २८ ॥ ग्रं० सं० ॥ ३०४ ॥

बर **वा** प्रश्न ऐकून । गुरु म्हणे भस्में ज्ञान ।
दिधलें तें धूतां जाण । जाऊन हो अज्ञानी ॥१॥
पूर्व **यु** गीं वामदेव । क्रौंचवनीं घेयी ठाव ।
त्या पाहुनि घेयी धांव । दुर्भाव तो राक्षस ॥२॥
तो दु **र्ग** धांगीं तेव्हां । धरी भक्षूं वामदेवा ।
भस्म लागतां दुर्भावा । त्यजुनी भवा पूर्वा स्मरे ॥३॥

तृट्क्षु **घा** शांत झाली । म्हणे पंचवीस आपुलीं ।
स्पष्ट जन्में म्यां स्मरलीं । भूपकुलीं मी दुर्जय ॥४॥

धरु **नि** मी भोगीं स्त्रिया । राज्यमदें करूनियां ।
चारी वर्णांच्याही भार्या । भोगी वेश्या असंख्यात ॥५॥

अवि **वा** हितांही भोगीं । रजस्वलाही न त्यागीं ।
पुढें दैवें झालों रोगी । शत्रु वेगीं घेती राज्य ॥६॥

दुरा **शा** यें पाप केलें । स्त्रियांनीं बहु शापिलें ।
क्षयरोगें ग्रासियलें । अंतीं आले यमदूत ॥७॥

अप **यात्** क्षय आयुषः । हें कळलें निर्दोष ।
मी मरतां यमपुरुष । न्हेती दोष क्षाळावया ॥८॥

भी दे **श्रो** त्रा यातना ती । पित्रांसह भोगुनी अंतीं ।
अंगीं शिश्नें हजार होतीं । प्रेतगती ये ती मला ॥९॥

तें गा **त्र** ही सोडूनी । मी चोवीस भोगीं योनी ।
ब्रह्मराक्षस होउनी । राहें वनीं सदां भुका ॥१०॥

ह्या प **श्च** विसाव्या जन्मीं । गजा खातांही भुका मी ।
स्पर्शमात्रें शांती तुम्हीं । दिल्ही तुम्ही साक्षाद्देव ॥११॥

गेले **क्षु** त्पिपासादि । याचा हेतू सांगा आधीं ।
वामदेव म्हणे शुद्धी । झाली आधी गेला भस्में ॥१२॥

भस्म **स्प** र्शें एक जाण । द्राविड जार ब्राह्मण ।
त्यजिला शूद्रें मारून । ये श्वान त्यावरि एक ॥१३॥

श्वस्प **र्शा** नें तदंगस्थ । भस्म लागुनी झाला मृत ।
त्यातें न्हेती यमदूत । शिवदूत सोडविती ॥१४॥

त्या सा **नं** दें कैलासातें । न्हेतां यम आला त्यातें ।
धर्म सांगून विप्रातें । दूत न्हेते झाले तया ॥१५॥

शंभु **च** जाणे तन्माहात्म्या । भस्म लावीं मीं सर्वकाया ।
लागलें किंचित् तुझ्या काया । ज्ञान तयायोगें हो हें १६

वदे **र** क्ष राज्य करितां । वापी केल्या निर्जळपंथा ।
विप्रां वृत्ति दिधल्या आतां । आलें हातां त्याचें फळ १७

सांगे **स** विस्तर मला । भस्मधारण विधीला ।
वामदेव म्हणे शिवाला । प्रश्न केला हा कुमारें ॥१८॥

मग **नं** दीगौरीयुक्त । शिव बसे देवांसहित ।
सनत्कुमार वंदुनी तेथ । करीतसे हा प्रश्न ॥१९॥

भो व्या **घ्रा** जिनवास । चतुर्विध पुमर्थांस ।
देई शीघ्र असें आम्हांस । सांगा खास स्वल्प साधन २०

त्यां म्ह **ण** तसे ईश । धारण करीं भस्मास ।
चतुर्विध पुमर्थांस । दे हें खास सुसाधन ॥२१॥

न ग **मे** ऐसें सुसाधन । गोमयें अग्निहोत्रांतून ।
भस्म घेईं करीं धारण । भ्रूसमान त्रिपुंड्रेंसी ॥२२॥

हो न **व** देवादिक । एका एका पुंड्री देख ।
मध्यांगुष्ठानामिका । काढीं रेखा शीर्षादिकीं ॥२३॥

हो हें **च** पापशमन । असें वामदेव सांगून ।
करवी भस्मधारण । उद्धरून गेला राक्षस ॥२४॥

गुरू **अ** सें सांगती । सर्व आनंदीत होती ।
गेला त्रिविक्रमयती । कथा पुढती सांगों ऐक॥२५॥

इतिश्री० प० प० वा० स० सारे भस्ममहिमावर्णनं नाम
एकोनत्रिंशो० ॥ ग्रं० सं० ॥ ३२९ ॥

**दत्ता धि** ष्ठित माहोर । तेथें गोपीनाथ विप्र ।
तया होउनी मेले पुत्र । दत्तवर वांचवी एक ॥१॥

**ते नि ष्ठा** दत्तावर । ठेउनी करिती संस्कार ।
त्याचा विवाह केला थोर । हर्षे सादर मायबापें ॥२॥

**त्यां हो य** रूप समान । साजे जोडें देवासमान ।
पतिसेवेवांचून । सतीमन न विसंबे ॥३॥

**सून म** हा पतिव्रता । तयां हर्ष हो पहातां ।
तंव आली दुर्दैवता । रोग सुता त्या हो असाध्य ॥४॥

**होऊ न** क्षयरोग । क्षीण झालें पतिचें आंग ।
जेवीना तो तसी चांग । सती हो रोग नसतांही ॥५॥

**हो प श्चा** त्ताप द्विजाला । व्यर्थ वरिली सुभगेला ।
म्हणे तुझा भोग सरला । माहेराला जाईं सुखें ॥६॥

**ती भ यं** कर वाचा । ऐकून म्हणे तुमचा ।
जेथ देह तेथ हा साचा । असे तुमचा अर्धात्मा हा॥७॥

**नसो वि** योग म्हणून । सासुसासऱ्यां प्रार्थून ।
धवा घेऊन डोळींतून । ये गाणगाभुवना ॥८॥

**त्रिदो ष** वाढुनी जाण । द्विज झाला गतप्राण ।
सती उठे द्याया प्राण । निवारण करी जन ॥९॥

**ती त या** चे आठवी गूण । रडे शीर्ष आपटून ।
म्हणे रुसे गौरिरमण । कोण चोरुन ने सौभाग्या॥१०॥

जैं घे **नु** जातां शरण । राखुनि घे यवन प्राण ।
भेटूं जातां देवा पडून । टाकी चुरून देऊळ कीं॥११॥
तेणें **प** री झालें मज । देवा शरण येतां आज ।
न राखसी माझी लाज । देवा तुज कींव न ये कीं॥१२॥
ती अ **से** करी विलाप । तंव आला आपोआप ।
तो दीनाचा मायबाप । गुरू रूप पालटोन ॥१३॥
तीसि **व** दे कां रडसी । जीव ये कीं रडतां यासी ।
मायामय संबंधासी । व्यर्थ म्हणसी पति मेला॥१४॥
देव **ते** ही काळाधीन । तुम्ही तरी मर्त्य जाण ।
पाहू जातां विचारून । मेला कोण कोण जन्मला॥१५॥
देह **उ** त्पन्न होऊन । मरे त्याहुन विलक्षण ।
आत्मा नित्य विकारहीन । संबंधी न कवणाचा तो १६
त्या उ **त्क्रा** न्ती व्यापका कैंची । वार्ता न त्या संबंधाची ।
नदीकाष्ठवत् हो देहांची । भेटी हेची कर्मयोगें ॥१७॥
ह्या अ **मं** गळ देहाच्या । तादात्म्यें भ्रम कर्मांचा ।
गुणमूल अज्ञानाचा । हो कीं साचा परिणाम ॥१८॥
तूं अ **तं** द्रित होऊन । दे हा संबंध सोडून ।
जेणें जासी उद्धरून । तें साधून घेईं शीघ्र ॥१९॥
रक्ता **स्थि** मांसा न रडें । हें ऐकून ती पायां पडे ।
म्हणे बापा शोकीं पडे । काढा कडे सोयरे तुम्ही॥२०॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे प्रेतांगनाशोको **नाम**
त्रिंशो० ॥ ३० ॥ ग्रं० सं० ॥ ३४९ ॥

म्हणे **तं** द्रि[1] सोडुनि ऐक । वाढे विंध व्यापी अर्क ।
तेव्हां जाती वृंदारकें[2] । काशीमध्यें तद्गुरुपाशीं ॥१॥
स्तवि **वा** क्पति[3] अगस्त्यातें । लोपामुद्रा साध्वीतें ।
त्वत्सम नान्या पतिव्रते । पतिदेवते तूं धन्या ॥२॥
कदा **पि** न स्वतंत्रता । पतिसेवननिरता ।
छायेपरी पतिदेवता । पतिव्रता ती पतिचित्ता ॥३॥
जेवी **भुं** जीतां पति । पतिपूर्वीं स्नान करी ती ।
उठे आधीं निजे उपरांतीं । न बसे ती पतिपुढें ॥४॥
जी न **जा** य घराबाहेर । करी पत्युच्छिष्टाहार ।
पतिवचनीं जी सादर । निरंतर अनुकूल ॥५॥
जी आ **नं** दे दैवलाभें । वस्त्रभूषणीं न क्षोभे ।
धर्म सोडिना देहलोभें । ती शोभे निजधर्में ॥६॥
न घे **वा** र्ता श्रीमंताची । मर्यादा धरी वडिलांची ।
स्वातंत्र्यें ती व्रताची । आशा साची नच करी ॥७॥
देव **गु** रू सर्व पती । मानुनी वाद न करिती ।
पतिसवें ज्या भांडती । भालु होती भुंकती त्या ॥८॥
न को **णा** सीं भेद कीजे । धवा वंचुनी खाइजे ।
वृक्षीं लोंबे वागुळी जे । खायी निजमळमूत्र ॥९॥
धर्मा **न्वि** त राहतां । दैवें पति मरतां ।
सवें जाय पतिव्रता । न वियुक्ता छायेपरी ॥१०॥

---

१ आळस. २ देव. ३ बृहस्पति.

इतिश्री० प० वा० स० वि० सारे पतिव्रताधर्मनिरूपणं नाम एकत्रिंशो ॥ ३१ ॥ ग्रं० सं० ॥ ३५९ ॥

पर **तं** त्र न रहावें । धवासवें सतीनें जावें ।
पदोपदीं मेधफल[1] घ्यावें । स्थान घ्यावें पतिलोकीं ॥१॥
किंवा **वि** धवा धर्म । पाळितां ही ये शर्म[2] ।
पोर असतां कीजे भर्म[3] । राहिजे ब्रह्मचाऱ्यापरी ॥२॥
स्वल्प **मू** लही असतां । पोटीं गर्भ असतां ।
पतिशव न मिळतां । सवें जातां दोष असे ॥३॥
ज्या मू **ढा** केश राखती । धवासह त्यां हो दुर्गती ।
अतएव मरतां पति । करो ती केशवपन ॥४॥
शय **ना** तें खाटेवरी । जी करी जाय ती नारी ।
नरकीं यास्तव भूमीवरी । निजो नारी एकाहारा ॥५॥
भूषा **नु** लेप तांबूल । त्यजुनी राखिजे शील ।
नेसावें शुभ्रचैल[4] । मंगलस्नान वर्जावें ॥६॥
विष्णु **प** तिसम मानून । कीजे वैधव्य आचरण ।
न कीजे नरवीक्षण । चांद्रायण शक्त्या कीजे ॥७॥
अव **श्यं** भावि होईजे । त्याचा शोक नच कीजे ।
मासव्रत पाळिजे । माघ ऊर्ज[5] वैशाखीं हो ॥८॥
सुम **ति** जी वागे ऐसी । सहगमनवत् फल तीसी ।
जायी घेउनी पतिसी । स्वर्गीं ऐसी गुरूक्ती हे ॥९॥
म्हणे **प** तिव्रता मातें । वैधव्य हें न रुचतें ।

---

१ यज्ञफल. २ सुख. ३ पोषण. ४ वस्त्र. ५ कार्तिक.

तारुण्य हें विप्रातें। देई असें मातें वाटे ॥१०॥
अव **श्यं** कुरु ऐसें। बोलुनी तो देतसे।
चार अक्ष[1] भस्म परीसें। म्हणतसे त्या सतीतें॥११॥
हे भू[2] **ति** शिरीं लावून। पतिकर्णीं अक्ष[1] बांधून।
गुरुदर्शन घेऊन। सहगमन करीं मग ॥१२॥
तो आ **ज्ञा** अशी देवुन। गेला, साध्वी दानें देऊन।
पतिशवा नेववून। अग्नि घेऊन पुढें चाले ॥१३॥
पाहु **न** नारी म्हणती। केश साडेतीन कोटी।
होमुनी स्वर्गीं घे ती। वर्षकोटी प्रतिकेशा ॥१४॥
सर्व **च** मत्कार पाहाती। स्मशानीं ये मंदगती।
अग्निसिद्ध करोनी ती। आठवी चित्तीं उपदेशा॥१५॥
स्व च **क्षु** नें गुरु पाहून। म्हणे सहगमन करीन।
विप्रें शीघ्र ये म्हणून। वदतां मनस्विनी गेली ॥१६॥
जैं उ **षः** [3]काळीं विजन[4]। गजबजती तैसे जन।
सवें येती गजबजून। गुरुस्तवन मार्गी करी ॥१७॥
सती **य** तीशा पाहून। करी साष्टांग नमन।
पञ्च पुत्रा हो म्हणून। आशीर्वचन दे गुरू ॥१८॥
हें स्व **तं** त्र बोलतां जन। देती साद्यंत सांगून।
गुरु प्रेता आणवून। करी स्नपन रुद्रतीर्थें ॥१९॥
तव **तो** उठोनी बैसला। नग्न म्हणूनी लाजला।
सर्व लोकां हर्ष झाला। न मावला साध्वी देहीं ॥२०॥

---

१ रुद्राक्ष. २ भस्म. ३ पहाटेस. ४ पक्षी समूह.

दैव **यो** गें स्वर्णघट । रंका मिळतां अवचट ।
हर्ष हो तेंवी तिला स्पष्ट । उत्कट हो हर्ष तेव्हां ॥२१॥

प्रेम **गि** रा दोघें स्तविती । श्रीगुरु वर देती ।
गेले दोष ये सद्गती । लोहां गती जेवीं परिसें॥२२॥

लिही **न** याला विधी लेख । धूर्त पुसे गुरु म्हणे ऐक ।
पुढचा शतायुष्य लेख । दिल्हा सम्यक् मागून मी॥२३॥

मनं[1] **श्रै** त्य गुरु असें बोले । लोकीं जय शब्द केले ।
दंपतीनें स्नान केलें । मठीं आले गुरु त्यासह ॥२४॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० प्रेतसंजीवनं नाम
द्वात्रिंशो० ॥ ३२ ॥ ग्रं० सं० ॥ ३८३ ॥

ती आ **नं** द भावें नमुनि । म्हणे काल भेटला मुनि ।
गुरु बोले मग हांसोनी । पालटोनी रूप मी आलों॥१॥

तुझें **प** र प्रेम पाहिलें । रुद्राक्ष मींच दिल्हे ।
रुद्रतीर्थें वांचविलें । ऐक बाले नवल हें ॥२॥

अत्र **श्यं** हे ल्यावे सादर । पूर्वी काश्मीरेशकुमार ।
प्रधानाचाही कुमार । अलंकार टाकून देती ॥३॥

त्यां भ्रां **त्या** पिसे म्हणती । भस्मरुद्राक्षातें धरिती ।
पराशरा पुसे नृपति । हेतू वदती मुनी भूपा ॥४॥

सर्वा **त्म** शिवा हे भजती । नंदिग्रामीं वेश्या सती ।
वैश्यरूपें गौरीपती । ये तीप्रती वळखावया ॥५॥

अन **न्य** स्त्री त्र्यहे[2] होवून । रतिदानें घे लिंग कंकण ।

---

१ उपलक्षण मन आदिकरणाचा प्रेरक. २ तीन दिवस.

तो बोले लिंग नाशन । होतां प्राण त्यजीन मी ॥६॥
त्याच्या **व** चना मानून । मंडपीं ठेवी लिंगरत्न ।
रमे वैश्या गृहीं नेऊन । जळे लिंगासह मंडप ॥७॥
वैश्य **स्थि** रवून मन । लिंग जळालें पाहून ।
करी अग्निप्रवेशन । सर्व दान देई वेश्या ॥८॥
निघे **तं** व लोक म्हणती । वेश्येघरीं किती येती ।
कोणाची तूं कशी सती । नायकतां ती आग रिघे॥९॥
तैं हो **य** शिव प्रसन्न । तिला नेयी उद्धरून ।
तिणें जे रुद्राश ल्येवून । कुक्कुट मर्कट पाळिले॥१०॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० रुद्राक्षमहिमावर्णनं नाम त्रयस्त्रिंशो० ॥ ३३ ॥ ग्रं० सं० ॥ ३९३ ॥

ते हो **त** हे अक्षप्रिय । भूप म्हणे वदा भविष्य ।
मुनि म्हणे सप्ताहायुष्य । तुझा तनय असे तरी ॥१॥
वेदा **न्तो** पनिपत्सारा । रुद्रा विधि दे मुनीश्वरां ।
करी अधर्मसंहारा । यमपुरा वोस करी ॥२॥
तज्ज्ञा **प्य** नु भुवायम । कथी तया म्हणे ब्रह्मा ।
अभाविका हो अधर्म । भाविकां शर्म दे हा रुद्र ॥३॥
मृत्यु **कृ** तभय जाया । रुद्रें अर्चीं मृत्युंजया ।
मग रुद्राभिषेक राया । द्विजवर्यांकरवीं करी ॥४॥
त्या सु **ता** सातवे दिनीं । मृत्यु येतां तीर्थे मुनी ।
प्रोक्षी शिवदूत येउनी । मृत्युदूतां पळविले ॥५॥
धर्मा **त्मा** जो यम त्याप्रती । ते जाउनी सांगती ।

यम पुसे शैवांप्रती । ते म्हणती लेख पहा ॥६॥
तें मा नो नी चित्रगुप्ता । करवीं लेख पाहतां ।
यम हो भ्रांत शिवदूतां । क्षमा मागता जाहला ॥७॥
गेलें नै मित्तिकारिष्ट । नृप विप्रां करी तुष्ट ।
तों नारद तें अदृष्ट । सांगे स्पष्ट ऋष्युपकार ॥८॥
महा नं द सर्वां झाला । अयुतायू सुत जाहला ।
गुरु सांगे सतीला । ती गुरूला प्रार्थुनी म्हणे ॥९॥

इतिश्री० प० प० स० वि० सारे रुद्राभिषेकफलकथनं नाम चतुस्त्रिंशो० ॥ ३४ ॥ ग्रं० सं० ॥ ४०२ ॥

मंत्रो प देश द्या मला । तेणें नित्य स्मरूं तुम्हांला ।
गुरु म्हणे स्त्री मंत्राला । पात्र न तिला पतिसेवा ॥१॥
अव श्य ऐकें ही कथा । देवीं दैत्यां रणीं मारितां ।
तयां संजीवनी जपतां । वांचविता होय भार्गव ॥२॥
अचि न्त्य मंत्रविद्याशक्ती । इंद्र सांगे शिवाप्रती ।
आणवून शुक्राप्रती । उमापती भक्षीतसे ॥३॥
तो त्या चे मूत्रद्वारा । पडे वांचवी पुनः क्रूरां[१] ।
बृहस्पती म्हणे इंद्रा । बुडवूं मंत्र षट्कर्णशी ॥४॥
असें त या बोलून । स्वसुता कचा दे धाडून ।
कपटी शिष्य होवून । शुक्रा सेवून तो राहे ॥५॥
न वा सः शुभदो नोऽस्यें[२] । असें मानुनी दैत्य ।
मारिती त्या वांचवी काव्य । द्विवार कन्यास्नेहें ॥६॥

---

१ क्रूर स्वभावाच्या दैत्यांना. २ हा येथें राहणें आम्हांला शुभ नव्हे.

दैत्य **य** त्नें त्या जाळून । त्याचें भस्म मद्यांतून ।
देती शुक्र पी नेणून । मग कन्या विरहें रडे ॥७॥
शुक्र **दा** ही दिशा देखे । शेखीं कचा पोटीं देखे ।
म्हणे देवयानी ऐकें । त्या आणितां मी मरेन ॥८॥
कन्या **दि** व्यमंत्र मागे । म्हणे कचा वांचवीं वेगें ।
मग मी तूतें मंत्रयोगें । बापा वेगें वांचवीन ॥९॥
देहा **त्य** जीन मी अन्यथा । अशी कन्योक्ति ऐकतां ।
आश्वासुनी मोहें पिता । मंत्र देता झाला तिला ॥१०॥
तो म **ग** जपे कचार्थ । तो ये त्याचें फोडुनी पोट ।
कन्या ताता उठवीत । कचा श्रुत झाला मंत्र ॥११॥
मंत्र **तं** त्र प्रगट होतां । तत्काळ ये निर्वीर्यता ।
शुक्रमंत्रा ये हीनता । आज्ञा घेता झाला कच ॥१२॥
कन्या **ते** व्हां वरीं म्हणे । विद्या देउनी दिल्हें जिणें ।
तूं भगिनी कच म्हणे । ती म्हणे विद्या विसर तूं ॥१३॥
कच **जो** रानें वदे तिला । विप्रावेगळा वरो तुला ।
शुक्र उपदेशी स्त्रीला । भ्रष्ट झाला मंत्र त्याचा ॥१४॥
ती द्वि **ज** पुत्री असतां । शापें झाली ययातिकांता ।
दोघां हानी मंत्र देतां । स्त्रिये व्रता आचरावें ॥१५॥
ती म **ग** म्हणे नाथा । व्रत एक सांगा आतां ।
गुरु म्हणे सोमव्रता । करितां सर्व सिद्धि होय ॥१६॥
हें स **द्भा** वें करीं परम । आर्यावर्तीं चित्रवर्मे ।
तया सीमंतिनीनाम । हो उत्तम कन्यारत्न ॥१७॥

तिये स चौदा वर्षें होतां । ये वैधव्य हें कळतां ।
तिनें मैत्रेयी प्रार्थितां । सोमव्रता ती सांगे ॥१८॥
निश्च य मनीं धरून । सोमवारीं उपोषण ।
किंवा नक्तभोजन । करिजे अर्चून गौरीशा ॥१९॥
दुरि ते ही नाशा जाती । सौभाग्य सुत राज्यासी ।
दे शीघ्र गौरीपती । अर्चितां त्या प्रदोषीं ॥२०॥
हो दुः खि त तरी व्रता । न सोडिजे सर्वथा ।
सीमंतिनी तें ऐकतां । करी व्रता दृढचित्तें ॥२१॥
दैवा लं घी कैसा कोण । चित्रांगदा ती देऊन ।
राजा गेहीं प्रेमें करून । घे ठेवून त्या जामाता॥२२॥
बुडे य युनेंत जामाता । कन्या प्राण त्यजूं उठतां ।
वारुनि घरा न्हे पिता । तरी व्रता ती न सोडी॥२३॥
मह च्च क्र काळाचें हें । कोणाचेनी दूर नोहे ।
तीचा श्वशुर शोकीं स्नेहें । त्या बांधून घे शत्रु राज्य।२४।
त्या इ न्द्र सेनसुता । पाताळीं न्हेति राजसुता ।
जीववुनी वासुकी वार्ता । पुसे, सर्व सांगे तया॥२५॥
तया म ग सर्पनाथ । म्हणे तुझें कोण दैवत ।
येरू म्हणे गौरीनाथ । मद्दैवत जगदीश ॥२६॥
तो त्या सि राहे म्हणे । चंद्रांगद पाठवा म्हणे ।
मद्विरहें माता शिणे । पत्नीं जिणें वेंचीलची ॥२७॥
तो ह य सर्पा सवें धाडी । वेगें आला यमुनाथडी ।
तेथ सीमंतिनी खडी । पाहतां वेडी हो तयासी॥२८॥

होस चा कीं हा मत्पति। ऐसें जंव चिंती चित्तीं।
तों येवून तो पुढती। वार्ता तिची पुसे तो ॥२९॥
संल ग्नौ दासिन्यदीना। कोण ही ऐसें पुसतां खुणा।
लाजुनी म्हणे सखीजनां। सर्व खुणा वदा ॥३०॥
सखी त या सर्व सांगे। तो वदे ईचा पति वेगें।
भेटेल हें न वाउगें। आण घे शंकराची ॥३१॥
स्वस त्ते नें सोडवी ताता। मायबापांची हरी चिंतां।
सीमंतीनीसी भेटता। झाला व्रताच्या प्रभावें ॥३२॥
भला जो डा तो शोभला। येउनी राज्यीं आरूढला।
असें व्रतें दे शिव भोला। फल तिला गुरु म्हणे॥३३॥
हें सा वि त्री व्रत तूं करीं। तथा म्हणुनी ती स्वीकारी।
निरोपें ये स्वमंदिरीं। धवासह नारी भेटे स्वकां।३४।
सुबु द्धि हो त्या दोघांची। जसी वाचा श्रीगुरूची।
फलप्राप्ती तसी हो साची। तैं दुःखाची कैंची वार्ता३५

इतिश्री० प० प० वा० स० सारे सीमंतिन्याख्यानकथनं नाम
पंचत्रिंशो० ॥ ३५ ॥ ग्रं० सं० ॥ ४३७ ॥

त्या ग्रा मा मध्यें एक। विप्र येक होता रंक।
भावें करी आन्हीक। हो विवेकशून्यता तत्त्वी ॥१॥
तो ने म धरूनी परान्न। सोडी, दंपती भोजन।
द्याया आला महाजन। स्त्री जाऊन प्रार्थी गुरूसी ॥२॥
हो ता कं ठभरूनि दीन। गुरु विप्रा बोलावून।
म्हणे इला जा घेऊन। तूं परान्न जेवाया ॥३॥

तीचें **गा** न्हाणें ऐकून । तिच्या पतीस जा म्हणून ।
गुरु सांगे तो मानून । तिला घेऊन गेला तो ॥४॥

तेथें **मा** निनी जेवितां । श्वसूकरोच्छिष्ट देतां ।
उठे पतीसह दुश्चित्ता । गुरुनाथा भेटती दोघे ॥५॥

नारी **वि** नवी क्षमापून । गुरु म्हणे धालें कीं मन ।
द्विज म्हणे नेम टाळून । भ्रष्ट होवून गेलों मी ॥६॥

अव **श्य** ही वैरीण । गुरु म्हणे पुरे शीण ।
मी माया दावून । केलें मन शुद्ध ईचें ॥७॥

ही न **च** इच्छील आतां । सोडील परान्नाची वार्ता ।
न मोडली तुझी निष्ठा । द्विज अडतां घे परान्न ॥८॥

प्रार्थी **भू** सूर कोठें जावे । अन्न कोणाचें वर्जावें ।
गरु म्हणे जेवावें । स्वसंबंधिगुरुमित्रान्न ॥९॥

वर्जी **ता** मस कुचरान्न । विधिनिषेधरहितान्न ।
दुष्प्रतिग्रह दुर्भक्ष्यान्न । कन्यान्न सुत न होता॥१०॥

त्यजीं **नि** न्दकादिकान्न । जेवितांही श्राद्धान्न ।
षट् प्राणायाम शोधन । प्रेतान्न सर्वथा वर्जी ॥११॥

अग्रा **धा** निभागवतान्न । पवित्र करी ब्रह्मिष्ठान्न ।
तीर्थीं क्षेत्रीं पर्वणीं दान । हीनदान कुदान न घे॥१२॥

स्वाचा **र** युक्तनर । सर्व दोष करी दूर ।
द्विज म्हणे सविस्तर । नित्याचार स्पष्ट सांगा ॥१३॥

गुरू **या** परी प्रार्थित । सांगे पराशरमत ।
उठा ब्राह्ममुहूर्तास । गुरुदेवतांदिकां वंदा ॥१४॥

न्हा या म्य मुख निशीं ऐक । दिवा संधी उदङ्मुख ।
नैर्ऋत्यकोणी देख । मार्गोदकवर्जितदेशीं ॥१५॥
त्यजीं ह रित्तृण, शिरीं । वस्त्रधरीं जलदूरी ।
मलमूत्रोत्सर्ग करीं । शौच करीं मृत्तोयानें ॥१६॥
गोळ्या मो ठ्या आंवळ्यापरी । लिंगीं एक त्रि गुदावरी ।
सात सात पादकरीं । निम्मीं रात्रीं संकटीं अर्ध॥१७॥
हा द्वि ज वर्याचार । वर्णी वनी यतीश्वरां ।
द्वित्रिचतुर्गुणाचार । स्त्रीकुमारां दुर्गंधान्त ॥१८॥
होत सा च विधी शूद्रा । विप्रें कीजे चूळ बारा ।
आठ सहा चार इतरां । अंतीं द्विराचमनें शुद्धी॥१९॥
मृदा पु ण्य मध्यस्नान । प्रातःकाळीं गोमयस्नान ।
व्रति संन्यासी त्रिस्नान । सुभगे शिरःस्नान न नित्य २०
शीतो ष्णा म्बु गृहस्थासी । मार्जनादि न तयासी ।
तर्पणादि बहिःस्नानासी । कीजे शिरसीं मृद्धारण ।२१।
अना मि कीं दर्भ पवित्र । बद्धशिख सोपवस्त्र ।
संध्या करा जो प्रकार । गृह्यकार वदे जैसा ॥२२॥
मौंजी चौ लादिकीं न भस्म । तदन्यत्र तें परम ।
सनक्षत्रसंध्या परम । हो मध्यम लुप्ततारा ॥२३॥
चाक्षु ष सूर्यदर्शन । प्रातःसंध्या अधम जाण ।
ह्याउलट रात्रौ जाण । उपस्थान सूर्येक्षणें ॥२४॥
त्या आ धी आचमन । प्राणायाम मार्जन ।
मंत्राचमन मार्जन । अघमर्षण अर्घ्यदान ॥२५॥

मन **स्स** माधानें द्या तीन । कालात्ययें चौथें जाण ।
सूर्योदयविघ्नकारण । रक्षोगण मरती ह्यानीं ॥२६॥

ह्या दु **र्वा** रात्रें मारितां । दोप येतो, भूमी फिरतां ।
असायादित्य जपतां । ये शुद्धता ब्राह्मणासी ॥२७॥

हो स्व **स्सो** पानभूत । कर्म कीजे सदोदित ।
शुभासनीं न्याससहित । जपा स्मरत ऋष्यादिक ।२८।

जप **मो** जा अक्षमालेनें । किंवा स्फटिकादिकानें ।
निष्फळ तो मुद्राविणें । समाधानें मौनें जपा ॥२९॥

लयं[1] **भू** ल पडूं न द्यावी । छन्नमाला न पडावी ।
गायत्री हजार जपावी । कमी योजावे अशक्तत्वें ॥३०॥

वृद्ध **त्वा** दि तारतम्यें । जपिजे न धनकाम्यें ।
उभ्यानें दोन संध्ये । सायंसंध्येसी बसून ॥३१॥

उभें **र** हावें उपस्थानीं । दिशा देव द्विजां नमूनी ।
गुरुपादातें वंदुनी । विसर्जोनी द्यावी संध्या ॥३२॥

हो अ **सा** हा संध्याविधि । सायंप्रातर्होमविधि ।
कीजें स्वयें उदया आधीं । प्रादुष्करण मग होम ॥३३॥

हा आ **त्म** स्त्री सुतादिकें । कीजे गव्यधान्यादिकें ।
धर्म करितां श्रमदुःखें । न च लेखें चित्तीं विप्रा ॥३४॥

भोग **कः** पदार्थ द्विजा । कर्में होयी शुद्धी निजा ।
आनंदा घे तोचि सहजा । देवपूजा हीच मुख्य॥३५॥

होम **अ** सा झाल्यावर । ब्रह्मयज्ञ कीजे बाहेर ।

---

१ झोंप.

ब्रह्मांजळी सपवित्र । म्हणा मंत्र ब्राह्मण अंगें ॥३६॥
विद्या **हूं** कारवर्जितां । ब्रह्मयज्ञ दे मुक्तता ।
दोष नसे कैसे[1] पढतां । जपाल्पता अनध्यायीं ॥३७॥
कोणी **वै** श्वदेवोत्तर । करिती मध्यसंध्योत्तर ।
तर्पा देवर्षिपितर । सव्य निवीत्यपसव्येसी ॥३८॥
हो वि **श्वा** त्माऽऽब्रह्मस्तंबांत । तर्पणें तृप्त यवाक्षत ।
देवर्षिला करिती तृप्त । पितरां तृप्त करिती तिळा॥३९॥
गृहीं **न** हें तिलतर्पण । निंद्यदिनीं मांगल्यीं न ।
दिवाळींत यमतर्पण । भीष्माष्टमीसी ॥४०॥
हें क **रो** जीवत्पिता । दोष अनवश्य करितां ।
मध्यान्हीं सूर्य येतां । मध्यान्हसंध्या कीजे ॥४१॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे आन्हिककर्मनिरूपणं नाम षष्ट्रिंशो० ॥ ३६ ॥ ग्रं० सं० ॥ ४७८ ॥

गृह **भू** मी संमार्जन । कीजे नित्य लेपरंजन ।
शालग्रामशिळा धेनू । गृहीं राखून ठेवा गव्य ॥१॥
गृहि **त्वा** दे गृहमेधीय । अग्निहोत्र किंवा गृह्य ।
हो संध्यावत् देवपूज्य । पशुतुल्यत्व अन्यथा ॥२॥
किंवा **प्रा** तर्विस्तरानें । दुपारीं पंचोपचारानें ।
सायंकाळीं निरांजनें । आठ स्थानें पूजनाचीं ॥३॥
जे को **णि** न पूजती । ते यमदंड घेती ।
वेदमंत्रें द्विज पूजिती । पौराणोक्तीं स्त्रीशूद्रादि ॥४॥

---

१ तिष्ठन्व्रजन्नासीनः शयानो वा.

विपि **नां** तोत्थ मध्यम । क्रीत हीन, स्वीय उत्तम ।
तसीं श्वेत रक्त श्याम । पुष्पें अधम शूद्रानीत ॥५॥

न द्या **दे** वा सक्रमिच्छिद्र । दुर्गे दूर्वा, केवडा हरा ।
वर्जा तुळसी गणेश्वरा । धुत्तुरार्कादि कृष्णा ॥६॥

वाम **ह** स्ताकडे कलश । पुष्पादिकां दक्षिण देश ।
शंख घंटा वामदक्षिणेस । कीजे न्यास देहीं देवीं ॥७॥

कायें **मा** नसें वाचें द्विजां । षोडशोपचारें पूजा ।
मिळतां पंचामृतें पूजा । स्नानापूर्वी नंतर भूषा ॥८॥

तवा **श्रि** त मी मला तारीं । म्हणुनी निर्माल्य घे शिरीं ।
भावें मंत्रजप करीं । तीर्थ पी शिरीं घे उद्वासीं ॥९॥

घे अं **तः** करणीं देवा । पंचसूना दोष जावा ।
जरी तरी वैश्वदेवा । प्रातःसायं स्वान्नशुध्यर्थ ॥१०॥

याचें **प्रा** तःकालारंभण । होम करी तो देवयज्ञ ।
हो बळी तो भूतयज्ञ । पितृनृयज्ञ तत्तर्पणें ॥११॥

वीक्ष **णा** र्थ अतिथीसी । किंचित् ठरा अंगणदेशीं ।
येतां अन्न द्या शक्तीसी । द्या यतीसी सजलान्न ॥१२॥

ओले **पा** द मुख कर । जेवा घेउनी परिवार ।
नेणत्यासी वाढा दूर । नच करा पंक्तिभेद ॥१३॥

घालू **न** चित्राहुति । आपोशन घ्या मौन स्थिति ।
घ्याव्या मंत्रें प्राणाहुति । पात्र हातीं धरूनिया ॥१४॥

सर्वी **स** प्राणाहुत्यंत । मौन पुढें विकल्पित ।
पात्रीं टांका न उच्छिष्ट । जल पितां शब्द वर्ज्य ॥१५॥

दीप **मा** वळतो न खावें । रजस्वलांत्यां न देखावें ।
त्यांचे शब्द न ऐकावें । न शिवावे परस्पर ॥१६॥
दुर्वा **यु** अधो आतां । अन्न त्यजा कीटयुक्ता ।
न जेवावें वांती होतां । केश पडतां प्रोक्षुनि घ्यावें॥१७॥
वियु[1] **क्तः** स्याद् द्विजत्वात्स । पलांडुलशुनादिभुक् ।
तामसाहारभुग्दुर्धीः । सात्विकाहारभुक्सुधीः ॥१८॥
आज्या **प** योन्नें[2] लवण । सर्व खावें अन्य अन्न ।
सशेष द्यावें उच्छिष्टान्न । आपोशन अर्धे प्यावें॥१९॥
मुखा **चा** शोधनासी । वर्जावें तर्जनीसी ।
मुख हस्तांघ्री शुचीसी । द्विराचमनें बोलियेलें॥२०॥
ध्या स **म्य** क तांबुलादि । ऐकावें पुराणादि ।
कीजे सायसंध्याविधि । भोजनादि पूर्ववत् ॥२१॥
क्षीरा **न्न** रात्रीं शस्त । दिवाकर्म प्राक्प्रहरांत ।
रात्रौ वर्जा सौरपाठ । निशीथांत रात्रिकर्म ॥२२॥
जैं प **श्च** यज्ञादिक चुके । कीजे प्रायश्चित्त विवेकें ।
सुखशायिनिशां वंदा, सुखें । निजा ईशा अर्पून कर्म२३
स्त्रीऋ **तु** कालीं करा रति । पर्व मूळ मघा रेवती ।
वर्जा दिवा श्राद्धव्रती । ऋतुगामी ब्रह्मचारी ॥२४॥
न गु **र्वि** णीशीं रमावें । रतीं कोप द्वेष त्यजावे ।

---

१ कांदे, लसूण वगैरे भक्षण केल्यास द्विज द्विजत्वापासून भ्रष्ट होतो. सात्विकान्न सेवनानें ज्ञानवृद्धि व तामसान्न भक्षणानें अज्ञानवृद्धि होते.
२ पायस.

ऋतू चुकवूनी न जावें। जातां पावे भ्रूणहत्या॥२५॥
घर धं दा होतांहि विप्रा। न सोडावें निजाचारा।
गुरू ऐसें कथिती विप्रा। तो आचार करूनि तरे २६

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे आन्हिककर्मनिरूपणं नाम सप्तत्रिंशो ॥ ३७ ॥ ग्रं० सं० ॥ ५०४ ॥

गुरू स भिक्षा द्याया आला। भास्कर विप्र सामग्रीला।
तिघां पुरति घेउनी त्याला। भक्तीं नेला प्रसादा ॥१॥
तो स र्व सामग्रीला। निजे घेउनि उसेला।
तीन मास असा त्याला। न मिळाला शून्य वार ॥२॥
त्या हा स्य करिती लोक। गुरु करविती पाक।
म्हणती सांगें सर्व लोक। तो सांगे सर्वां भोजना॥३॥
ते त्या चा बोला हंसती। कण वांट्या न ये म्हणती।
तें तो सांगे गुरूप्रती। बोलाविती ते त्यां सर्वां ॥४॥
निर हं कार तो ब्राह्मण। करी पाक सुनिष्पन्न।
गुरू वस्त्रें झांकवून। नेववून वाढविती ॥५॥
द्विज हृ ष्टचित्त जेविती। थोर सान सर्व येती।
चार हजार झाली मिती। ते जेविती आकंठ ॥६॥
अन्न दि ल्हें सर्व जातीला। आचंडालश्वकाकांला।
तरी तोटा नाहीं आला। जेवविला गुरूनें विप्रा ॥७॥
अन्न सं पेना तें जळीं। जलचरां दे त्या वेळीं।
झाली ख्याती भूमंडळीं। वर त्यावेळीं देती विप्रा ॥८॥
हर्षु नि यां वदती लोक। तिघांपुरता होता पाक।

जेविले हे अमित लोक । हें कौतुक दुसरें ऐक ॥९॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे अन्नपूर्तिकरणं नाम अष्टत्रिंश० ॥ ३८ ॥ ग्रं० सं० ॥ ५१३ ॥

एक वि प्र सोमनाथ । तत्स्त्री वृद्धा वंध्या ख्यात ।
सेवी भावें गुरुनाथा । गुरू पुसती वांछा काया ॥१॥

ती क ष्टो नी तयां म्हणे । अपुत्रा मी व्यर्थ शिणें ।
अश्वत्थाला भजतां जिणें । गेलें भेणें पुढती वाटे ॥२॥

पुढें म ला होवो सुत । गुरु म्हणे कोण जाणत ।
पुढचें, आतां कन्यासुत । होवो म्हणे, ती गांठ बांधी ३

गुरू त्त म म्हणे हरी । पिंपळाची निंदा न करीं ।
आम्ही सर्वदेव त्यावरी । ब्रह्मा सांगे नारदातें ॥४॥

श्रुति स्स्मृ ती ज्याला गाती । त्याला करीं मंदगति ।
प्रदक्षिणा लक्ष मिती । करीं अंतीं उद्यापन ॥५॥

द्यावे ति ल स्वर्णाश्वत्थ । विप्रां भोजन दे निश्चित ।
होती तुज कन्या सुत । नारी म्हणतसे देवा ॥६॥

मी दु र्ज्ञा ना वंचूं कशी । साठ वर्षें झालीं वयासी ।
होत नाहीं विटाळशी । तरी तसीच मी सेवी ॥७॥

ती त्यां न मुनी सेवि तशी । शीघ्र झाली विटाळशी ।
गर्भ धरी पांचवे दिवशीं । कन्या तीसी झाली शुभा॥८॥

पर म हर्षें त्या कन्येसी । आणी नारी गुरूपाशीं ।
गुरू म्हणे हो सती ईसी । दीक्षित पति लाघेल ॥९॥

तुझे पो टीं मूर्ख शतायू । किंवा यावा बुध अल्पायू ।

ती म्हणे हो कां अल्पायू । दीर्घायू मूढ किमर्थ ।१०।

व्हावे हं षंद पंचसुत । तथा म्हणे गुरुनाथ ।
कन्ये घेउनी गृहाप्रत । ये हंसत ब्राह्मणी ती ॥११॥

झाला नं दन शीघ्र तिला । विद्वान् सर्वगुणी भला ।
पांच पुत्र झाले त्याला । सर्वां झाला विस्मय ॥१२॥

तशी च कन्या दीक्षिताची । पत्नि झाली सती साची ।
कीर्ति पसरली त्यांची । श्रीगुरूची असी दया ॥१३॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे वृद्धवंध्याप्रसवो नामैको नश्चत्वारिंशो० ॥ ३९ ॥ ग्रं० सं० ॥ ५२६ ॥

एक वे दज्ञ ब्राह्मण । श्वेतकुष्टें व्यापून ।
गुरूप्रति येऊन । म्हणे दीननाथा तारीं ॥१॥

झालों दै वें कुष्टी म्हणून । तोंड हें न पाहती जन ।
ह्याचें करीं तूं शमन । नातरीं प्राण सोडीन मी ॥२॥

पुर श्च र्यादिकें पाप । न जातां हो उलट ताप ।
देवा तूंची मायबाप । माझें पाप शमवीं हें ॥३॥

आश्वा स न देती गुरू । तंव आला एक नर ।
शुष्ककाष्ठ डोईवर । घेवोनी ठरला तो तेथें ॥४॥

अपू र्वै क चमत्कार । करूं इच्छी गुरुवर ।
सांगे विप्रा घे झडकर । संगमावर रोवीं काष्ठा ॥५॥

अवि र त सेवीं यासी । पाला येतां शुची होसी ।
द्विज रोवी त्या काष्ठासी । सद्भावें जल शिंपी ॥६॥

लोक ह सुनी वारिती । नायके तो गुरूप्रती ।

ते येवोनी तें सांगती । गुरु म्हणती भाव फळे ॥७॥

अप्र **मे** य भावफळ । धनंजयवाक्यें सुशील ।
लिंगा चिताभस्म दे भिल्ल । एकदां लब्ध न हो भस्म॥८॥

इच्छी **व** पू जाळावया । मला जाळीं म्हणे भार्या ।
भस्म दे, तिला जाळूनियां । प्रसाद घ्याया आली तीच९

तये **वे** ळीं प्रगटे हर । तयां देई इष्ट वर ।
असा भावाचा प्रकार । म्हणूनी गुरू जाती तेथें॥१०॥

त्या उ **द्यो** गातें पाहून । करिती काष्ठा प्रोक्षण ।
आले अंकुर फुटोन । विप्र स्वर्णवर्ण झाला ॥११॥

बर **वे** अंकुर फुटले । कुष्ठ सर्व मावळलें ।
द्विजें स्तवना आरंभिले । तैं उदेले अष्टभाव ॥१२॥

शांत[1] **दां** त इंदुकोटिकांतदीप्त अत्रिनंदना ।
देववृंदवंद्यपाद दत्त भक्तचित्तरंजना ॥१३॥

पाप[2] **त** प्ततापभंजना सनातना जनार्दना ।
मायिकांधकारसूर्य दत्त भक्तचित्तरंजना ॥१४॥

दत्त **कृ** त्तकामरोष[3] वेषधारि भिक्षु तूं जना ।

---

१ मनोनिग्रही, इंद्रियनिग्रही. कोटि चंद्रांप्रमाणें तेजस्वी व प्रकाशमान अत्रिऋषीचे पुत्रा; देवगणांनीं ज्याचे पाय वंदित आहेत अशा व भक्तांच्या अंतःकरणाला रमविणाऱ्या दत्ता (तुला नमस्कार असो). २ पापानें तापलेल्याचें दुःख नाहींसें करणाऱ्या, शाश्वत, जनार्दना, मायांधकाराला सूर्यासारखा व भक्तांच्या अंतःकरणाला रमविणाऱ्या. ३ काम राग ज्यानें नष्ट केले आहेत तो तूं संन्यासाचें रूप घेऊन लोकांचें इच्छित देतोस.

इष्टदेसि धर्म पासि दत्त भक्तचित्तरंजना ॥१५॥
राग द्वे ष दोष वारिं, तारिं सूर्यचंद्र[1]लोचना ।
भक्तकामधेनु तूंची दत्त भक्तचित्तरंजना ॥१६॥
हस्तिं[2] द ण्ड कुंडि घेसि देसि जीव वीतजीवना ।
रक्तपद्मपत्रनेत्र दत्त भक्तचित्तरंजना ॥१७॥
तूंचि[3] वि श्वहेतु मंतुसोसि होसि मायबापना ।
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त दत्त भक्तचित्तरंजना ॥१८॥
तूंचि दे वँ योगि होसि नासिं दैन्यदुःखकानना ।
न्यासि होसि कृष्णावासि दत्त भक्तचित्तरंजना॥१९॥
अहे[5] व स्तु तूं अनादिमध्यनाश खास वासना ।
वारिं, भक्ति देयिं तारिं दत्त भक्तचित्तरंजना ॥२०॥
तया चा भाव जाणुनि विद्या । विद्यासरस्वतीमंत्रा ।

---

१ चंद्र-सूर्य हे ज्याचे डोळे आहेत अशा व भक्तांच्या अंतःकरणाला रमविणाऱ्या दत्ता, राग, द्वेष इत्यादि दोष दूर कर आणि आम्हांस तार. तूंच भक्तांला कामधेनू आहेस. २ तांबड्या कमळाच्या पाकळी-प्रमाणें ज्याचे डोळे आहेत अशा, भक्तांच्या अंतःकरणाला रमविणाऱ्या दत्ता, हातांत दंडकमंडलू घेतोस व मृताला जीवंत करितोस. ३ तूं विश्वाला हेतु असून त्याचे अपराध सोसणारा मायबाप, नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त अशा भक्तांच्या अंतःकरणाला रमविणाऱ्या दत्ता, (तुला नमस्कार असो). ४ भक्तांच्या अंतःकरणाला रमविणाऱ्या दत्ता, तूंच देव असून योगी आहेस. दैन्य व दुःखाच्या अपायांचा नाश कर. तूंच संन्यासी होऊन कृष्णातीरीं वास करितोस. ५ भक्तांच्या अंतःकरणाला रमविणाऱ्या दत्ता, आदि मध्य व अंत रहित अशी ब्रह्मवस्तू तूंच आहेस. वासना दूर कर आणि भक्ति देऊन तार.

देऊनियां सकलत्रा । राहवि मित्रापरी गुरू ॥२१॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे विप्रकुष्ठहरणं नाम
चत्वारिंशो० ॥ ४० ॥ ग्रं० सं० ॥ ५४७ ॥

निरहंकार त्वत्पूर्वज । सायंदेव कथिला तूज ।
गाणगापुरीं वसे निज । गुरुराज साक्षाद्देव ॥१॥

हीं तद्वार्ता परिसून । ये घालित लोटांगण ।
देवा पहातां हो तल्लीन । करी स्तवन प्रेमरसें ॥२॥

गुरु विचारिती क्षेम । येरू सांगे धरुनी प्रेम ।
भवत्सेवाकाम । धरुनी, धाम सोडियेलें ॥३॥

घ्यावी मौज भक्तिरसाची । असी इच्छा हे मनाची ।
गुरु म्हणे सेवा आमुची । कठिण साची नेणसी तूं॥४॥

कधीं पुरामध्यें वास । ग्रामीं वनीं नदीतीरास ।
तुला होती कष्ट सायास । कां तूं त्रास पतकरसी ॥५॥

तो करूनी अंगिकार । राहे गुरूच्या बरोबर ।
त्याला एकला बाहेर । संगमावर न्हेति गुरू ॥६॥

जो दोषौघा स्मरणें हरी । तो संकटीं त्यजि कीं हरी ।
हार्दें शिष्यपरिक्षा करी । आज्ञा करी मेघा वर्षू ॥७॥

तेव्हां लोटुनी टांकी वारा । वर्षे मेघ मोठ्या धारा ।
द्विजें साहुनी वृष्टि वारा । रक्षिलें वस्त्राश्रयें देवा ॥८॥

गुरू केवल परीक्षार्थ । अग्नि आणावया धाडित ।
विद्युत्तेजें ये गांवांत । अग्नि भांड्यांत घेऊन ये ॥९॥

---

१ दोषसमूह.

प्रत्य क्ष पांथिं सर्पा देखे । पळतां, मठीं ध्वनी ऐके ।
प्रकाश देखे मनीं ठके । येउनि देखे एका देवा ॥१०॥
सर्प र क्षार्थ धाडिले । तुझें मन वायां भ्यालें ।
कठिण सेवा हें कळलें । साहस केलें त्वा गुरु म्हणे ११
हो प श्चा त्ताप कीं तुला । द्विज म्हणे देवा मला ।
जाणसी, मी काय तुला । सांगूं, मला न दवडीं॥१२॥
प्रत्य क्ष तूं ब्रह्मनिधान । गुरुसेवेचें विधान ।
सांगा तेणें स्थिर होईन । तें ऐकून गुरू सांगे ॥१३॥
कुमा र त्वष्टृदेवाचा । विद्यार्थी हो गुरूचा ।
भाव पहावया त्याचा । गुरू साचा वदे तया ॥१४॥
करीं ए क गृह निर्माण । जें न तुटे नोहे जीर्ण ।
करी वृष्ट्यादि निवारण । तें ऐकून तत्स्री बोले ॥१५॥
न शिं व ली न विणली । अंगाबरोबर भली ।
अशी रम्य दे मज चोळी । त्यावेळीं तत्सुत बोले ॥१६॥
माझ्या च रणा सुख देती । खात न लागे, मनोगती ।
दे पादुका जळीं न बुडती । गुरुकन्या तीही बोले ।१७।
हो अ क्ष यैकस्तंभघर । न हो पात्रीं पाक गार ।
काजळ न लागे त्यावर । दे सुंदर कुंडलें हीं ॥१८॥
कुमा र तो स्वीकारून । त्यां वंदून धरी रान ।
तेथें अवधूत येऊन । म्हणे कां म्लान मुख तुझें ॥१९॥
मन स्स माधान करून । बाळ सांगे सर्व नमून ।

---

१ मार्गामध्यें.

येरु तया आश्वासून । काशीसेवन करीं म्हणे॥२०॥
जें श **र्वा** चें अधिष्ठान । गंगा राहे ज्या वेष्टून ।
सर्वदेवतीर्थस्थान । तत्सेवन करीं शीघ्र ॥२१॥
न को **णि** ही येथ अमुक्त । म्हणोनी हें हो अविमुक्त ।
विरक्त किंवा विषयासक्त । तेही मुक्त होती जेथ॥२२॥
दुजें **भू** मंडळीं न असें । येरू वदे मी नेणतसें ।
काशीक्षेत्र मिळेल कसे । प्रार्थितसें मी तुम्हांसी॥२३॥
म्हणे **ता** पसी मी दावीन । त्वद्योगें हो मज दर्शन ।
असें म्हणूनी त्या घेऊन । ये तत्क्षण मनोगती॥२४॥
घेउ **नि** आला मनोगति । काशीयात्रा भावभक्तीं ।
करीं यथाविधी, निगुती । पूर्ण होती मनोरथ ॥२५॥
तो ऐ **कू** नि त्याचें वचन । म्हणे नेणें यात्राचरण ।
येरू म्हणे स्नान करून । मणिकर्णिकेचें येईं ॥२६॥
तूं भे **ट** विश्वेश्वरा । करीं अंतर्गृहयात्रा ।
मग दक्षिणमानसयात्रा । स्नानार्चनश्राद्धदानें ॥२७॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे काशीयात्रानिरूपणं नाम एकचत्वारिंशो० ॥ ४१ ॥ ग्रं० सं० ॥ ५७४ ॥

तत्र **स्थो** दङ्मानसयात्रा । करीं पंचक्रोशीयात्रा ।
शुक्लकृष्णपक्षयात्रा । नित्ययात्रा करी भावें ॥१॥
प्रत्य **क्ष** चि विश्वेश्वरा । भवानी हरिधुंडीश्वरा ।
दंडपाणी भैरववीरा । विघ्नेश्वरा गुहा देखी ॥२॥
तूं स्थी **र** चित्तें करीं यात्रा । स्थापीं लिंग तूं कुमारा ।

सुटतील येरझारा । असें म्हणोनी गुप्त झाला ॥३॥

बाळ **उ** ठोनी पाहत । त्या न दिसे, झाला गुप्त ।
हाची माझा गुरू म्हणत । करीतसे तो यात्रा ॥४॥

अवा **च्य** हो शिवलीला । इष्ट वर दे तयाला ।
दे तो तसें गुर्वादिकांला । तो झाला विश्वकर्मा ॥५॥

द्विज **ते** व्हां गुरु जसें । सांगे तें ते पाहे तसें ।
गुरुनाथा वंदीतसे । स्तविनसे सायंदेव ॥६॥

तूंची **उ** मापती होसी । मज दाविली येथ काशी ।
गुरु म्हणे त्वद्वंशासी । एकविंशीं घडे यात्रा ॥७॥

तूं स **त्त** म लोकीं होसी । आतां न सेवीं म्लेच्छासी ।
आणूनियां स्त्रीपुत्रांसी । आम्हापाशीं रहा सेवित ॥८॥

तो न **मः** स्कारुनी गेला । स्वकुटुंबा घेऊनि आला ।
स्तवि पुनः श्रीगुरूला । कानडीस्तोत्रालापें ॥९॥

त्याचा **पु** त्र नागनाथ । तया वर दे गुरुनाथ ।
सांगे सायंदेवा स्वस्थ । करीं अनंतव्रत आजी ॥१०॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे काशीयात्रानिरूपणं नाम
द्विचत्वारिंशो० ॥ ४२ ॥ ग्रं० सं० ॥ ५८४ ॥

दे पु **रु** पार्थ नरांसी । भाद्रशुक्लचतुर्दशीसी ।
चौदा ग्रंथी रक्तसूत्रासी । बांधीं करासी पूजुनी ॥१॥

संतो **ष** मानुनि तो पुसे । व्रत कोणीं हें केलें कसें ।
गुरु म्हणे द्यूतीं घेतसे । पार्थराज्य दुर्योधन ॥२॥

अभा[1] **स्त्व** पावुनि पांडव । वनीं भ्रमतां ये माधव ।
त्याला द्याया स्ववैभव । सांगे देव अनंतव्रत ॥३॥

त्वदे[2] **न्यः** कोनंत इति । पुसतां म्हणे मीच श्रीपती ।
ऐकें, सुमंतुकन्या होती । सुशीला ती पूर्वस्त्रीजा॥४॥

ती हो **प** त्नीं कौंडिण्याची । सापत्नमाता द्वेषी तिची ।
अन्यत्र न्हे तिला तोची । अनंताची पूजा घे ती ॥५॥

दे ब **र** वी श्री[3] अनंत । वशीकारभयें अग्नींत ।
दोरा टाकी मुनी कुपित । दुःखाब्धींत पडे तेव्हां ॥६॥

देव **मा** झेवर रुसला । म्हणूनी मुनी वनीं गेला ।
निर्वाणें तो मूर्छित पडला । त्या भेटला श्रीमदनंत ॥७॥

जीवा **त्मे** शाभिन्नत्वेंशीं । स्तुती करितां त्या ऋषीसी ।
वर दे सर्वैश्वर्येंसीं । तत्पृष्ठांशां[4] देयी मोक्ष ॥८॥

त्या अ **त्यु** दार अनंत । पुनर्वस्वृक्ष करित ।
म्हणोनी कृष्ण हें व्रत । करवीत पार्थाकरवीं ॥९॥

दाया **दा** दिकां मारून । सार्वभौम धर्म होऊन ।
देहासह स्वर्गीं जाण । गेलां म्हणून करीं तूं व्रत ॥१०॥

विप्र **हृ** ष्टतर होऊन । गुरूक्त तें हो व्रत करून ।
राहे गुरूला सेवून । बंध तोडून मुक्त झाला ॥११॥

तूं अं **तः** करणीं जाण । गुरुप्रसादें हो पूर्ण ।
तुमच्या वंशीं म्हणून । तुझें मन रंगलें हें ॥१२॥

---

१ निस्तेजपणा. २ तुझ्याहून निराळा असा अनंत दुसरा कोण आहे ?
३ संपत्ति. ४ आम्रगोवृषादिकांला.

याग यो गादिकांवीण । तुम्हां जोडे हेंचि निधान ।
असे घेती भक्तीकरून । देवा करून आपुलासा॥१३॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे अनंतव्रतकथनं नाम
त्रिचत्वारिंशो० ॥ ४३ ॥ ग्रं० सं० ॥ ५९७ ॥

सिंहा[1] लो कनें करून । ऐक पुढील कथन ।
तंतूक संसारीं असून । भजे गुरूसी याममात्रे[2] ॥१॥
तल्लो क श्रीशैलासी । जातां बोलाविती त्यासी ।
तयां वदे तो गुरूपाशीं । श्रीशैलेशीमल्लिकार्जुन ॥२॥
सर्व त्र हा गुरु एक । पाषाण पाहूं जाती लोक ।
ते त्या निंदुनी गेले लोक । ये तंतुक गुरुपाशीं ॥३॥
तो पा य वंदी त्यासी । गुरू पुसे कां न जासी ।
तो तसेंचि सांगे त्यांसी । चतुर्दशी पुढें आली ॥४॥
नभो[3] मा गें गुरु तया । नेउनी दाविती श्रीशैल्या ।
देवा पाहे तों लोक तया । पुसोनी साच न मानी ॥५॥
लिंगीं वि लोकी तैं गुरूसी । स्थानमहात्म्य गुरू त्यासी ।
सांगे पंपापुरीं शिवासी । पाहुनि श्वाना ये राजत्व॥६॥
स्त्रीव श्य तो जरि कां शैव । पुसतां स्त्रीला प्राक्स्वभाव ।
सांगे, राणी पुसे स्वभाव । म्हणे तो कवडी तूं पूर्वी ॥७॥
आँलं[4] बि लें मांस पाहुन । श्रीशैलाग्रीं घार येऊन ।
तुजला मारी म्हणून । राणी होवून रमसी ॥८॥

---

१ मागील कथासंदर्भ लक्षांत. २ एक प्रहर. ३ आकाश मार्गानें.
४ घेतलेलें.

तूं मी **भ** विष्यषड्जन्मीं । होवूं राजे, अंतीं स्वधामीं ।
जावूं म्हणे, तंतुका मीं । क्षेत्रधामीं आणिलें तुला॥९॥
जैं व **र्त्य** ग्रीं लागे आग । तैं हो शीघ्र ध्वांतभंग ।
तसा होतां गुरुसंग । आवृत्तिभंग[1] हो तयाचा॥१०॥
त्या अ **व्य** ग्रा गुरु संगमीं । आणवूनी धाडिती ग्रामीं ।
त्याला भ्रांत म्हणती ग्रामी । मठधामीं आणी भक्ता तो११
प्रत्य **य** ये यात्रिक येतां । सर्वांला ये निभ्रांतता ।
म्हणती देव गुरुनाथा । तंतुका भक्ताग्र्य मानिती १२

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे श्रीपर्वतयात्रावर्णनं नाम
चतुश्चत्वारिंशो० ॥ ४४ ॥ ग्रं० सं० ॥ ६०९ ॥

ऐकें **ई** श्वरप्रभाव । नंदिनाम एक भूदेव[2] ।
कुष्ठें व्यापुनी घे धांव । देवीपाशीं तुळजापुरीं ॥१॥
त्या ई **श्व** रीं जा गुरुपाशीं । म्हणे, तो बोले कां नरापाशीं ।
धाडिशी, मग भोपे[3] यांसी । सांगून त्यासीं घालविलें ।२।
धी पु **रः** सर नावडतां । तो ये भेटे गुरुनाथा ।
गुरु म्हणे तूं कां आतां । आलास रे नरापाशीं॥३॥
स्वकी **य** खूण ओळखून । तो प्रार्थी त्या देव मानून ।
गुरु म्हणे पापें करून । कुष्ठें व्यापून गेलासी ॥४॥
अक **स्मात्** पाप हो दूरी । या संगमीं स्नान तूं करीं ।
म्हणोनी त्याबरोबरी । सोमनाथासी धाडिती ॥५॥
तो त्या **क्ष** णीं स्नान करी । अश्वत्था प्रदक्षिणा करी ।

---

१ जन्ममरणनाश. २ ब्राह्मण. ३ पुजारी.

मठीं ये त्या अवसरीं । पाहें शरीरीं गुरु म्हणे ॥६॥

शरी **र** त्याचें दिव्य झालें । किंचित् जंघेसी राहिलें ।

पुसे कुष्ठ हें कां राहिलें । गुरु बोले, विकल्पानें ॥७॥

त्वां जी **म** नुष्यधी धरिली । तीच तूज आड आली ।

माझी स्तुती करीं भली, । म्हणे तो लिखितही नेणें ।८।

विभू **ती** मग जिव्हेवर । टाकूनी, गुरु म्हणे स्तोत्र ।

करीं, मग तो होयी धीर । करी स्तोत्र श्रीगुरूचें ॥९॥

आत्मा **तो** तूं सर्वाधीश । शुद्ध बुद्ध नित्य त्रीश ।

तुला नेणुनि कर्मपाशें । बद्ध होती जीव अज्ञानें ॥१०॥

ते अ **ह** ङ्कारें त्रिविध । पापें, घेती योनी विविध ।

समपापपुण्यें त्रिविध । नर होती रक्तरेतें ॥११॥

गर्भी **म** हा कष्ट भोगी । सोडवाया प्रार्थी विरागी ।

उपजतां वेगीं । पुढें भोगी होउनि मरे ॥१२॥

त्वेद्वी **क्ष** णा विना कैसा । मोक्षा जाईल हा पिसा ।

तूंची कृपा करीं ऐसा । प्रार्थी मानसा स्थिरवून ॥१३॥

गेलें **रा** हिलेलें कुष्ठ । जहाला तो गुरुप्रेष्ठ ।

कविता करी कविश्रेष्ठ । एकनिष्ठ गुरुपदीं ॥१४॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे ब्राह्मणकुष्ठनिवारणं नाम पंचचत्वारिंशो० ॥ ४५ ॥ ग्रं० सं० ॥ ६२३ ॥

विश **द** तत्कवितारीती । नृकेसरी तो नरस्तुती ।

मानुनि निंदी, त्याचे चित्तीं । गुरूमूर्ति प्रगटली ॥१॥

---

१ तुझ्या कृपादृष्टीवांचून. २ प्रिय.

लिंग **पि** ण्डवर बैसोन । पंचकवित्व पूजन ।
गुरू घेती, तें पाहून । तो येऊन प्रार्थी गुरूसी ॥२॥
तूं वं **चो** नी कां देवासी । मूर्खपणें नरा स्तविसी ।
असें गुरु पुसे त्यासी । प्रार्थुनि त्यांसी तो हो शिष्य॥३॥
हे उ **त्त** मकवी दोन । गुरूसी गाती अनुदिन[1] ।
गुरु प्रसन्न होऊन । उद्धरून न्हेती तयां ॥४॥
जैं तें[2] **मः** शांती करी रवी । तैं हा भक्ताज्ञान नुरवी ।
येथ हो शांत दुजा रवी । कीर्ति बरवी दावी लोकीं ।५।

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे कवीश्वरउपदेशो नाम षट्चत्वारिंशो० ॥ ४६ ॥ ग्रं० सं० ॥ ६२८ ॥

भक्त **अ** तिप्रिय सात । दिवाळीच्या सणानिमित्त ।
न्याया गुरूसी गृहाप्रत । प्रार्थिती सप्तग्रामवासी ॥१॥
गुरु **तो** षवाया तयां । सातरूपें धरूनियां ।
जाती सातांच्या आलयीं[3] । राहूनियां तया ग्रामीं ॥२॥
तों वि **स्मि** त होउनी पुढती । एकामेकां झगडती ।
माझे घरीं गुरुमूर्ति । करिती दिपावळी असे ॥३॥
ग्राम **लो** क मिथ्या म्हणती । येथेंची होते गुरुमूर्ती ।
दिल्ही खूण सर्व दाविती । गुरु म्हणती सर्व सत्य॥४॥
होसी **के** वळ परब्रह्म । असें स्तविती ते सप्रेम ।
तयां भक्तां गुरूत्तम । देती धाम अलभ्य जें ॥५॥

---

१ रात्रंदिवस. २ अंधकार. ३ घरीं.

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे दीपावल्युत्सववर्णनं नाम सप्तचत्वारिंशो० ॥ ४७ ॥ ग्रं० सं० ॥ ६३३ ॥

जो हो **वे** दां अगोचर । तो भक्तां हो सुगोचर ।
तयाग्रामीं भक्त शूद्र । नमस्कार करी नित्य ॥१॥

गुरु **दे** व संगमीं जाती । त्यां पाहून करी प्रणती ।
पुनः ये तो येणें रीती । करी भक्ती शेती करितां ॥२॥

लोकीं **च** मत्कार करावया । शूद्रा वदे गुरुराया ।
कच्चें पीका हें कापुनियां । टांकी मध्यान्हापावेतों॥३॥

तो तें **प्र** माण मानून । स्वामिभागा ठरवून ।
कापी, तत्स्त्री येऊन । करी विघ्न तरी न हटे ॥४॥

तें क **थि** ती अधिकाऱ्यांसी । शूद्र न जुमानी त्यासी ।
दावी मध्यान्हीं गुरूसी । म्हणे शेतासी कापिलें॥५॥

तूं अ **तः** पर काय खासी । असें गुरू पुसे त्यासी ।
म्हणे तुझ्या प्रसादेंसी । लाभ आम्हासी होईल ॥६॥

त्याचे **पु** रवाया हेत । वृष्टी मूलर्क्षीं पाडित ।
शतगुण त्या शेतांत । गुरुनाथ धान्य देती ॥७॥

तो क **रू** नी क्षेत्रपपूजा । सस्त्रीक करी गुरुपूजा ।
स्वामिभाग देउनि द्विजां । धान्यपुंजा वांटी हर्षें ॥८॥

संतो **षो** नी गुरुमूर्ति । त्याच्या वंशा गती देती ।
अशा लीला केल्या किती । त्यातें नेणती ब्रह्मादिक॥९॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे शूद्रधान्यप्रवृद्धिवर्णनं नाम अष्टचत्वारिंशो० ॥ ४८ ॥ ग्रं० सं० ॥ ६४२ ॥

**हें उ त्त** म असे क्षेत्र । भीमामरजायोग थोर ।
रणीं सुरां मारी जालंधर । अमृतें हर त्यां उठवी ॥१॥
**हृत्त मः** प्रकाशक । शिव दे अमृत विशोक ।
उलंडलें तेची ऐक । ती हे नदी अमरजा ॥२॥
**ही भ यो** पताप वारी । भीमेशीं संगम करी ।
प्रयागापरी पाप वारी । भूमीवरी हे तारक ॥३॥
**सर्व मा** न्य मनोहृत्तीर्थ । जेथ कल्पद्रू अश्वत्थ ।
पुढें संतोषाख्यतीर्थ । विश्वनाथ येथ आला ॥४॥
**ही उ मे** शप्रसादानें । एका जीवन्मुक्तानें ।
काशी केली ती स्नानानें । कैवल्यानें निःसंशयें ॥५॥
**तया व** री पापविनाश । तीर्थ दाविती यतीश ।
तों भेटे त्या समयास । पूर्वाश्रमस्वसा रत्ना ॥६॥
**ती त्या म** हा तीर्थीं न्हाली । कुष्ठ जाउनी शुद्ध झाली ।
गुर्वाज्ञेनें तेथें राहिली । मुक्त झाली त्याच जन्मीं ॥७॥
**वारी सं** कट कोटितीर्थ । पुढें दाविती रुद्रतीर्थ ।
गयेसम फल तेथ । चक्रतीर्थ केशवापुढें ॥८॥
**हें स मू** ळ वारी दुरित । अस्थी करी चक्रांकित ।
द्वारिकेहुनी हें प्रशस्त । हो पतित स्नानें ज्ञानी ॥९॥
**ज्या वे ढो** न असे माया । येथ स्नान करितां तया ।
ये मुक्तता सुनिश्चया । गुरुराया सांगे लोकां ॥१०॥
**तो पू जा** वा कल्लेश्वर । प्राग्भागीं गोकर्णक्षेत्र ।
चक्रतीर्थ हें पवित्र । असे क्षेत्रमहात्म्य हें ॥११॥

अज्ञा **ना** नें कली येतां । सर्वतीर्थं ये गुप्तता ।
गुरुनाथें तीं दावितां । लोकचित्ता हो आनंद ॥१२॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे गाणगापुरवर्णनं नाम
एकोनपंचाशत्तमो० ॥ ४९ ॥ ग्रं० सं० ॥ ६५४ ॥

ज्या दे **ति** श्रीपाद वर । तो रजक जन्मांतर ।
करी हो म्लेंछ राजा शूर । धर्मावर मन ज्याचें ॥१॥

त्याचे **पु** रोहित म्हणती । हिंदु पाषाण पूजिती ।
भू गो जला देव म्हणती । ती दुर्मति न वंदावे ॥२॥

राजा **रू** सोनि बोलत । सत्य असे त्याचें मत ।
जे द्वेषिती तयांप्रत । मी प्राणान्त दंड करीन ॥३॥

घा द्वे **षो** क्ति सोडुन । असें तयां कथीं ज्ञान ।
मांडीवर फोड होवून । तो पीडून राहें दैवें ॥४॥

त्या उ **त्त** म लेप करिती । परी त्याची नोहे शांति ।
राजा पुसे द्विजाप्रति । तो एकांतीं सांगूं म्हणे ॥५॥

राजा **मं** त्र्यांदिका त्यजून । एकलाची करी गमन ।
पापनाशतीर्थी येऊन । पुसे वंदून तया विप्रा ॥६॥

आश्वा **स** न देयी द्विज । म्हणे सत्पुरुषासी भज ।
भवरोग हो निर्बीज । भय तुज कायसें ह्याचें ॥७॥

एक **स** र्वकर्महीन । उज्जनींत होता जाण ।
द्विज वेश्येसीं रमून । तद्गृहीं ये ऋषभयोगी ॥८॥

तत्पू **र्व** पुण्य उदेलें । म्हणोनि मुनि भेटले ।
दोघांनीं त्यां पूजिलें । सेवियलें अहोरात्र ॥९॥

त्या से **वि** ल्या पुण्यानें । राजकुळीं जन्म घेणें ।
घडलें तयापरी भोगणें । आलें उणें जें स्वकर्म ॥१०॥
जो स **द्र** क्त हो सकाम । त्या ये श्रीमत्कुळीं जन्म ।
मुक्ती घेयी जो निष्कांम । सत्समागम व्यर्थ नोहे॥११॥
द्विजा **ज** न्म दशार्णदेशीं । वज्रबाहुराजवंशीं ।
ज्येष्ठराणीच्या ये कुशीं । तें सवतीसी न रुचलें ॥१२॥
यत्नें **ति** णें गर्भिणीतें । सर्पगरळ दिलें होतें ।
भेदलें परी न प्राणातें । हरि, तीतें देव राखी॥१३॥
तिचें **मां** स रक्त बिघडे । तिला बहु कष्ट घडे ।
पुत्रा प्रसवली पुढें । व्रण पीडे उभयतां ॥१४॥
झाले **स** र्वोपाय अपाय । तयां आरोग्य न होय ।
एके दिनीं तयां राय । विजनारण्यदेशीं टाकी॥१५॥
ती पू **र्व** कर्म स्मरून । बाळा कडेवर घेऊन ।
वनीं करी आक्रंदन । तों गोधन पुढें देखे ॥१६॥
राज **भा** मिनी गोपतीतें । पुसोनी ये नगरातें ।
वणिक्पती राखी तीतें । व्रणकष्टें पुत्र मेला ॥१७॥
तों दै **वे** ऋषभयोगी । ती रडतां आला वेगीं ।
तिला म्हणे राहें उगी । शोक त्यागीं विवेकानें ॥१८॥
सांगो **न** सदुपदेश । स्मरे पूर्वोपकारास ।
जीववी तो त्या सुतास । त्या दोघांस दे आरोग्य॥१९॥
असा **भा** ग्यें सत्पुरुष । भेटे, तरी जायी दोष ।
राजा पुसे सत्पुरुष । असे दोषहर कोठें ॥२०॥

भूसु र म्हणे भूपाप्रती। भीमातीरीं असे यती।
नामें नृसिंहसरस्वती। तयाप्रति जा भेटाया ॥२१॥

राजा त थास्तु म्हणून। तया विप्रा सत्कारून।
चतुरंग दळ घेऊन। भाव धरून पातला ॥२२॥

तो पा इ क दूरी करून। पायीं चालत येऊन।
संगमीं देवा पाहून। करी नमन एकभावें ॥२३॥

म्हण ति श्रीगुरू रजका। कोठें वससी येसी न कां।
भेटावया रे भाविका। तें ऐकुनी तो हो ज्ञानी ॥२४॥

निज गु ज प्राग्जन्मीचें। आठवी रूप श्रीपादाचें।
त्या वळखूनी मृदु वाचें। करि त्यांचें तो स्तवन॥२५॥

कां बा ह्य विषयाब्धींत। लोटिसी तूं कृपावंत।
आतां धरीं माझा हात। वरी त्वरीत काढी मज॥२६॥

तूं हा त माझा धरितां। मी येईन हो वरता।
मांडीवरी फोड होतां। त्या निमित्तानें ही भेट॥२७॥

माझा मं गळ हो भाव। गुरू म्हणे फोडा दाखिव।
येरू मांडी पाहे तंव। स्फोटकाभाव झालाची ॥२८॥

म्हणे शा बास हे भेट। माझा गमविला स्फोट।
म्हणे नेणें मी हें कूट। द्यावी भेट हा तव हेतू॥२९॥

मी शा स्त्र बाह्य जरी। गोहत्यादिक न करीं।
म्हणे माझी पहा पुरी। नमस्कारी वारंवार ॥३०॥

तो अ मि त सेना दावी। तयां पालखींत बैसवी।
स्वयें पायीं चाले पदवी। गुरु बैसवी यानीं तया॥३१॥

पुढें **द** र्शन घे म्हणून । पापनाशतीर्थीं येऊन ।
राहे गुरू त्या प्रार्थून । नागनाथ घरीं नेयी ॥३२॥

गुरू **मु** ख्य शिष्यांसहित । जेवूनियां तीर्थीं येत ।
तो राजा त्या नगरांत । ने वाजत गाजत गात॥३३॥

विवि **क्त** दृष्टि भगवान् । जाती पुरीं भक्ताधीन ।
दावी सर्वां भेटवोन । प्रीती करून निजैश्वर्या ॥३४॥

ती ग **म्म** त न बोलवे । महोत्सव केला रावें ।
आतां पाददास्य द्यावें । म्हणूनी भावें प्रार्थी भूप॥३५॥

तन **या** राज्य देऊन । तूं श्रीशैलावर येऊन ।
घेयीं माझें दर्शन । राव ज्ञान असो म्हणे ॥३६॥

पदीं **न** म्र झाला राव । आश्वासून गुरुराव ।
गाणगापुरीं पुनः ठाव । घेयी देव भक्ताधीन ॥३७॥

तें अ **घ** हारि दर्शन । होतां जनही हर्षून ।
सर्व करिती नीरांजन । गुरुस्तवनपूर्वक ते ॥३८॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे यवनोद्धरणं नाम
पंचाशत्तमो० ॥ ५० ॥ ग्रं० सं० ॥ ६९२ ॥

आतां **ए** थें न रहावें । कलियुगीं गुप्त व्हावें ।
असें म्हणतां गुरुराव । अवघे दुःखित होती ते ॥१॥

गुरू **त** यां आश्वासून । म्हणे भजती आतां हीन ।
पुढें येतील दुर्दिन । हें जाणून गुप्त राहूं ॥२॥

जे स **द्बु** द्धि असती लोक । दिसों तयांसी सम्यक् ।
गाणगापुरीं राहूं भाक । घ्या हो लोक त्रिवाचेसी ॥३॥

भवा **ध्वा** हो तुम्हां सुगम । भजतां पादुका जे काम ।
तें पुरोनि अंतीं धाम । मिळेल नाम माझें गातां ॥४॥
भवां **बु** धितरणार्थ । भजा मज मिळेल स्वार्थ ।
चरित गातां मनोरथ । पुरती, व्यर्थ चिंता नसो ॥५॥
हो स **द्धि** त पादुकार्चनीं । विघ्नहर चिंतामणी ।
अर्चा प्रातः कृष्णास्नानीं । जाउनि रोज येयीन मी॥६॥
भक्ति **मान्** भावी जसा जसा । त्यापाशीं मी तसा तसा ।
गुरूचा हो बोल ऐसा । नामधारका म्हणे सिद्ध ॥७॥
रह **स्या** र्थ गुरुचरिताचा । सिद्धनामधारकाचा ।
संवाद जो लोकीं साचा । सार तयाचा हा चिद्रस ॥८॥
हें स **त्कृ** पा करुनी दत्त । वदवी प्रेरुनियां चित्त ।
तया पदीं हा समस्त । समर्पित असो ग्रंथ ॥९॥

इतिश्री० प० प० वा० स० वि० सारे वरप्रदानं नाम
एकपंचाशत्तमो० ॥ ५१ ॥ ग्रं० सं० ॥ ७०० ॥

# आरती

जय **त** त्वज्ञाननिधान । अनसूयात्रिनंदन ।
त्वत्पदपद्मावरून । पंचप्राण ओंवाळीन ॥१॥
करीं **कृ** पा मायबापा । वारीं सर्व पापतापा ।
निजमार्ग करीं सोपा । अनुकंपा पूर्ण करून ॥२॥
जें अ **त्य** द्भुत तव रूप । तें ह्या चित्तीं आपोआप ।
राहो, जें कामकोप । उपशमवी प्रगटून ॥३॥

| | | |
|---|---|---|
| तप | श्च | र्या हे आमुची । त्वत्स्मृती नित्य होवो साची । |
| | | दुर्वासना मनाची । नुठवीं हेंची देयीं दान ॥४॥ |
| गूण | भा | वें तूझे गावें । अनासक्तीनें मी वागावें । |
| | | सत्संगा आदरावे । मज द्यावें हे वरदान ॥५॥ |
| अनु | र | क्ती त्वत्पदीं व्हावी । विषयीं विरक्ती व्हावी । |
| | | कष्ट येतां धृती व्हावी । सेवा बरवी घे हातून ॥६॥ |
| तार | त | त्सद्ब्रह्मार्पण । असो संपूर्णाचरण । |
| | | दृढ धरूं तव चरण । न मला त्वदन्य शरण ॥७॥ |

## इति श्रीसप्तशतीगुरुचरित्रं समाप्तम्

(कोणता ग्रंथ कोणत्या शकांत निर्माण झाला
याबद्दल ग्रंथकारांनीं दिलेल्या ओव्या)

कर्ता करविता दत्त । वासुदेव निमित्त येथ ।
तत्पदीं अर्पिला हा ग्रंथ । तोच येथ आदिमध्यातीं ॥ १ ॥
झालें अठराशें सहा शकांत । द्विसहस्र संस्कृत गुरुचरित ।
त्यावरती टीका अवर्षणाब्दांत । द्वारिकाक्षेत्रीं जाहली ॥ २ ॥
गुर्जरेच्छेनें तयेवरी । चूर्णिका झाली त्याचवत्सरीं ।
अठराशेंतेवीस वत्सरीं । त्रिशती त्यावरी हो संस्कृत ॥ ३ ॥
ओंवीसमानार्थ श्लोक संस्कृत । हो अठराशेंचोविसांत ।
गंगातीरीं दुजा कार्तिकांत । मराठी भाषेंत हे सप्तशती ॥ ४ ॥
दत्तपुराण संस्कृत । माहात्म्यसार प्राकृत ।
ग्रंथत्रय रसभरित । वदवी दत्त वासुदेवमुखें ॥ ५ ॥

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

# श्रीदत्तलीलामृताब्धिसार

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

ॐकार ज्याचा वाचक । जगद्धेतू[1] धीप्रेरक ।
तोचि देव सच्चित्सुख । एक दत्त ॥ १ ॥

दत्त अज निराकार । स्वेच्छामात्रें[2] हो साकार ।
अव्ययात्मा भक्ताधार । भक्तिगम्य ॥ २ ॥

अहंकार नाहीं ज्यास । कर्तृत्वादि कैंचें त्यास ।
तत्व नेणें हें जो त्यास । खास बंध ॥ ३ ॥

बंधें नानायोनि दुःख । भोगी जेव्हां जाणें एक ।
भक्तिमार्ग तेव्हां चोख । सुख पावे ॥ ४ ॥

पावे ऐसें सौख्य धर्में । भक्तिन्यस्त[3] नित्यकर्में ।
शमादिक विप्रा कर्में । भूपा शौर्य ॥ ५ ॥

व्यापार वैश्या शूद्रा सेवा । भर्तृसेवा स्त्रियां भवा ।
वारी वश्य करी देवा । भावाधीना ॥ ६ ॥

भावाधीन देव खास । एतदर्थ इतिहास ।
प्रतिष्ठानीं[4] करी वास । कौशिकाख्य ॥ ७ ॥

जातिमात्रें विप्रदेह । नित्य सेवी वेश्यागेह ।

---

[1] जगाच्या उत्पत्ति स्थिति विलयाला कारण. [2] स्वभक्तांच्या इच्छामात्रें. [3] ईश्वरोद्देशानें समर्पित. [4] पैठणामध्यें.

नेणे स्वस्त्री कृतोद्वाह[1] । मोहग्रस्त ॥ ८ ॥
ग्रस्त झाला महारोगें । शून्य झालीं त्याचीं अंगें ।
त्याला वेश्या टाकी वेगें । दूर देशीं ॥ ९ ॥
स्मरे तेव्हां तो भार्येला । हळू हळू गेहीं आला ।
सती म्हणे दैवें आला । भला देव ॥१०॥
दुर्गंध ये जरी त्यास । त्याचा वीट नसे तीस ।
अहोरात्र सेवी त्रास । न मानी ती ॥११॥
नीती तीणें न लंघितां । क्षणोक्षणीं हाणीं लाता ।
तथापी ती त्याच्या चित्ता । शांत करी ॥१२॥
पूय[2]-मूत्र-मळ क्षाळी । तरी देतो नित्य गाळी ।
निजोनी तो एकेवेळीं । वेश्या पाहे ॥१३॥
स्नेहें बोले तो भार्येला । वेश्यागेहीं नेयीं मला ।
ऐसें ऐकतांही तीला । झाला हर्ष ॥१४॥
वेश्येसाठीं भूषा[3] घेयी । धरी स्कंधीं धवा बायी ।
विद्युत्तेजें हळू पायीं । जायी ध्वांतीं ॥१५॥
चोरभ्रमें मांडव्यर्षी । शुळीं दिल्हा विप्र त्यासी ।
लागे म्हणे तो मरसी । सूर्योदयीं ॥१६॥
न हो सूर्योदय ऐसी । सती बोले स्वकार्यासी ।
करोनी ये स्वगेहासी । तीसी भी तो ॥१७॥
ठः[4] ठः ठरें ठरें ऐसें । स्तंभनची होय जैसें ।
साध्वीवाचें सूर्या असे । तैसें स्थैर्य ॥१८॥

---

१ विवाह केलेली स्त्री. २ पूं-रक्त. ३ भूषणें. ४ स्तंभनसूचक मंत्र.

वैषड्वश्य[1] करीं करीं । या मंत्रें जो वश्य करी ।
साहाय्य तो तिला हरी । करी वश्य ॥१९॥
न होतांची सूर्योदय । सर्वांलाही झालें भय ।
यज्ञलोपें देवां होय । एकादशी[2] ॥२०॥
आम्हीं देतां सुवृष्टीसी । याजीना[3] जो त्या मर्त्यांसी ।
पीडा द्यावी परी यांसी । काळ नाहीं ॥२१॥
ऐसें बोलोनी ते देव । ब्रम्ह्यापाशीं घेती धांव ।
ब्रह्मा बोले लपे देव । साध्वीशापें ॥२२॥
तेजें तेजा शमवावें । अनसूयेपाशीं जावें ।
ऐसें बोलोनी ते भावें । तेथें आले ॥२३॥
अत्रि-अनसूयेतें ते । विनवूनी पैठणातें ।
नेती सती बोले तीतें । माते धन्य ॥२४॥
पतीवीणें कांहीं तूज । नावडे कीं हितगुज ।
पती सर्वेश गे तूज । मज जेवीं ॥२५॥
स्त्रियां वेगळें न कर्म । पती देतो अर्ध धर्म ।
सुशीलत्वें लाभे शर्म[4] । पतिलोकीं ॥२६॥
येरी बोले हें यथार्थ । तुझें येणें हें किमर्थ ।
अनसूया बोले व्यर्थ । अनर्थ हा ॥२७॥
सूर्या बोलावीं तूं जरीं । तुझा भर्ता मरे तरीं ।
वाचवीं हें रुचे जरीं । तरीं करीं ॥२८॥

---

१ वेश्या वश्य कशी झाली एतदर्थ सूचक मंत्र. २ उपवास. ३ यज्ञ करीना. ४ सुख.

तथास्तु ती म्हणे सूर्या । ये बा ऐसें ऐकोनियां ।
आला सूर्य तो उदया । पडे[1] विप्र ॥२९॥
अनसूया वदे कांहीं । पतीविणें न मीं पाहीं ।
त्या धर्माच्या लेशें हा ही । विप्र वांचो ॥३०॥
[2]सव्याहृती बीजत्रय । उच्चारितां मृत्युंजय ।
मृताही ये जीव होय । तैसें तेव्हां ॥३१॥
अंतर्बाह्य त्याचा भाव । पालटला जेवीं देव ।
द्रां[3]बीजानें चिरंजीव । जेवीं होतो ॥३२॥
महानंद सर्वां झाला । अनसूये वर दिला ।
त्रिमूर्ति ये त्वत्कुक्षीला । देववरें ॥३३॥
देव गेले स्वस्थानासी । अनसूया त्या साध्वीसी ।
पुसोनी ये स्वगेहासी । अत्रीसह ॥३४॥
अंत[4]र्वत्नी वरें झाली । मार्गशीर्षीं सायंकाळीं ।
पूर्णिमेसी प्रसवली । तीन पुत्र ॥३५॥
सोम झाला ब्रह्मांशेंची । दत्तात्रेय विष्णू साची ।
दुर्वासा तो ह[5]रांशेंची । साध्वीधर्मे ॥३६॥
माखी न्हाणी पाजी त्यांतें । जो जो जो जो म्हणे ज्यांतें ।
गातां ठके वेद त्यांतें । साध्वी पाळीं ॥३७॥
सोम गेला चंद्रलोकीं । हिंडे दुर्वासा या लोकीं ।
पूर्ण दत्तत्रिमूर्ति कीं । गेहीं राहे ॥३८॥

---

१ मरे. २ व्याहृतिसहित हौंजूसः यांहीं संपुटित केलेला मृत्युंजय [illegible]
३ याच्या अनुष्ठानानें. ४ गर्भिणी. ५ शंकरांश.

ध्यानमग्न केव्हां नग्न । उन्मत्तसा कीं उद्विग्न ।
दिसे लोकां ब्रह्मलग्न । नानारूपें ॥३९॥
साध्य देव त्या नेणतां । बोलती कां वेदवार्ता ।
करीसी आश्रम आतां । कोण तूझा ॥४०॥
दत्त बोले पांचवा पां । आश्रम हा असे सोपा ।
निर्विकल्पें स्वात्मरूपा । जो पाहे त्या ॥४१॥
धैर्य सत्य शमें बुद्धी । धरा छेदा ग्रंथी आधीं ।
समत्वें न द्वैत बाधी । साधी शांती ॥४२॥
गर्वाक्रोश अवमान । द्रोह कामाद्यांचें भान ।
नसो न सोडा वाग्बाण । सोसा हे ही ॥४३॥
जैसा पट रंगें रंगी । तैसा होयी संगें संगी ।
साधुसंगें साधू अंगी । वेगीं बाणें ॥४४॥
निंदा सोडा जोडा पाणी । परछिद्रा सोडा पाणी ।
बोला धर्म्या गोडवाणी । जाणीव घ्या ॥४५॥
अवध्याचें सार घ्यावें । हर्ष शोका दवडावें ।
ह्या आश्रमा तेव्हां पावे । भावें ऐशा ॥४६॥
ऐसें देवीं हें ऐकोनी । दत्ता परात्मा मानुनी ।
गेले त्या कालापासूनी । मौनी येती ॥४७॥
शिष्य होवूं पाहाती ते । डोहीं बुडी दिह्ली दत्तें ।
किती गेले होते त्यांतें । पारखी तो ॥४८॥
वर घेवोनी स्वाश्रया । नग्नमाया मद्यप्याया ।
दत्त बैसे देखोनियां । पळाले ते ॥४९॥

धर्मातिक्रम साहस । जिरे ईशा न मूढास ।
शिवाविना जेवि वीष । जाळी अन्या ॥५०॥
कार्तवीर्य तो टिकला । तोचि सम्राट् मुक्त झाला ।
ऐका त्याच्या चरित्राला । पूर्वापर ॥५१॥
कृतवीर्य सोमवंशीं । पुत्रशोक झाला त्यासीं ।
गुरू[1] सांगे सप्तमीसी । सूर्या अर्चीं ॥५२॥
अपुत्रत्व मौढर्ये[2] स्राव । कैसा होवो पुत्राभाव ।
व्रत दे सत्पुत्र भाव । भाव ठेवीं ॥५३॥
सूर्य रुद्र सप्त माता । पूजीं होमीं ह्या देवता ।
चरू समिद्यवें ताता । आणी तिळें ॥५४॥
जीवत्पतिप्रजा नारीं । अभिषेकीं तीचा करीं ।
तेथें मंत्र हा उच्चारीं । वारी दोषा ॥५५॥
ग्रहर्क्षेंद्रदोष[3] वारी । जीवत्पुत्राहे हो नारी ।
कोणी बालातें न मारी । तारी हरी ॥५६॥
अभिषेक ऐसा होतां । तोषवी ते विप्रकांता ।
भोज्य दक्षिणा त्यां देतां । लाधे क्षेम ॥५७॥
दीर्घायू हा होवो बाल । त्रिमूर्ती गुह दिक्पाल ।
रिष्टहर्ते बहुसाल । पालक ते ॥५८॥
ऐसें ऐकोनी हें व्रत । राजा भावें आचरत ।
मैत्रेयी अनंत व्रत । तेंही सांगे ॥५९॥

---

१ बृहस्पती. २ सल [ गर्भ न वाढतां शुष्क होणें ]. ३ हा अभिप्राय ज्यामध्यें अशा मंत्रानें.

एक वर्ष हविष्यान्न । पौर्णिमेसी तत्पूजन ।
तत्स्त्री शीलधरा दीन । पूर्ण करी ॥६०॥
स्वप्नीं रूप दावी दत्त । होवोनियां अवधूत ।
बोले केलें पूर्ण व्रत । सुत घे हा ॥६१॥
माझा भक्त लक्षायू हा । चक्रवर्ती दुष्टारिहा ।
स्मर्तृगामी[1] हो हा पहा । महाराज ॥६२॥
राज्ञी हर्षें झाली जागी । स्वप्न सांगे भूपा वेगीं ।
राजा बोले राहीं जागी । त्यागीं झोपे[2] ॥६३॥
दिक्पालांश गर्भीं आला । मृद्भक्ष्याचा हो डोहाळा ।
करी राजा संस्कारांला[3] । झाला हर्ष ॥६४॥
उच्चीं पांच ग्रह येत । कोणाचेंही नसे अस्त ।
तेव्हां राज्ञी हो प्रसूत । शांत काळीं ॥६५॥
जोशी सांगे झाला पुत्र । हो श्रीदत्तकृपापात्र ।
स्मर्तृगामी हा सर्वत्र । शस्त्रधारी ॥६६॥
वारी पापा तापा नाम । याचें घेतां नष्टागम[4] ।
शेखीं पावे परंधाम । नामबळें ॥६७॥
राजा हर्षें करी धर्म । आत्मजाचें[5] जातकर्म ।
म्हणे माझें झालें शर्म । ऋणमुक्ती ॥६८॥
अर्जुन हें नाम ठेवी । वाढे पुत्र चंद्र जेवीं ।

---

१ स्मरण होतांच दर्शन देणार. २ पुनः झोप घेतली तर स्वप्न निष्फळ होतें या अभिप्रायानें हें सांगणें. ३ पुंसनवादि. ४ नष्टप्राप्ति. ५ पुत्राचें.

योग्य होतां व्रंता[1] सेवी । विद्या पढे ॥६९॥
कृतवीर्य दैवें मेला । न घे पुत्र तो राज्याला ।
सभेमध्यें तो सर्वांला । भला बोले ॥७०॥
व्यापाराचा द्वादशांश । भूमीचाही घे षष्ठांश ।
परी रक्षीना जो त्यांस । खास चोर ॥७१॥
क्रोधें लोभें दंडी दंड्या । सोडी झोडी जो अदंड्या ।
यम त्याच्या फोडी हड्यां । मांड्या तोडी ॥७२॥
राजा जरीं वागे न्यायें । भृत्य लुटती अन्यायें ।
राजा भोगी त्या अपायें । दुर्गतीतें ॥७३॥
भृत्य विश्वासें मी एक । कैसें वारूं ऐष्य[2] दुःख ।
हें ऐकतां मुनी[3] येक । ऐक म्हणे ॥७४॥
भूपा आराधीं तूं दत्ता । निववील तो त्वच्चित्ता ।
त्वद्रूपाला अनेकता । तो दे योगी ॥७५॥
ज्याचें सह्यगिरिस्थान । माहुरीं करी शयन ।
नित्य भागीरथीस्नान । तुंगांपान[4] ॥७६॥
कुरुक्षेत्रीं आचमन । कऱ्हाडांत संध्या ध्यान ।
कोल्हापुरीं भिक्षाटन । नित्य करी ॥७७॥
पंढरीसी विलेपन । सारापुरीं सुभोजन ।
स्मरतांची आगमन । शीघ्र करी ॥७८॥
दत्तात्रेय अभिधान । अनसूयात्रिनंदन ।
ज्याच्या योगें देवगण । स्वर्गीं सुखी ॥७९॥

---

१ मौंजीबंधन. २ येणारें. ३ गर्गाचार्य. ४ तुंगभद्रा नदींत.

जंभदैत्य स्वर्ग जेव्हां । घेयी देवां मारी तेव्हां
गुरू सांगे सर्वां देवां । सेवा दत्ता ॥८०॥
मग देव घेती भेटी । माया[1] दत्ता कंठीं मिठी ।
घाली स्वयें टाळ्या पिटी । मद्या प्राशी ॥८१॥
मारी देवां पळा म्हणे । नानापरी घाली भेणें ।
तथापी देव शहाणे । न पळती ॥८२॥
ऐसें एक वर्ष गेलें । प्रेमें दत्त देवां बोले ।
देवीं सर्व निवेदिलें । झालें जें तें ॥८३॥
दत्त बोले स्त्रीउच्छिष्ट । खातां झालों मी हा भ्रष्ट ।
माझा नसे जरी वीट । घ्या प्रसाद ॥८४॥
शत्रू येथें आणा म्हणे । मग देव जाती क्षणें ।
दैत्यीं मारितां ते भेणें । आले तेही[2] ॥८५॥
नारी दत्तांकीं देखिली । दैत्यीं भुलोनी घेतिली ।
दत्त बोले हानी झाली । यांची मारा ॥८६॥
परदारा[3]कर्षणें ते । क्षीण झाले देव त्यांतें ।
क्षणें मारोनी स्वर्गातें । घेते झाले ॥८७॥
माया दत्तरूपीं लीन । झालीं ऐसें हें ऐकोन ।
त्वरें आला तो अर्जुन । दत्तापाशीं ॥८८॥
तो हाणितां धिक्कारितां । कर्म बीभत्स दावितां ।
न जायी त्या दे उच्छिष्टा । तें तो खायी ॥८९॥

---

१ देवांला भूल घालण्यासाठीं मायेनें निर्माण केलेली स्त्री. २ दैत्यही.
३ स्त्री.

तेव्हां गेले भुज त्याचे । दत्त बोले संसर्गाचें ।
फळ हें जा येरू त्याचे । पाय धरी ॥९०॥
दत्त बोले सम्राट् हो तूं । सर्वैश्वर्य गती घे तूं ।
सर्वज्ञ अजिक्य हो तूं । धर्मी योगी ॥९१॥
सहस्रबाहू पाळक । रूपें धरसी अनेक ।
स्मर्तृगामी दुर्वारक[1] । नष्टदाता ॥९२॥
दत्ताज्ञें तो राज्यीं आला । अभिषेक देवें केला ।
तेव्हां बोले तो सर्वांला । ऐका आज्ञा ॥९३॥
एकला मी राज्य करीं । न दें कोणाला चाकरी ।
हानी होतां जो जो स्मरे । ये मी तेथें ॥९४॥
माझ्याविना जो शस्त्रातें । धरी पाप करी त्यातें ।
दंडीं ऐशा तदाज्ञेतें । भीते झाले ॥९५॥
राष्ट्रदुर्ग[2] मार्ग सेना । पशुक्षेत्र धान्य धना ।
राखी रूपें घे तो नाना । ज्ञानाब्धीसा[3] ॥९६॥
भूमि स्वर्गीं खपाताळीं[4] । राजा धुंडे सर्वकाळीं ।
स्मरतांची त्या जवळी । धांव घेतो ॥९७॥
ऐसा बळी तो ऐकोनी । आला रावण धांवोनी ।
स्त्रीयां करीं त्या बांधोनीं । दे पोरांतें ॥९८॥
कुबेरें तो सोडविला । सहस्रार्जुन नामाला ।
ऐशा परी तो पावला । झाला भला ॥९९॥

---

१ कष्ट किंवा निषिद्ध वारणारा. २ किल्ले. ३ दत्तात्रेयासारिखा. ४ आकाश.

प्रतिदिनीं घे दर्शन । दत्ताचें नित्य स्मरण ।
दशसहस्र हो यज्ञ । त्याणें केले ॥१००॥

इति श्रीदत्तलीलामृताब्धौ दत्तावतारपूर्वकार्जुनानुग्रहसंज्ञा प्रथमलहरी समाप्ता ॥ ओव्या १०० ॥ अक्षरें २८०० ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।
अंसा[1] राजा राज्य करी । त्या ये वैराग्यलहरी ।
राज्य टांकी दूरी धरीं । ज्ञानाब्धीतें ॥ १ ॥
ज्ञानाब्धी श्रीदत्तात्रेय । राजा येतां मौनी होय ।
उभा राजा चिंती पाय । अपायघ्न[2] ॥ २ ॥
ऐसे किती दिन गेले । दत्तें ध्यान न सोडीलें ।
भूपें स्तवा आरंभिलें । भ्यालें मन ॥ ३ ॥
येती देवर्षी प्रभातीं[3] । नित्य वंदूनि ते जाती ।
शांततपा कुंडी[4] हातीं । धरी राहे ॥ ४ ॥
एकेदिनीं उठे दत्त । कुंडी घेयी शौचा जात ।
यथाविधी होतां पूत[5] । शिष्य आला ॥ ५ ॥
त्याणें सामग्री[6] दीधली । दत्तें नित्य क्रिया केली ।
धारणा[7] ही आरंभिली । पैली जैसी ॥ ६ ॥
शिष्य म्हणे राजा येथ । प्रायोपवेशनें[8] त्रस्त ।
देतों अणी इच्छी वित्त । दत्त म्हणे ॥ ७ ॥
राजा वदे पुरे आतां । परीक्षा हे गुरूनाथा ।

---

१ ॐकाराचा पहिला अवयव. २ अपाय दूर करणारे. ३ प्रातःकाळीं. ४ कमंडलू. ५ पवित्र. ६ मृत्तिकादि. ७ योगधारणा. ८ उपोषणानें.

ज्ञानांविना नसे आस्था । आतां मला ॥ ८ ॥
मृत्यु माझा आज्ञाधार । देव माझे अनुचर ।
रिद्धिसिद्धीचें मी घर । हें त्वां केलें ॥ ९ ॥
राज्यलक्ष्मी पुत्र नारी । आप्त होती अंतीं दूरी ।
नको वार्ता यांची हरी । तारी शिष्या ॥१०॥
शास्त्रें झाला मला भ्रम । प्रत्येकाचें भिन्न वर्म ।
दत्त बोले एक धर्म । सर्वशास्त्रीं ॥११॥
क्षुद्र[1] शास्त्रें पढवितां । इंद्रें गुरूला पूसतां ।
तो त्या सांगे सात गाथा[2] । ह्या त्या ऐक ॥१२॥
एक शिल्पी शास्त्राधारें । बांधी देवालयें घरें ।
दान धर्म तेथें बरे । नित्य होती ॥१३॥
आधिव्याधी[3] कोणा नोहे । ऐसें त्याचें कौशल्य हें ।
रुचे सर्वां धन लाहे । वाहे धर्मीं ॥१४॥
मरोनी घे स्वर्गसुख । पुढें राजा तो धार्मिक ।
पुन: झाला विप्र चोख । ब्रह्मनिष्ठ ॥१५॥
एक विप्र स्मारशास्त्री[4] । जगीं धुंडे शास्त्रोक्त स्त्री ।
एका रायें कांता[5] पुत्री । त्या दाविली ॥१६॥
आली तेव्हां त्याला मूर्च्छा । कन्या करी त्याची इच्छा ।
राजा तैसी त्यांची वांच्छा । पूर्ण करी ॥१७॥
राज्यार्धेशी कन्या देयी । खुशी झाला तो जांवयी ।
स्माररंगें रंगी घेयी । तीर्शीं भोग ॥१८॥

---

१ अल्प. २ कथा. ३ मानसिक दुःख. ४ कामशास्त्री. ५ सुंदर.

[१]नरादिब्रह्मांतानंद। रतीं ते घे प्राज्ञ मंद।
ते नेणें तो अंतीं खेद। घे न शांती ॥१९॥
[२]केलई संयोगें ह्याला। मोहीं मोहीं म्हणे ज्याला।
ये अन्योन्या मोह आला। यांला तैसा ॥२०॥
अंतरतां होती कष्टी। परस्परां एक दृष्टी।
होती आनंदाच्या गोष्टी। पोटीं प्रेम ॥२१॥
ऐशा आनंदें तो मेला। सस्त्रीक गंधर्व झाला।
तेणें शंभू तोषविला। त्याला गातां ॥२२॥
शिवें ब्रह्मलोका नेला। तेथें घे [३]क्रमेंमुक्तीला।
तेव्हां दोष या शास्त्राला। आला कैसा ॥२३॥
वेदशर्मा गोदावासी। शांत दांत सुत त्यासी।
होता सात भूतें त्यासी। ग्रासीयेला ॥२४॥
पडे रडे उडे हंसे। खायी गाई न्हायी असे।
सात भाव करीतसे। पिसेपणें ॥२५॥
नाना उपाय योजिले। भूत एकही न गेलें।
एकेदिनीं [४]भिक्षू आले। दुर्गंधांगी ॥२६॥
विप्र भिक्षा देतां [५]छवी। त्याची देखे जेवीं रवी।
पळे भिक्षू विप्र [६]जवी। धावे पाठीं ॥२७॥
मार गाळी सोसी जेव्हां। दत्त दावी रूप तेव्हां।

---

१ मनुष्यापासून ब्रह्मानंदापर्यंत. २ क्लीं बीजानें [मोहन प्रयोगानें]. ३ मुक्ती चार–सलोकता, सरूपता, समीपता आणि सायुज्यता. ४ अवधूत. ५ कांती. ६ वेगानें.

विप्र वदे पुत्राला व्हा । प्राणदाते ॥२८॥
दत्त सात मंत्र सांगे । रोज एक एक सांगें[1] ।
त्याच्या कानीं ह्यानीं वेगें । भूतें जाती ॥२९॥
ऐसें सांगोनी हो गुप्त । विप्रें तैसें केलें व्यक्त ।
रोज रोज एक तप्त । भूत गेलें ॥३०॥
एका एका योगें जसे । मनोमल[2] जाती तसे ।
जो जो जाई त्याची नसे । ती ती चेष्टा ॥३१॥
फट्कारानें उच्चाटितां । राक्षस ही हो धांवता ।
भूताद्याची कैंची वार्ता । उच्चाटनें ॥३२॥
पुत्र झाला पूर्ववत । अभ्यासें हो जीवन्मुक्त ।
मंत्रशास्त्रें साधनांत । हीत हें हो ॥३३॥
मातापुरीं विष्णुदत्त । करी कर्म मीमांसोक्त[3] ।
त्याचे अंगणीं अश्वत्थ । गुप्त[4] असे ॥३४॥
ब्रह्मराक्षस त्या वृक्षीं । विप्रदत्तबळी[5] भक्षी ।
न देती जे त्यां तो शिक्षी । रक्षी विप्रा ॥३५॥
शुद्धान्ने ये त्या शांतता । वर दे तो विष्णुदत्ता ।
भार्यामतें मागे दत्ता । दावीं ऐसें ॥३६॥
बोले राक्षस हें जरीं । मला साक्षात् नोहे तरीं ।
दूरी दावीं स्वार्थ करी । [6]फेरी वारी ॥३७॥
एके दिनीं विप्रा भूत । दावी मद्यापणीं[7] दत्त ।

---

१ अंगोपांगसह. २ रागद्वेषादि. ३ मीमांसाशास्त्रप्रमाणें किंवा सुविचारानें. ४ राखलेला. ५ भूतबळी. ६ जन्ममरण. ७ मद्य विकणाराचे दुकानीं.

विप्र पाहे ह्मणे मत्त। दत्त न हा ॥३८॥
गुप्त झाला तो तात्काळ। विप्र ताडी स्वकपाळ।
भूत बोले दोन वेळ। दावीं पुनः ॥३९॥
भूत बोले एके दिनीं। आहे दत्त तो स्मशानीं।
विप्र गेला तेथें ह्याणी। त्यातें दत्त ॥४०॥
मागें होतां दत्त गुप्त। झाला विप्रा वदे भूत।
पुनः दावीं हो तूं सक्त[1]। पदीं धैर्यें ॥४१॥
पुनः दावी एके दिनीं। कुत्र्यां काकां दे छेदूनी।
खरमांस[2] त्या जावूनी। दत्ता पाहें ॥४२॥
पुसे काय कार्य तरी। सांगे श्राद्धीं क्षण करीं।
तरोनी तूं मला तारीं। वारीं भवा ॥४३॥
पत्नी बोले व्हा सादर। विप्र ह्मणे सोडीं दर[3]।
जातां दत्तपदीं फार। मार दे त्या ॥४४॥
वदे दत्त सोडीं पाद। तो बोले पुरवीं छंद[4]।
क्षण[5] घेयी दर्शश्राद्धा। सिद्ध करीं ॥४५॥
दत्त ह्मणे नष्ट भ्रष्ट। मी अस्पृष्ट तूं रे शिष्ट।
विप्र ह्मणे ब्रह्मनिष्ठ। वरिष्ठ तूं ॥४६॥
दत्त रूप दावी होती। श्वान काक श्रुतिस्मृती।
वदे विप्र माझी मुक्ती। होती झाली ॥४७॥
दत्त बोले मी यें विप्र। पंक्ति योग्य सांगें क्षिप्रं[6]।

---

१ आसक्त. २. गाढवाचें. ३ भय. ४ अभिलाष. ५ आमंत्रण.
६ सत्वर.

तेव्हां ये तो हर्षें विप्र। सांगे भूता ॥४८॥
भूत बोले सूर्याग्नीतें। योजीं तोही घरीं स्त्रीतें।
सर्व सांगे ती पाकातें। शीघ्र करी ॥४९॥
अन्नपूर्णा ज्याच्यापाशीं। तो श्रीदत्त ये त्यापाशीं।
सरसान्नाची[1] हो राशी। दासी सिद्धी ॥५०॥
येवोनी श्रीदत्त बोले। विप्र अद्यापी न आले।
पत्नी आसन दे बोले। बैसा येती ॥५१॥
ये ती बाहेर प्रार्थुनी। बा हे सूर्या तो घेवुनी।
विप्ररूपा त्या आसनीं। बैसवी ती ॥५२॥
दत्त वदे देवस्थानीं। कोण विप्र तें ऐकुनी।
प्रार्थी अग्नीतें येवूनी। तोही बैसे ॥५३॥
मग सांग श्राद्ध केलें। सर्व देव तृप्त झाले।
पितरही मोक्षा गेले। बोले विप्र ॥५४॥
ब्रह्मराक्षसोपदेशें। झालें दर्शन हें असें।
दत्ता ध्यान मनीं ठसे। ऐसें करी ॥५५॥
दत्त वदे मी त्वच्चित्ता। न सोडीं दे मदुच्छिष्टा।
भूता तो तूं स्त्रीही आतां। मुक्तता घ्या ॥५६॥
दत्त विद्या सूर्य यान[2]। अग्नी सिद्धी दे ते तीन।
गुप्त झाले धरी ध्यान। ब्राह्मण तो ॥५७॥
उच्छिष्टें हो भूत मुक्त। विप्र झाला प्रेष्ठ[3] भक्त।
आचरितां मीमांसोक्त। मुक्त हो कीं ॥५८॥

---

१ षड्रससहीत अन्नाची. २ वाहन. ३ श्रेष्ठ.

गोदातीरीं हरिशर्मा । विशीं भोगी पूर्वकर्मा ।
देवद्रोहें सहगुल्मा । जल्मा आला ॥५९॥
त्यांत क्षय द्वादशाब्दीं । ब्रह्मघातें षोडशाब्दीं ।
जलोदर पुढें त्र्यब्दीं । जीर्णज्वर ॥६०॥
हो षण्मासें अतिसार । चों मासानें भगंदर ।
त्रिदोष शेखीं थोर । मारक जो ॥६१॥
तत्खी जायी विष्णूदत्ता । शरण तो प्रायश्चित्ता ।
योजी कर्म विपाकोक्ता । स्त्रीकरवीं ॥६२॥
जों जों प्रायश्चित्त होत । रोग तों तों होयी नष्ट ।
त्रिदोषा वैद्य शास्त्रोक्त । मात्रा पाजी ॥६३॥
विप्र झाला रोगमुक्त । मत्र दे त्या विष्णुदत्त ।
त्याणें विप्र झाला सक्त । दत्तपदीं ॥६४॥
रोग जातां पुष्टीरसें । माया जातां ज्ञानें तसें ।
श्रेयं[3] तदर्थ हे असे । शास्त्रोपाय ॥६५॥
एक माता रोग होतां । निंब पाजी निजसुता ।
तो न पिये लाडू देतां । पीता झाला ॥६६॥
तैसी फलश्रुती[4] गौण । हें जाणे त्या ज्ञान पूर्ण ।
बाणें नेणें त्या भ्रमण । ये शास्त्रार्थीं ॥६७॥
लोकां प्रवृत्ती हो लाडू । भासे निवृत्ती ती कडू ।
आतां दावी फळ लाडू । श्रुतिमाता ॥६८॥
जगीं किंवा स्वर्गीं भोग । प्रयोग कीं शत्रू भंग ।

---

१ जन्मापासून वीस वर्षांमध्यें. २ शेवटीं. ३ मोक्ष. ४ कर्माचें फळ.

करावया हें शास्त्रांग । सांग करें ॥६९॥
एक देव दत्त देशीं । जातां मागें तत्स्त्रीपाशीं ।
घेवोनी पतिरूपासी । झोटिंग[1] ये ॥७०॥
म्हणे जाणें ज्या कार्यासी । तो भेटला वेशीपाशीं ।
परतलों मी शीघ्रेंशीं । प्राणप्रिये ॥७१॥
अशी तिशीं घाली भूली । भार्या सत्य समजली ।
भोग देतां ती भागली । आली शंका ॥७२॥
मोठी त्याची भोगशक्ती । पोटीं ठेवी लाजेनें ती ।
दाटी शोकें तों मासांतीं । पती आला ॥७३॥
पिसा[2] म्हणे त्या तूं कोण । विप्र म्हणे मी ब्राह्मण ।
माझे घरीं तूं रे कोण । मद्रूपानें ॥७४॥
तो म्हणे मी घरधनी । कपटी तूं जा येथूनी ।
तें ऐकोनी विप्र हाणी । तोही त्यातें ॥७५॥
ग्रामीं लोकां झाला खेद । त्यांच्या रूपा नसे भेद ।
विष्णुदत्तापाशीं वाद । तोडूं चला ॥७६॥
म्हणोनी ते तेथें आले । विष्णुदत्त त्यांतें बोले ।
तुल्यरूप दोघां भलें । तुल्यध्वनी[3] ॥७७॥
एक सत्य एक धूर्त । दावील हें आतां दत्त ।
विप्रा श्वेत भूता रक्त । रेखी मुद्रा ॥७८॥
पुसे एका एका भिन्न । घर वस्त्र धन धान्य ।

---

१ ब्रह्मचर्याश्रमीं कामार्त होऊन जो मरतो तो झोटिंग [भूत] होतो.
२ झोटिंग. ३ बोलणें.

स्त्रीचें लक्षण सामान्य। सांगे विप्र ॥७९॥
इटा कौलें वासे धन। कण संख्या पात्र मान।
स्त्रीचें बाह्यांतर्लक्षण। भूत सांगे ॥८०॥
तो संशय लोकां झाला। विप्र म्हणे या क्षेत्राला।
फिरोनी ये पूर्वीं त्याला। सत्य मानूं ॥८१॥
क्षणें भूत ये दे खूण। विप्रा लागे अर्धा दिन।
म्हणे त्यांतें सांगा खूण। ह्या नगाची[1] ॥८२॥
विप्र षड्यामें[2] ये भूत। यामांधें[3] लोक म्हणत।
नर नोहे हाची भूत। विप्र म्हणे ॥८३॥
या कुंडींच्या तोटींतून। ये तो घे स्त्री हें ऐकून।
रिघे भूत तद्बंधन[4]। विप्र करी ॥८४॥
ॐ हुं फट् भो महा वीरा। भूता बांधीं बांधीं वरा।
भूमीतळीं गाडी वरा। शिळा ठेवी ॥८५॥
लोकां म्हणे विष्णुदत्त। येतां ओळखिला भूत।
खात्री व्हाया क्रम येथ। हा दावीला ॥८६॥
सर्वां झाला महानंद। ऐसा शास्त्रें जातां खेद।
लाभे खरा परानंद। भेद नुरे ॥८७॥
एका विप्रा झाला सुत। पूर्वींचा तो योगभ्रष्ट।
उन्मत्तसा तो वर्तत। संगभयें ॥८८॥
मोठा होतांही तो नेणें। मळ-मूत्र खाणेंपिणें।

---

१ पर्वताची. २ सहा प्रहर. ३ चार घटिकांनीं. ४ ह्या अभिप्रायाच्या बंधन मंत्रानें.

कोणी म्हणें भूतभेणें । ऐसा हो कीं ॥८९॥
सर्वोपाय तातें केले । ते ते सर्व वायां गेले ।
विष्णुदत्तापाशीं नेलें । त्या बाळातें ॥९०॥
त्याणें ज्ञानी ओळखिला । लोकां म्हणे तुम्ही चला ।
बोले त्याला कां ह्या लीला । मुला केल्या ॥९१॥
कोणाचा तूं कोठें जासी । वाटे भय मोठें घेसी ।
आई-बापा कां न देसी । पुत्रसूख ॥९२॥
बाळ वदे हा एकला । सबाह्यांतरीं भरला ।
जाणें येणें नसे ह्याला । संबंधही ॥९३॥
भक्त वदे सत्य हेंची । तरीं भीती कां संगाची ।
चेष्टेपरी घे लोकांची । राहाटी तूं ॥९४॥
घरीं जारिणी वावरे । तिचें चित्त जारीं ठरे ।
ज्ञाता तेवीं क्रिया चरे । ब्रह्मीं लीन ॥९५॥
यांत त्याचा नसे तोटा । उपकार आणी चेष्टा ।
दोनी लाभे ब्रह्मनिष्ठा । नीति शास्त्रें ॥९६॥
मग बाळ सोडी खोडी । ब्राह्मणी त्या जेवूं वाढी ।
अन्न खातां तें दे दडी । भीती त्याची ॥९७॥
पिता पाहे शांत सुता । म्हणे घालविलें भूता ।
वंदुनी ते विष्णुदत्ता । जाती घरा ॥९८॥
भ्रममात्र हा संसार । यांत शास्त्रें मिळे सार ।
सारें भवपारावार । पार होई ॥९९॥
शास्त्रैक्यार्थ सात गाथा । गुरू सांगे देवनाथा ।

मग दत्तपदीं माथा । राव ठेवी ॥१००॥

इति श्रीदत्तलीलामृताब्धौ सप्तगाथाख्या
द्वितीयलहरी संपूर्णा । ओंव्या ॥२००॥

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।

उपदेश[1] गुरू सांगे । ह्या जो शिष्य घे षड्लिंगें[2] ।
तोच भक्त छोटी वेगें । मार्गे भवा ॥ १ ॥
भवातीत[3] निर्विकार । विभू आद्य अज पर ।
मायायोगें हो साकार । एक आत्मा ॥ २ ॥
स्वयें मायाऽविद्या हो तो । ईशा जीवा आभासें[4] तो ।
करी सत्य हें माने तो । होतो बद्ध ॥ ३ ॥
त्रिगुणमायायुक्तात्मा । त्यापासूनी जन्म व्योमा[5] ।
वाताग्नी आप भू जन्मा । क्रमें देतो ॥ ४ ॥
शब्दस्पर्श रूपरस । गंध एकोत्तर त्यांस ।
गुण दिले या पांचांस । घे तो बद्ध ॥ ५ ॥
पंचीकृत भूतयोगें । देह झाले हे अवघे ।
स्वस्वाधिक्यें देह वागे । स्वस्वाधीन[6] ॥ ६ ॥
भूतसत्वांशें वेगळीं । ज्ञानेंद्रियें पांच झालीं ।
अंतःकरणाते व्याली । सत्वैकता ॥ ७ ॥

---

१ ॐकाराचा द्वितीय वर्ण [ उ पदाचा ईश शंकर तो गुरु असाही अर्थ करावा. ] २. सहा शास्त्रें. ३ संसारधर्माहून वेगळा. ४ प्रतिबिंबानें. ५. आकाशाचा. ६ ज्या भूताचा अधिक अंश ज्या शरीरामध्यें तें शरीर त्या भूताच्या स्वाधीन राहतें.

रजोंशानीं कर्मेंद्रियें । प्राणा जन्म तदैक्यें ये ।
यांहीं लिंगदेहाला ये । आकारता ॥ ८ ॥
दिग्वातार्क वरुणाश्वी । ज्ञानेंद्रियें राहे तेवीं ।
अग्नींद्राज मृत्यू कवी[1] । कर्मेंद्रिया ॥ ९ ॥
धीचा जीव मना चंद्र । चित्ताधीश हो उपेंद्र ।
अहंकारपती रुद्र । चालक हे ॥१०॥
व्यष्टीचे[2] हे होत देव । समष्टीचे[3] अवयव ।
यांचा चालक तो देव । स्वयंज्योती ॥११॥
पंचीकृत स्थूळमूर्ती । तेथें विश्व घे जागृती ।
लिंगीं तैजस घे भ्रांती । स्वप्नाची हे ॥१२॥
अविद्या कारणदेह । तेथें प्राज्ञा निद्रा मोह ।
याचा साक्षी तुर्य न हो । संदेह[4] ज्या ॥१३॥
स्थूळ अन्नमयकोश । त्याचा जीवा जैं अध्यास ।
तेणें घे षड्विकारांस । भास हाही ॥१४॥
कर्मेंद्रियप्राणसंगें । नित्य भूक तहान घे ।
ज्ञानेंद्रिय मनें उगें । भ्रम करी ॥१५॥
ज्ञानेंद्रियबुद्धियोगें । कर्तृत्वाच्या लेपें फुगे ।
प्रियें[5] मोदें[6] प्रमोदें[7] घे । भोक्तृत्व हा ॥१६॥
जेव्हां होयी देहातीत । पंचकोशव्यतिरिक्त ।
दशासाक्षी[8] तेव्हां मुक्त । भक्त हो तो ॥१७॥

---

१ ब्रह्मा. २ निरनिराळे देहाचे. ३ विराटाचे. ४ संशय. ५ आवडत्या वस्तूचें दर्शन. ६ त्याचा लाभ. ७ त्याचा अनुभव. ८ जागृदादि अवस्था.

ऐसा होण्यासाठीं योग । अभ्यासावा हा अष्टांग ।
निर्वासन मनोभंग । चांग होई ॥१८॥
खोटें बोलों नये चोरी । हिंसा दुर्मैथुनें[1] वारी ।
सरळता धैर्य धरीं । दुःख होतां ॥१९॥
सर्वांवरी कृपा करीं । मृत्तोयानें शौच करीं ।
अवमानीं क्षमा धरीं । खाईं सूक्ष्म[2] ॥२०॥
यांचें नाम दहा यम । दाहा हे ऐक नियम ।
जपे देवगुरू नाम । देवा पूजीं ॥२१॥
वेदांताचा नित्याभ्यास । गुरुवाक्याचा विश्वास ।
कृच्छ्रें[3] शोषीं स्वदेहास । कर्मीं श्रद्धा ॥२२॥
दैवलाभें संतोषोन । पात्रीं देईं शक्त्या दान ।
निंद्या लाजें विष्णवर्पण । सर्व करीं ॥२३॥
उज्वा डावे मांडीवरी । डावा पाद उज्वेवरी ।
पृष्ठहस्तीं व्यस्त धरी । पादांगुष्ठा ॥२४॥
नासाग्राक्ष[4] सिधा बैसें । बद्धपद्मासन असें ।
किंवा सिद्धासनीं बैसें । भ्रूमध्याक्ष ॥२५॥
डावी खोंट गुदावरी । तयावरी उज्वी धरीं ।
नेमी[5] हनू उरीं धरीं । हेंचि सिद्ध ॥२६॥
दर्भ-चर्म-वस्त्रावरी । ऐसा बैसें तूं एकाग्रीं ।

---

१ शास्त्रनिषिद्ध मैथुन न करणें हें गृहस्थांस उद्देशूनच समजावें. २ पोटाचे दोन भाग अन्न व एक जळानें भरून चौथा रिता ठेवणें. ३ चांद्रायणादिक. ४ नासिकाग्रावर दृष्टी. ५ नमस्कार करी किंवा हनुवट नम्र करी.

जलाग्न्यादी भीति दूरी । करीं पूर्वी ॥२७॥
घेयीं डावे नासापुटीं । सोळा अंकें वायू पोटीं ।
चतुर्गुणें घे हन्वटी । खाली धरीं ॥२८॥
दुजा नासापुटें सोडी । बत्तीसांनीं पुनः ओढी ।
विपरीत शुद्धनाडी । हो अभ्यासें ॥२९॥
तीन वेळ वीस वीस । वाढवावें कुंभकास ।
ऐसें करीं तीन मास । खास सिद्धी ॥३०॥
कनिष्ठानें[1] घर्म येतो । मध्यमें देह कांपतो ।
ब्रह्मरंध्रीं प्राण जातो । उत्तमानें ॥३१॥
दों पळें पांच विपळें । होतो प्राणायाम बळें ।
तो उत्तम त्याणें ढळे । कुंडलिनी ॥३२॥
पंचवीस पळें ठरे । तेव्हां प्रत्याहारें नुरे ।
बाह्यभान धारणारे । दोंघडीनें[2] ॥३३॥
अहो रात्रें घडे ध्यान । करीं निद्रा निवारण ।
विक्षेपा[3] दे प्रशमन । रस नेघें ॥३४॥
श्रवणाचें हें मनन । आंत युक्तीनें सेवन ।
स्वप्नवत् द्वैतभान । मान मिथ्या ॥३५॥
तो मी साक्षी परिपूर्ण । ऐसें नित्य करीं ध्यान ।
ध्येयाकार होतां मन । समाधी हो ॥३६॥
आदर्शस्थमुखें भान । मुखाचें हो तेवीं जाण ।
बुद्धिप्रतिबिंबें भान । हो स्वात्म्याला ॥३७॥

---

१ कनिष्ठ प्राणायामानें २. पांच घटिकांनीं. ३ विषयांतर.

चित्तेंद्रियें न दाविती । स्वात्म्या तो घे स्वप्रतीती ।
वृत्तिज्ञानें तेंही अंतीं । रूपीं मुरे ॥३८॥
कतकरजोन्यायानें । ज्ञान मुरतां तत्क्षणें ।
फुरे स्वात्मा एकपणें । पूर्णानंद ॥३९॥
निद्रेमाजी जरीं ऐसें । तेथें वृत्तिज्ञान नसे ।
सामान्याशीं वैर नसे । अज्ञानाचें ॥४०॥
सूर्यतेजें जेवीं तृणें । न जळती संयोगानें ।
सूर्यकांताचा तत्क्षणें । भस्म होती ॥४१॥
तैसें वृत्तिज्ञान जाणा । जहदजहल्लक्षणा ।
तत्वंपदार्थैक्य खुणा । दावी खास ॥४२॥
धरी जेव्हां योगीं चाड । तेव्हां सिद्धी येती आड ।
योगा घालीती बिघड । द्वाड त्यारे ॥४३॥
अणिमादी आठ सिद्धी । दाहा अन्य उपसिद्धी ।
येथें न धरावी बुद्धी । नश्वर ह्या ॥४४॥
धरीती त्या जरी कास । त्यांची न ठेवावी आस ।
ऐसा नर करी त्यास । खास मोक्ष ॥४५॥
योगभ्रष्ट झाला तरी । तो मोक्ष घे जन्मांतरीं ।
प्रभाव हा योगोदरीं । तारी साच ॥४६॥
क्रममुक्ती ब्रह्मलोकीं । ब्रम्ह्याबरोबर ये कीं ।
अप्रतिबद्धा या लोकीं । जीवन्मुक्ती ॥४७॥

---

१ निवळीची बी. २ विरुद्ध टाकून अविरुद्ध घेणेंची लक्षणा. ३ जीव-ब्रह्मैकत्वाचा. ४ ज्याच्या ज्ञानाला विघ्न न आलें त्याला.

ज्ञानी तदर्थ उपाय । करीती ते सर्वापाय ।
निवारिती तूं ही सोय । धरीं अंगें ॥४८॥
अर्थां[1] भुलेना जो ज्ञाता । मुग्ध तो जो मार्गीं जातां ।
न दे दृष्टी इतस्तता । आंधळा तो ॥४९॥
निंदा स्तुती न घे कानीं । भेरा तो मितसद्वाणी[2] ।
बोले स्वादा दे सोडूनी । अजिह्व तो ॥५०॥
भिक्षा शौचार्थ जो जाई । पंगू तो जो कशी बाई ।
पाहूनी न भुली घेई । तोची षंढ ॥५१॥
ऐसा वागे त्या ये सिद्धी । तूंही ऐसा योग साधीं ।
गुहा ही घे येथें आधी । कधीं न हो ॥५२॥
ठेवी दत्त शिरीं हात । राजा वंदी जाई तेथ ।
तीन दिन हो ध्यानस्थ । प्रसादानें ॥५३॥
पुनःही हो बारा दिन । समाधिस्थ मास तीन ।
पुसे त्याला उठवून । दत्तात्रेय ॥५४॥
म्हणे बोले अनुभव । बोले राजा जेथें वाव ।
त्रिपुटीला[3] नसे ठाव । वृत्तिज्ञाना ॥५५॥
होतों तेथें समाहित । जाणीलें हें मीं ऊठतां ।
पूर्वाभ्यासानुवृत्तिता[4] । तर्किजे ते ॥५६॥
तो आनंद कैसा कोण । वदे दैवें ज्या सोडोन ।
आलों येथें घे चरण । हे ही तैसे ॥५७॥

---

१ द्रव्याला. २ थोडें व सुरस बोलणें. ३ ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय. ४ समाधी-पूर्वी अभ्यासानें असलेली वृत्ति पुढें येतें ती अनुवृत्ति.

दत्त हसोनी जेववी । पुनः अभ्यासा पाठवी ।
वर्ष होतां त्या ऊठवी । स्वयें दत्त ॥५८॥
दत्त बोले तूं कृतार्थ । करीं राज्य भोगीं अर्थ ।
जरी नसे तुला स्वार्थ । तरी जा रे ॥५९॥
निज प्रारब्ध भोगावें । अनासक्तीनें वागावें ।
सदा स्वरूपीं जागावें । गावें देवा ॥६०॥
लोकबाधानिरासार्थ । लोकां दावीं विपरीत ।
भावें धरीं हृदयांत । नित्य धर्म ॥६१॥
वर्म ऐसें सांगे दत्त । राजा शिरीं धरी जात ।
राष्ट्रीं तैसें आचरत । दत्ता स्मरे ॥६२॥
करी विप्रोद्वाह[1] बांधी । तळीं धन अश्वमेधीं ।
वेंची ज्याच्या राष्ट्रीं आधी । व्याधी नसे ॥६३॥
स्वयें पाळी सप्तद्वीपा । स्मरे जो त्या दावी रूपा ।
अनेकत्व ये तद्रूपा । दीपा जेवीं ॥६४॥
तेव्हां सर्व सुवासिनी । वृद्ध होती सर्व प्राणी ।
ईति[2]भीती नेणें कोणी । आणी नैस्वं[3]य ॥६५॥
खें खें मारीं मारी अरी[4] । अशा जपें हो त्या परी ।
नामें कार्तवीर्य मारी । अरि चोरां ॥६६॥
स्वाहा शमवीं शमवीं । ह्याचेपरी पराभवी ।
बा[5]धा दोष रोष देवी । कार्तवीर्य ॥६७॥

---

१ ब्राह्मणाचें लग्न. २ अनावृष्टयादि. ३ निर्धनता. ४ शत्रू. ५ भूतादि बाधा, दृष्टिदोष, राजादिकांचा रोष, प्रसिद्ध देवी महामारी.

पर्जन्येंद्र ऋष्यशृंग। मंडूक दे मंत्रें[1] चांग।
वृष्टी तेवीं दे अव्यंग। अर्जुनाख्या ॥६८॥
उमा रमा-सरस्वती। ऋद्धिसिद्धी बुद्धी देती।
कार्तवीर्यनामें हातीं। येती तीन्ही ॥६९॥
ऐसा राजा तो एकदा। भुजीं वळवी नर्मदा।
कांता खेळवी नर्मदा[2]। मदांधसा ॥७०॥
कोपें सिंधू ये धावुनी। राजा लोटी त्या ताडूनी।
पळे तो वेळा सोडुनी। मनीं खचे ॥७१॥
कर्कोटक नागसुत। कार्तवीर्यावरी येत।
त्या जिंकोनी पद[3] घेत। राजा त्याचें ॥७२॥
पाहोनी हें त्याचें शौर्य। देवांलाही न हो धैर्य।
त्याच्यापुढें केवीं वीर्य[4]। मर्त्य दावी ॥७३॥
असा राजा बळी जरी। विप्रांवरी प्रीती करी।
अतिथींला तो सत्कारी। तारी दीना ॥७४॥
नित्य निजधर्में वागे। अन्या वागवीतो अंगें।
नित्य निजरूपीं जागे। रंगे रूपीं ॥७५॥
८५००० पंचाशीति सहस्राब्द। राज्य केलें जेवी अब्दें[5]।
वर्षे दाने दे न शब्द। कठोर दे ॥७६॥
पुत्रापरी प्रजा पाळी। कधीं कोणा न दे गाळी।
विप्राज्ञेतें धरी भाळीं। बळी जरी ॥७७॥

१ त्याच्या बीजानें युक्त मंत्र. २ विलास देणाऱ्या. ३ स्थान. ४ पराक्रम. ५ मेघ.

त्याचें सौभाग्य अमित । पुत्र झाले त्याला शत ।
ते सर्वही पितृभक्त । सक्त धर्मीं ॥७८॥
दत्तापाशीं एके दिनीं । कार्तवीर्य तो येवुनी ।
मृदु बोले लीनपणीं । भक्तीभावें ॥७९॥
प्रारब्धाचा भोग धाला । आतां मारा तुम्हीं मला ।
दत्त म्हणे आतां तूला । कसा मारूं ॥८०॥
राजा म्हणे स्वामी ऐका । क्षत्रियांचा देह जो कां ।
धारातीर्थीं धर्मे चोखा । पडावा जी ॥८१॥
तरीं याला मारणार । समर्थ न सुरासुर ।
तेथें काय हे पामर । नर बोला ॥८२॥
बोले श्रीदत्त हांसूनी । तुझी निष्ठा ही पाहोनी ।
वर देतों संतोषोनी । प्रिय भक्ता ॥८३॥
तुला मारो द्व्यात्योधिक । जातमंतुमिषें ऐक ।
रणीं तो मी ऐसी चोख । भाक घे हे ॥८४॥
ऐसें ऐकोनी अर्जुन । वंदोनी ये संतोषोन ।
करी अश्वमेध यज्ञ । निष्कामेशी ॥८५॥
कोणी अश्वा न धरिती । अश्वमेध सांग होती ।
ते देखोनी देवां भीती । येती झाली ॥८६॥
देवीं पाठविला सूर्या । सत्व त्याचें हरावया ।
ये अतिथी होवोनियां । विप्ररूपें ॥८७॥
राजा म्हणे माग इष्ट । तो बोलिला रितें पोट ।

१ धर्मयुद्धामध्यें. २ ब्राह्मण. ३ अपराधाच्या निमित्तानें.

स्थावरांची भिक्षा तुष्ट । मातें करी ॥८८॥
राजा म्हणे देतों ती मी । विप्र न व्हा कोण तुम्हीं ।
मग सूर्य निजधामीं । प्रगटला ॥८९॥
धन्य झालों म्हणे राजा । सप्तद्विपींचा उब्दीजा ।
घेयीं सूर्य म्हणे राजा । घे हे बाण ॥९०॥
सोडीं याहीं ते वाळती । अग्निरूपें तयांप्रती ।
सेवीं म्हणोनी दे हातीं । भाते सूर्य ॥९१॥
पांचशें तो चापें जोडी । राजा तेची बाण सोडी ।
झाले शुष्क वृक्ष तोंडीं । धरी सूर्य ॥९२॥
सर्व वृक्ष भस्म झाले । ध्यान सोडुनी देखिलें ।
वसिष्ठानें तें पूसिलें । शिष्यवर्गा ॥९३॥
सांगती ते त्या! अर्जुनें । वृक्ष शोषीले ये बाणें ।
ते जाळीले दावाग्नीनें । भूतळींचे ॥९४॥
तेव्हां क्रोधें मुनी वदे । हा आम्हाही नेणें मदें ।
मरो विप्रहस्तें खांदे । तुटोनी हा ॥९५॥
ऐसा दैवें झाला शाप । तेव्हां उद्धत हो नृप ।
स्वर्गीं गेला देवां कोप । ये पाहुनी ॥९६॥
देवीं त्याशीं युद्ध केलें । भूपें देव पळविले ।
विष्णूला शरण गेले । छिन्नभिन्न ॥९७॥
कार्तवीर्या मारा आतां । ऐसें देवीं विनवितां ।
वरा शापा आठविता । झाला विष्णू ॥९८॥

---

१ वृक्षवल्यादि. २ स्वकीय रूपानें. ३ धनुष्य.

विप्ररूपें मारूं त्यास। चला म्हणे तो देवांस।
देव आले स्वस्थानास। भीत भीत ॥९९॥
विष्णू हो भार्गवराम। मंतूमिषें त्या संग्राम।
करोनी दे परंधाम। भूमानंदें ॥१००॥

इति श्रीदत्तलीलामृताब्धौ कार्तवीर्यप्रतापाख्या
तृतीयलहरी संपूर्णा। ओव्या ॥३००॥

श्रीगणेशाय नमः। श्रीदत्तात्रेयाय नमः।

महाराज सोमवंशीं। गाधी कन्या झाली त्यासी।
सत्यवती मागे तीसी। ऋचकर्षी ॥ १ ॥
राजा चिंती कैसी द्यावी। कन्या मान्य जैसी देवी।
याला फिरवावा केवीं। शापील हा ॥ २ ॥
मग राजा म्हणे त्याला। माझा एक पण झाला।
जो दे श्यामकर्णाश्वांला। सहस्रेंशीं ॥ ३ ॥
त्याला कन्या द्यावी ऐसी। प्रतिज्ञा हे तुला कैसी।
साधे मुनि वदे त्यांसी। देतों अश्व ॥ ४ ॥
त्यानें तो वरुणापाशीं। अश्वां पाहोनी वेगेंसी।
येवोनी तो मुनी त्यासी। सर्व सांगे ॥ ५ ॥
वरुणही तें ऐकोनी। तेव्हां डचकला मनीं।
मागें फिरवितां मुनी। शापील हा ॥ ६ ॥
अश्वां पाजितां मदिरा। ते न जाती मुनीश्वरा।

१ अपराध. २ अपरिछिन्न आनंदानें. ३ प्रणवाचा अंतिमवर्ण अ उ म असे अनुक्रमें शतकादि असून ॐ झाला. ४ मद्य.

तो योजूनी या प्रकारा । दे अश्वांतें ॥ ७ ॥
योगबळें ते घेवून । आला त्याला तो पाहून ।
हर्षे देई कन्यादान । मानपूर्व ॥ ८ ॥
देव पाहोनी ह्मणती । योगीश्वरां मोठी शक्ती ।
अघटित घटवीती । मिती न हो ॥ ९ ॥
गाधी म्हणे परगोत्रा । कन्या गेली न मीं पुत्रा ।
देखें म्हणोनी हो मित्रा । मुनिवर्या ॥१०॥
मुनी म्हणे होवो तुला । पुत्र जातों आश्रमाला ।
सवें घेवोनी पत्नीला । ताता भेटों ॥११॥
मग पत्नीला घेवोनी । भृगूपाशीं तो येवोनी ।
सांगे सर्व त्या वंदूनी । भृगू हर्षे ॥१२॥
सत्यवती पतिव्रता । भर्तृ-श्वशुरांच्या चित्ता ।
धर्मे शर्म[1] दे अश्रांता । भृगु तोषे ॥१३॥
बोले इष्ट वर घेयी । सती लीन झाली पायीं ।
मला योग्य सुता देई । आयीला ही ॥१४॥
मुनी बोले तूं अश्वत्था । औदुंबरा तुझी माता ।
सेवो संस्कारुनी भाता । खातां सिद्धी ॥१५॥
मग तातगेहीं ये ती । भर्त्यासह तेणे रीती ।
करी चरू घेतां भ्रांती । होती झाली ॥१६॥
कन्या मातृचरू[2] भक्षी । माता कन्येचा ते वीक्षी[3] ।
ज्ञानदृष्टी भृगू साक्षी । तेथें आला ॥१७॥

---

१ सुख. २ होम शेष भात. ३ अवलोकन करी.

म्हणे सुने हो व्यत्यय[1] । तुझा पुत्र हो क्षत्रिय ।
मातेचा तो विप्र होय । काय केलें ॥१८॥
खिन्न सून पायीं घेई । मिठी पोटीं विप्र येई ।
ऐसें करावे उपायीं । म्हणे दीन ॥१९॥
भृगू बोले विप्र होय । पुत्र पौत्रे[2] हो क्षत्रिय ।
ऐसें आश्वासोनी जाय । निजाश्रमा ॥२०॥
व्याली सत्यवती पुत्र । जमदग्नी जो पवित्र ।
शंकरांश ज्ञानपात्र । मंत्रद्रष्टा[3] ॥२१॥
तीची माता व्याली पुत्र । नामें तो हो विश्वामित्र ।
विप्रपूज्य हो सर्वत्र । मंत्रबळें[4] ॥२२॥
गौरीकला रेणूसुता । जमदग्नीची ती कांता[5] ।
रेणुकाख्या पतिव्रता । शांताकारा ॥२३॥
तिला झाले तीन सुत । चौथा पोटीं ये साक्षांत ।
केशवांश जो विख्यात । रामनाम ॥२४॥
वेदशास्त्र तो पढला । धनुर्वेदाभिज्ञ झाला ।
ज्याणे शिवा तोषविला । शिष्यधर्मे ॥२५॥
एके दिनीं ती रेणुका । देखे गंधर्वनायका ।
नदीमध्यें घे स्त्रीसुखा । मुखा चोंखी ॥२६॥
तें पाहोनी ती भुलली । किंचिज्जळांत चालिली ।
दैवें मनीं डचकली । ओली आली ॥२७॥

---

१ बदलणें. २ नातू. ३ वेदमंत्रांचा ऋषी. ४ गायत्री मंत्राच्या शक्तीनें. ५ भार्या.

म्हणे कैसी झाली भूल । आतां पती कीं शापिल ।
त्वरें घेवोनी ये जल । शीलवती ॥२८॥
पती कोपें तिला बोले । तोंड न दावीं आपुलें ।
वाटती जे तुला भले । चाले तेथें ॥२९॥
तेव्हां थरथर कापे । पुत्रा सांगे मुनी कोपें ।
ईचा मुंडा तोडा पापें । जाती तेव्हां ॥३०॥
तिघेही ते स्नेहें भ्याले । तीचें शीर न तोडीलें ।
तातें त्यांतेंही शापिलें । केलें भस्म ॥३१॥
रानीं समिद्दर्भासाठीं । राम गेला तो ये पाठीं ।
तेव्हां मुनींची ये दृष्टी । तयावरी ॥३२॥
बोले ही हो अमंगळा । रामा ईचा कांटीं[1] गळा ।
न विचारीं तूं ये वेळा । बलाढ्या रे ॥३३॥
राम मनीं न शंकितां । हातीं परशू जो होता ।
तीच्या कंठीं तो मारितां । तुटे शीर ॥३४॥
धड पडे भूमीतळा । वाहे लोहं[2] भळा भळा ।
जरीं राम पाहे डोळां । तरीं न भी ॥३५॥
तेव्हां शांत झाला मुनी । म्हणे रामा आलिंगोनी ।
माझे वाक्यें त्वां जननी । मारीली हे ॥३६॥
पूर्ण तूं रे पितृभक्त । धन्य हो तूं अनासक्त ।
आतां काय तुझें चित्त । वर इच्छी ॥३७॥
राम म्हणे माझी माता । उठो बंधू तेही आतां ।

---

१ तोडीं. २ रक्त.

चिरंजीवित्व दे ताता । विजयत्व ॥३८॥
माझ्याहुनी न हो शूर । कोणी युद्धीं धुरंधर ।
मुनी बोले दिल्हे वर । रामा हे म्यां ॥३९॥
तेव्हां आपोआप शीर । जडे तेव्हां ती सत्वर ।
उठे तैसे ते भ्रातर । जिते झाले ॥४०॥
राम मनीं आनंदला । पायीं मातेच्या लागला ।
तीणें त्याला आलिंगीला । पुत्रस्नेहें ॥४१॥
म्हणे धारातीर्थीं पुत्रा । शुद्ध केलें माझ्या गात्रा ।
पुन: याच्या स्मृतिमात्रा । न शीवसी ॥४२॥
पातिव्रत्या सांभाळी ती । ह्या ख्यातीतें धरो चित्तीं ।
जातां अन्याठायीं वृत्ती । गती ऐशी ॥४३॥
उँ:रे चित्ता कामासक्ता । आम्हां बुडविशी संता ।
तुला धिक् धिक् तूं हो आतां । शांत दांत ॥४४॥
काम ठाईचा चावटा । भल्याचाही करी तोटा ।
बुडवी हा कट कटा । मोठा खोटा ॥४५॥
लुटी सर्वां ऐशा चोरा । कां देशी रे चित्ता थारा ।
आतां धरीं सुविचारा । सारासारा ॥४६॥
मोक्ष किंवा स्वर्गलोक । तुझ्यायोगें ये नरक ।
तेव्हां आतां तूंच ऐक । एक सांगे ॥४७॥
मुमुक्षेचा[1] करीं काम । प्रियपादीं घे विश्राम ।
तेणें लाभे सर्वोत्तम । धाम[2] जे तें ॥४८॥

---

१ मुक्ती होण्याची इच्छा. २ ब्रह्मस्वरूप.

ऐसें चित्त वळवूनी । साध्वी ठेवी स्थिरवूनी ।
भर्तृपादीं लीनपणीं । सेवी भावें ॥४९॥
एके दिनीं तो अर्जुन । जातां वनीं विलोकून ।
जमदग्न्याश्रमस्थान । आला तेथें ॥५०॥
तो रेणुकामुनीश्वर । पाहे जेवीं गौरीहर ।
प्रेमें करी नमस्कार । दूर राहे ॥५१॥
मुनी भूपा बैसवूनी । पुसे क्षेम समाधानीं ।
कामधेनुप्रसादोनी । त्या जेववी ॥५२॥
राजा वदे दे धेनूसी । देतों धन गोधनासी ।
मुनी म्हणे देऊं कैसी । होमधेनू ॥५३॥
बलात्कारें त्या धेनूला । राजा घेवोनी चालला ।
मागें वनांतूनी आला । राम वेगें ॥५४॥
धेनू नेली हें ऐकोनि । भूपावरी तो कोपोनी ।
हातीं परशू घेवूनी । धांवे वेगें ॥५५॥
मेघगंभीर वचनें । फिरवूनी भूपा म्हणे ।
रे रे चोरा माझे भेणें । ने घेसी कीं ॥५६॥
राजा नव्हे तूं चोरटा । कुळा लावीयेला बट्टा ।
न मानी हे मूर्खा थट्टा । कंठा छेदीं ॥५७॥
मेदीं तुझ्या वक्षस्थळा । दावी कळा तूं कुशळा ।
क्षेत्रा पाहे विप्रबळा । बळावें त्वां ॥५८॥
तेव्हां रामा पाहे भूप । तो त्या भासे उग्ररूप ।

१ कार्तवीर्यार्जुना.

जेवीं अग्नी खातां तूप । ज्वाळामाळी ॥५९॥
न हा विप्र शस्त्रधारी । माझ्यासाठीं आला हरी ।
याशीं युद्ध घोर करीं । मारील हा ॥६०॥
लहान हा दिसे परी । द्यावी वामनाची सरी ।
ऐसें विचारूनी करी । स्वारी भूप ॥६१॥
तेव्हां पंचशत चाप । सज्ज करी करीं[1] भूप ।
राहे रामाच्या समीप । तपनसा[2] ॥६२॥
न साहिला यत्प्रताप । कोणी तो हा दीप्तरूप ।
सहस्रकर अमूप । तपःसिद्ध ॥६३॥
सिद्धसाध्य.देवमुनी । स्वर्गीं विमानीं बैसोनी ।
युद्ध पाहती हर्षोनी । मनीं तेव्हां ॥६४॥
अचूक त्याचें संधान । सोडी पांचशें मार्गण[3] ।
वेळोवेळ आच्छादून । ठेवी राम ॥६५॥
वेळोवेळ अभिनव । शस्त्र सोडी वेगें राव ।
पाहूनी हस्तलाघव । राम हर्षे ॥६६॥
राम म्हणे वीर धन्य । याला मारी कोण अन्य ।
प्रतापी हा भंगशून्य[4] । मान्य वीरां ॥६७॥
राम तोडी त्याचे बाण । तरी मारी तो दारुण ।
मग परशू घेवून । बाहू तोडी ॥६८॥
तोडी बाहू पटपटा । शस्त्र वाजे खटखटा ।
पडती ते चटचटा । उठाउठी ॥६९॥

---

१ हातांत. २ सूर्य. ३ बाण. ४ पराजय न झालेला.

बाहू जेथोनी तूटती । पुनः तेथोनी फुटती ।
तेही हाणाया ऊठती । मती खचे ॥७०॥
खचे राम तेव्हां मनीं । ध्वनी[1] झाला व्योमांतूनी ।
पूर्वी न टाकीं तोडुनी । बाहू याचे ॥७१॥
दत्तात्रेयवरें जाण । उरी भुजबीजस्थान ।
आहे पूर्वी तें शोषून । छेदीं मग ॥७२॥
तेव्हां आग्नेयास्त्रें राम । शोषून घे तन्निर्गम[2] ।
मग भूप जपे नाम । श्रीदत्ताचें ॥७३॥
रामें ते भुज तोडिले । दोन अभेद्य राहिले ।
बाहूंचे पर्वत झाले । भूमीतळीं ॥७४॥
दोघे वीर अनिवार । महाशूर महाधीर ।
करूं वांच्छिती जर्जर । परस्परां ॥७५॥
सोडिताति वारंवार । तोडिताती परस्पर ।
शस्त्रें दोघे भराभर । मार देती ॥७६॥
राम चिंती स्वगुरुला । तेव्हां भूप समजला ।
म्हणे अंतकाळ आला । ह्या देहाचा ॥७७॥
मग गुरूपदेशातें । आठवूनी इंद्रियांतें ।
मनी योजी त्या मनांतें । प्राणामध्यें ॥७८॥
धारणेनें प्राण योजी । अनुक्रमें राजा तेजीं ।
तेजा तेजःपुंजामाजीं । योजी योगें ॥७९॥
अखंडैक रसत्व जें । तत्वं पदार्थांचे साजे ।

---

१ शब्द. २. भूज उत्पन्न होणारें बीज.

जेथें कांहीं नसे दुजे । भजे त्या तो ॥८०॥
तेव्हां राम तोडी शीर । खालीं पडे कलेवर[1] ।
झाला जयजयकार । सुरलोकीं ॥८१॥
कार्तवीर्य दत्तभक्त । ब्रह्मनिष्ठ जीवन्मुक्त ।
झाला राम हा निमित्त । त्याच्या वधा ॥८२॥
मूर्धा[2] अर्जुनाचा फुटला । लिंगदेह भिन्न झाला ।
स्वकारणीं गेल्या कला । समरसे ॥८३॥
स्वयें होय स्वयंज्योती । पाहोनी ही त्याची गती ।
देवां करोनी प्रणती । स्तुती केली ॥८४॥
पुष्पवृष्टी रामावर । करिती ते सुरवर ।
झाला वाद्यांचा गजर । सुरलोकीं ॥८५॥
भूपा लाधलें परंधाम[3] । परंतू घेतां तन्नाम[4] ।
अद्यापी हो नष्टागम । क्षेम लोकां ॥८६॥
वीर समागमें होते । परशूनें त्या सर्वांतें ।
रामें मारूनी धेनूतें । मुक्त केली ॥८७॥
राम घेवूनी धेनूतें । आला शीघ्र स्वाश्रमातें ।
वंदूनी जमदग्नीतें । सांगे सर्व ॥८८॥
मुनी म्हणे हाय हाय । पुत्रा केलें त्वां हें काय ।
शीरीं घेतला अपाय[5] । जा येथूनी ॥८९॥
अरे आम्हां राजाश्रय । तपःसिद्धी देयी श्रेय ।

---

१ देह. २ मस्तक. ३ ब्रह्मस्वरूप. ४ श्लोक—कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहु सहस्रवान । तस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते । ५ राजहत्या.

जरी नेता एक गाय । काय हानी ॥९०॥
जो संरक्षी सप्तद्वीपा । निवारी जो पापा तापा ।
पुण्यश्लोका ऐशा भूपा । कां मारीलें ॥९१॥
श्रीदत्ताचा शिष्य योगी । ऐसा न हो दुजा जगीं ।
स्वल्पदोषें वीतरागी[1] । तो मारिला ॥९२॥
ऋद्धी सिद्धी ज्याच्या दासी । दे अमित गोदानासी ।
या धेनूची चाड त्यासी । काय बोल ॥९३॥
लीलेनें ही धेनू नेली । त्याची ग्रीवा[2] त्वा तोडिली ।
राम ह्मणे गती झाली । प्रारब्धें ही ॥९४॥
तें ऐकूनी बोले मुनी । दहा श्रोत्रिय[3] मारूनी ।
पाप जें तें ये लागुनी । भूपवधें ॥९५॥
अभिषेक शिरावरी । झाला त्याला ठार मारी ।
तो भूप्रदक्षिणा करी । तरी शुद्ध ॥९६॥
आतां जाईं तूं येथून । करीं सर्वतीर्थीं स्नान ।
तेव्हां हें पाप जावून । शुद्ध होशी ॥९७॥
रामें ती आज्ञा मानून । केलें सर्वतीर्थीं स्नान ।
पुनः भेटला येवून । जनकातें[4] ॥९८॥
शतपुत्र अर्जुनाचे । और्ध्वदेहिक ताताचें ।
आचरोनी मार्गे वाचें । बोलती हें ॥९९॥
विप्र असोनी दे बळी । भूपाचा त्या तिळांजळी ।
करूं आमुची ते वेळीं । ऋण मुक्ती ॥१००॥

---

१ वैराग्यशाली. २ मान. ३ अग्निहोत्री ब्राह्मण. ४ जमदग्नीप्रत.

इति श्रीदत्तलीलामृताब्धौ अर्जुनमुक्ति
श्चतुर्थलहरी संपूर्णा । ओव्या ॥४००॥

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।

मॆहावनीं समिधांसी । ध्याया राम गेला त्यासी ।
न जाणोनी आश्रमासी । शत्रू आले ॥ १ ॥
सवें सैन्य तें घेवोनी । त्याच्या आश्रमा वेढूनी ।
रामा शोधिती घुसोनी । गृहामध्यें ॥ २ ॥
होमस्थानीं ते पाहती । जमदग्नी तपोमूर्ती
त्याला जावूनी धरती । मतिहीन ॥ ३ ॥
दीन वाचे वदे मुनी । काय लाभ ह्या मारूनी ।
आशीर्वादा स्वीकारूनी । मार्गे चला ॥ ४ ॥
मला सोडा म्हणे वीरां । बोले रेणूका पदरा ।
पसरितें मुनीश्वरा । तारा बापा ॥ ५ ॥
बापा माझ्या प्राणधारा । सोडा जोडा यशा शूरां ।
हें योग्य हो दीनोद्धारां । वारा तापा ॥ ६ ॥
आम्हीं आश्रित जाणोन । दाते तुम्ही व्हा प्रसन्न ।
मला द्या सौभाग्यदान । मानपूर्व ॥ ७ ॥
मान पूर्वी तोडा माजी । अथवा तुम्ही व्हा राजी ।
ऐसें बोलें तीस पाजी । राजी ते न ॥ ८ ॥
ते न भीतां पापा वीर । तोडूनी मुनिचें शिर ।
पुरा चालिले सत्वर । क्रूर सारे ॥ ९ ॥

१ ओंकाराचा अंतिमवर्ण [ व्युत्क्रमानें पुनः ॐकार जाणावा. ]

करी रेणुका विलाप। म्हणे माझें कैचें पाप।
उदेलें हें जें दे ताप। माप न ज्या ॥१०॥
हाय हाय करूं काय। म्हणे नीती झाडी पाय।
शिरा उरावरी घाय। माय दे ती ॥११॥
देती सुत आश्वासन। परी तीचें खिन्न मन।
म्हणे देवा धांवा दीन। झालें मी हो ॥१२॥
रामा तूं अंतरलासी। संधी लाधला शत्रूंसी।
येरे प्राण देतें ऐसी। विलापी ती ॥१३॥
तेव्हां राम वनांतून। आला समिधा घेवून।
सर्व अनर्थ ऐकून। दीन झाला ॥१४॥
राम म्हणे मन्निमित्त। झाला तुझा ताता घात।
ऐसा तुझा मी अहित। सुत नोहे ॥१५॥
आठवूनी त्याचे गुण। शोक करी तो दारुण।
म्हणे आतां मला कोण। जाणता हो ॥१६॥
धडधडां अश्रू वाहे। घडबडां लोळे स्नेहें।
पितृशोकातें न साहे। मोहे राम ॥१७॥
मग डोळे पुसोनि तो। म्हणे शत्रूपुरा जातों।
[1]कार्तवीर्यजां मारितों। घेतों सूड ॥१८॥
हातीं परशू घेवोनी। जातां त्या भ्राते जननी।
निवारीती तें न मनीं। कानीं घे तो ॥१९॥
[2]माहिष्मतीसी जावूनी। सर्व शत्रूंला मारुनी।

---

१ कार्तवीर्यार्जुनाचे मुलगे. २ महेश्वर.

क्षणें मागें तो फिरोनी । सदनीं[1] ये ॥२०॥
म्हणे अर्जुनाचे पोर । मारिले जे नृपवर ।
करीं त्यांचाही संहार । त्रिसप्तधां[2] ॥२१॥
त्यांच्या रक्ताचा प्रवाह । त्याचे करीं पांच डोह ।
तर्पी तेथें पित्रासह । मुक्त व्हाया ॥२२॥
माता म्हणे पूर्वीं कर । रामा आमुचा संस्कार ।
मग करीं तूं संहार । क्षत्रियांचा ॥२३॥
दत्तशिष्य अर्जुन रे । तो मारिला हें न बरें ॥
दत्त कोपे जरी बारे । तूं मरसी ॥२४॥
यासी उपाय सांगेन । आम्हां दोघां तूं घेवोन ।
जायी आतां रे येथोन । दक्षिणेसी ॥२५॥
जेथें होय व्योमध्वनी[3] । तेथें श्रीदत्ता भेटुनी ।
होसी धन्य रामा मनीं । निर्धारीं हें ॥२६॥
मग राम कावडींत । एकीकडे मृत तात ।
मातेलाही बैसवीत । एकीकडे ॥२७॥
राम कावडी घेऊन । कान्यकुब्ज देशांतून ।
चाले दत्तातें चिंतून । दक्षिणेसी ॥२८॥
देखे गिरी नदी वन । माहोरासि ये चालून ।
तेथें आकाशवचन । कानीं पडे ॥२९॥
दत्ता आचार्य करून । त्वन्माता सहगमन ।

---

१ घरीं. २ एकवीस वेळ = सूचनार्थ ओवीचा अंकही २१ जाणावा.
३ आकाशवाणी.

करो करीं जलदान । विधीनें तूं ॥३०॥
ऐशा आकाशवाणीला । परिसोनी कावडीला ।
ठेवोनी तो आश्रमाला । गेला पाहुं ॥३१॥
समीपची दत्ताश्रम । दिसे जेथें नसे श्रम ।
नष्ट होती सर्व भ्रम । क्रम नको ॥३२॥
अहिंसेचा पूर्ण वास । केवीं राहे वैर त्रास ।
सर्वर्तूंचा जेथें वास । सर्वकाळ ॥३३॥
राम आश्रमीं जावून । देखे श्रीदत्तचरण ।
दत्तें मायेचें मंडन । पसरिलें ॥३४॥
जीच्या नखाग्रावरून । अप्सरांला ओवाळून ।
टाकीजे मुखावरून । चंद्रालाही ॥३५॥
कोटी कंदर्प[1] गाळून । वाटे ओतिलें लावण्य ।
तेजीं सूर्या कुर्वंडून । टाकावें कीं ॥३६॥
दंतहीरे चमकती । ओंठ बिंबाळां[2] लाजवीती ।
शुक नासिके भूलती । नेत्रां पद्में ॥३७॥
जीची कटि ती देखोन । सिंह मनीं होई खिन्न
गज देखोनी गमन । भांबवले ॥३८॥
कंठ शंखातें भूलवी । नाभी आवर्ता[3] बरवी ।
रोमरोमीं भासे रवी । छबी ऐसी ॥३९॥
ऐसी ललना येवून । कंठीं मिठी ती घालून ।
प्रेमें चुंबन देवून । अंकीं बैसे ॥४०॥

---

१ काम. २ पिकलेलें तोंडलें. ३ भोंवऱ्यापरीं.

परस्परें हावभाव । दाविताती अभिनव ।
जेथें नसे भिन्नभाव । ठाउकाची ॥४१॥
ऐसा मायेचा हा थाट । काय वर्णावा अचाट ।
याचा मानती जे वीट । धीट तेची ॥४२॥
ऐसी होतां त्यांची क्रीडा । राम आला त्याची व्रीडा[1] ।
न धरीतां हो नागडा[2] । तींशीं दत्त ॥४३॥
राम साष्टांगें नमून । बोले जी सहगमन ।
माता करीते आपण । आचार्य व्हा ॥४४॥
दत्त म्हणे नेणे विधी । न सेवी हे मी उपाधी ।
अस्पृश्य अभाष्य[3] आधीं । पाहें तूं हें ॥४५॥
राम झाला निरुत्तर । रेणुका ते दे उत्तर ।
यथार्थ हें वाक्यसार । फार गोड ॥४६॥
तीन गुणा वास जेथें । विधीनिषेध ये तेथें ।
जन्म मृत्यु दुःख तेथें । थारा करी ॥४७॥
तुम्ही तरी गुणातीत । नित्य उपाधीवर्जित ।
तीनी देहां साक्षीभूत । दोन्हीकडे[4] ॥४८॥
शब्दस्पर्शादि विषय । होती इंद्रियाला ग्राह्य ।
तुम्ही तरीं अविषय । स्पर्शहीन ॥४९॥
जरी आपुल्या प्राप्तीला । शाब्द[5] प्रमाण बोलिलां ।

---

१ लज्जा. २ दिगंबर = निरावरण. ३ बोलण्यास अयोग्य. ४ पिंडीं व ब्रह्मांडीं. ५ आप्तवाक्य [ वेदांत ].

तरी परोक्षत्वें [1] भलां । होवू तेंही ॥५०॥
श्रवणाचें जें मनन । त्याचेंही निदिध्यासन ।
वृत्तिव्याप्तीनें दे भान । अपरोक्ष ॥५१॥
तेव्हां अस्पृश्य अभाष्य । वाक्याचें हें ऐसें भाष्य ।
आधिशब्दें मी अमृष्य । लक्षी ऐसें ॥५२॥
अभिव्याप्ती आ अव्ययें । अधिशब्दें ईशता ये ।
सर्वांतर्यामीला नये । नियम्यता ॥५३॥
पाहें तूं हें या वचनें । तत्वंपदार्थैक्य होणें ।
नरा योग्य हें बोलणें । जाणें मी हो ॥५४॥
तेव्हां हंसोनी श्रीदत्त । रेणुकेच्या पुढें येत ।
स्तवी माते तूं साक्षांत । आदिशक्ती ॥५५॥
तुझा पसारा हें जग । कैसी होसी भिन्न मग ।
असो हें तूं कार्य सांग । काय तूझें ॥५६॥
ती बोले मी सती जातें । पतीसवें दत्त तीतें ।
वदे कोणी त्वत्पतीतें । मारियलें ॥५७॥
राम वदे क्षत्रियांनीं । मारिला हें परिसोनी ।
दत्त बोलिला कोपोनी । गर्जोनियां ॥५८॥
ब्रह्मघ्नहो हे क्षत्रिय । यांचा होवो कुळक्षय ।
राम वदे दत्तपाय । धरोनीयां ॥५९॥
क्षत्रियांचें निर्दळण । करीं ऐसा केला पण ।
सिद्धी देती हे चरण । आण वाहें ॥६०॥

---

1 अपरोक्षानुभव तर मननिदिध्यासनावांचून होणारच नाहीं हा भावार्थ.

तुमचा जो शिष्य योगी । अपराध करी उगी ।
त्या म्यां मारिला हा अंगीं । नसो दोष ॥६१॥
दत्त वदे मदंशें तूं । त्याच्या प्रारब्धाचा हेतू ।
झालासी जा जय घे तूं । मारीं भूपा ॥६२॥
रामा होशील समर्थ । बाण सोडी सर्व तीर्थ ।
तुझ्या मातेच्या स्नानार्थ । आणीं वेगीं ॥६३॥
तेव्हां राम सोडी बाण । त्यांहीं भूमी विदारून ।
सर्व तीर्थें तीं आणून । दिल्हीं रामा ॥६४॥
माता तेथें करी स्नान । मातृतीर्थ त्यापासून ।
झालें प्रसिद्ध दोषघ्न । अद्यापी जें ॥६५॥
वस्त्रालंकार भूषित । माता होवूनी बोलत ।
रामा हो तूं दत्ताश्रित । नीत धरीं ॥६६॥
करीं तुझें सत्य बोल । गोब्राह्मणां प्रतिपाळ ।
जातें पतीशीं ये मूळें । माहेराचें ॥६७॥
ऐसें बोले हास्यमुख । राम मनीं करी दुःख ।
दत्त म्हणे चित्तीं राख । रामा बोधा ॥६८॥
तेथें स्त्रियांसह देव । येती ऋषी तीचा भाव ।
पाहतांची चित्तीं वाव । नसे हर्षा ॥६९॥
भावें सूर्याला वंदून । तीणें वाणेही वांटून ।
केल्या प्रदक्षिणा तीन । त्या अग्नीला ॥७०॥
आज्ञा श्रीदत्ताची घे ती । स्त्रिया रतिभोगा जाती ।

---

१ बोलविणें.

तैशी पतीशीं ती सती । आगरिघे[1] ॥७१॥
अश्वमेध पदोपदीं । जीला झाले जातां आधी ।
औटे[2] कोट रोमें साधी । स्वर्गीं वास ॥७२॥
एका एका रोमें तीस । कोटी कोटी वर्षं वास ।
ऋषी मंडळीं हो खास । पतीसह ॥७३॥
सतीस्पर्शें अग्नी शोभे । सहस्रार्कसम उभे ।
देव पाहती त्या शोभे । स्त्रियांसह ॥७४॥
रेणुका हे धन्य सती । धैर्य इच्छा चित्तीं किती ।
स्त्रियां ऐशी होवो मती । म्हणती ते ॥७५॥
देवीं जयजयकार । केला आला गहिंवर ।
रामा त्याला दत्त धीर । दे बोधानें ॥७६॥
सर्व स्वस्थानासी जाती । दत्त क्रिया करविती ।
स्वयें आचार्यही होती । काय बोलूं ॥७७॥
क्रिया होतां वदे दत्त । रामा तुझे माता तात ।
कोठें गेले हें जाणत । अससी कीं ॥७८॥
राम म्हणे मेले गेले । स्वर्गीं दत्त त्याला बोले ।
नाहीं मेले नाहीं गेले । पहा हे तूं ॥७९॥
राम पाहे तों दीसती । दत्त बोले जाणें चित्तीं ।
लीलाविहारी हे होती । गौरीहर ॥८०॥
सर्वेंची ते झाले गुप्त । रामा सांगतसे दत्त ।
करी क्षत्रियांचा घात । माझ्या बळें ॥८१॥

---

१ अग्निप्रवेश करी. २ साडेतीन कोटी केशानें.

रामें एकवीस वेळ । निःक्षत्रिय भूमंडळ ।
केले रक्तें पांच तळें । भरियेलीं ॥८२॥
त्या रक्तें पितृतर्पण । करोनी दत्ता शरण ।
येवोनी धरी चरण । तारा म्हणे ॥८३॥
किती सांगो असंख्यात । झाला क्षत्रियांचा घात ।
यापासोनी मला पून । आतां करा ॥८४॥
दत्त म्हणे न हो ताप । न घे अहंकारलेप ।
बापा तुला नाहीं पाप । तरी ऐक ॥८५॥
करी यज्ञ विप्रां धन । देयी कश्यपा भूदान ।
तेणें चित्त पूत जाण । होय तूझें ॥८६॥
रामें आरंभिला यज्ञ । दत्त आचार्य सर्वज्ञ ।
ऋषी येती तेथें प्राज्ञ । देव आले ॥८७॥
तेथें सर्व देव धाले । विप्रां सर्व धन दिल्हें ।
रामें कश्यपाला दिलें । भूमीदान ॥८८॥
दत्त बोले त्वां जें केलें । त्याणें माझें मन धालें ।
तुझ्या ठाई जें ठेविलें । भलें तेज ॥८९॥
रामावतारीं ते घेयीं । प[1]श्चिमाब्धितीरीं जायीं ।
पुढें मन्वंतरीं होयीं । ब्रह्मर्षी तूं ॥९०॥
रामें दिधलें तें धन । दत्त विप्रां दे वांटून ।
ऐसें चरित्र दावून । लपे तेथें ॥९१॥
पुढें दाशरथीराम । आकर्षूनी घे तें धा[2]म ।

---

१ पश्चिमसमुद्रतीरीं. २ तेज.

तेव्हां ब्राम्हतेजें राम । युक्त झाला ॥९२॥
गेला सह्याद्रि शिखरीं । बाराकोस अब्धी दूरी ।
करी वसे त्याचे तीरीं । अद्यापीही ॥९३॥
राम ब्रह्मर्षी होणार । पुढें सायुज्य घेणार ।
ऐसा श्रीदत्ताचा वर । तारक हो ॥९४॥
सर्वतीर्थ मातृतीर्थ । असे जेथें पद्मतीर्थ ।
श्रीदत्ताचा वास तेथ । पाप नुरे ॥९५॥
पितृमुक्तीसाठीं धुंडी । चांग्रीक तो पिंड सोडी ।
सर्वतीर्थीं त्या रोकडी । मुक्ती झाली ॥९६॥
कन्या दोषें कुष्ठी झाला । सूर्य पद्मतीर्थीं न्हाला ।
शुद्ध होवूनी लोकांला । शुद्ध करी ॥९७॥
ब्रह्मा विसरला वेद । त्याचा झाला त्याला खेद ।
येवोनी तो दत्तपाद । धरी भावें ॥९८॥
दत्ताज्ञेनें मातृतीर्थीं । स्नान करितां ये स्मृती ।
आठविल्या सर्व श्रुती । ब्रह्मदेवा ॥९९॥
ऐसीं तीर्थें ही ज्या स्थानीं । तेथें वसे दत्तमुनी ।
कृष्णधात्रीतळीं[1] ध्यानीं । सदां मग्न ॥१००॥

इति श्रीदत्तलीलामृताब्धौ रामोत्कर्षो
पंचमलहरी संपूर्णा । ओव्या ॥५००॥

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।
उ[1]पदेश गुरु देव । भजतां ये यावज्जीव ।

---

१ काळ्या आंवळीखालीं. १ ओंकाराचा दुसरा वर्ण.

ज्ञान कृतघ्नता भात्र । पूर्वापार ॥ १ ॥
नृसिंहाचा पूर्ण भक्त । प्रऱ्हाद न होतां मुक्त ।
सह्याद्रीं ये तो हिंडत । दत्ता पाहे ॥ २ ॥
भोग नसोनी जो पुष्ट । पुसे त्याला कसा लठ्ठ ।
दिससी तूं ही मी गोष्ट । ऐकूं इच्छीं ॥ ३ ॥
ऐसें प्रऱ्हादाचें वाक्य । ऐकोनीही करी हाँस्य ।
दत्त वदे रे रहस्य । हें तूं ऐक ॥ ४ ॥
नानायोनीं कर्मयोगें । फिरतां हे हाता लागे ।
नरतनू ही ज्यायोगें । जें घे तें दे ॥ ५ ॥
सुखासाठीं तळमळ । करितां ये पळापळ ।
तरीं सुखा जोड मेळ । न ये दुःख ॥ ६ ॥
सुखरूपीं मायेआड । त्याची अर्थी धरी चाड ।
जळा शवूळाचे आड । सोडी जेंवी ॥ ७ ॥
मृगजळीं तें न मिळे । तैसें अर्थीं[1] सुख कळे ।
मग सोडूनी दे बळें । विषयांला ॥ ८ ॥
जना प्राणधन भयें । रात्रीं सुखें निद्रा नये ।
त्यांची वांच्छा सोडितां ये । सुखें झोंप ॥ ९ ॥
मोठ्या कष्टें मधु पाळी । तीच्या प्राणावरी पाळी ।
आली मला गुरू झाली । तीच माशी ॥ १० ॥
दैवें मिळे त्याचा तोष । ध्यावा ठावा न हो रोष[2] ।
आर[3] गुरू हा विशेष । बोध देयी ॥ ११ ॥

---

१ विषयांचे ठाईं. २ असंतोष. ३ अजगर.

या दोहोंच्या अनुग्रहें । ऐसा झालों मी हा पाहें ।
विधिनिषेधा न वाहें । स्वेच्छाचारी ॥१२॥
विकल्पा तूं मनीं जाळीं । मायेमध्यें मना पोळीं ।
त्या मायेची करीं होळी । स्वात्मरूपीं ॥१३॥
ऐसें होतां ये विरांम[1] । स्वयें होसी आत्माराम ।
कृतकृत्य पूर्णकाम । भ्रम न हो ॥१४॥
ऐसें दत्तें निरोपीले । तें त्याच्या चित्तीं भरले ।
अलर्कांही हें लाधलें । ज्ञान ऐका ॥१५॥
गालवर्षी करी याग[2] । दैत्य त्याला दे उद्वेग[3] ।
कधींही न घडे सांग । याग त्याचा ॥१६॥
देवां प्रार्थी दीन मुनी । अग्रीं[4] अश्व ये त्या क्षणीं ।
स्वर्गाहुनी व्योमवाणी[5] । बोले तया ॥१७॥
दे हा अश्व ऋतध्वजा । शत्रूला तो मारो तूं जा ।
हें ऐकतां हर्ष द्विजा । भला झाला ॥१८॥
मुनी अश्व नेवोनी दे । ऋतध्वजा सर्व वदे ।
अश्व घेवोनी भूप दे । आश्वासन ॥१९॥
भूप मुनीसह आला । मुनी आरंभी यज्ञाला ।
तेव्हां पातालकेतूला । धूर्म[6] दिसे ॥२०॥
तो सूंकर[7]रूपें आला । ऋतध्वजें ओळखिला ।
त्यावरी शर मारीला । मेला न तो ॥२१॥

---

१ विसावा. २ यज्ञ. ३ त्रास. ४ अग्रभागीं. ५ आकाशवाणी.
६ यज्ञाची निशाणी धूर. ७ डुकर.

पाताळीं तो घुसे मागे । अश्वारूढ राजा लागे ।
विवरीं तो गेला वेगें । देखे घर ॥२२॥
सखीसह स्त्रीला पाहे । तीही पडे राजमोहें ।
आश्वासूनी नृप बाहे । कोण तूं गे ॥२३॥
सखी बोले वीरमान्या । विश्वावसूची हे कन्या ।
दैत्यें आणीली हे धन्या । तुम्हां भेटे ॥२४॥
दैत्य भोगूं इच्छीं ईतें । उद्यां योजीलें लग्नातें ।
कामधेनू बोले ईतें । जीव देतां ॥२५॥
उद्यां वेधी दैत्या वीर । त्याशीं करीं स्वयंवर ।
आज तसें झालें धीर । धरतां हें ॥२६॥
कुंडला मी सखी मज । कोण तुम्ही सांग आज ।
तो बोले मी ऋतध्वज । सोमवंश्य ॥२७॥
मला इच्छी जरी नारी । असाक्षीक मी न वरीं ।
सखी बोले विधी करीं । यथायोग्य ॥२८॥
ध्यानें गुरुतें ती आणीं । विधीनें धरवी पाणी ।
सखी गुरू त्यां पुसोनी । जाते झाले ॥२९॥
मदालसा जीचें नाम । तिला घे तो नृपोत्तम ।
अश्वारूढ होतां भीम[1] । दैत्य आला ॥३०॥
एका बाणें मारी त्याला । येवोनी तें गालवाला ।
सांगे मुनी हृष्ट झाला । म्हणे जा तूं ॥३१॥
राव भार्येसह पित्या । भेटोनी तो सांगे कृत्या ।

१ भयंकर.

कुवलयाश्व नाम त्या । देयी तात ॥३२॥
मारिला जो दैत्य त्याचा । बंधू वनीं मुनी साचा ।
होवोनी तो भूपतीचा । मार्ग लक्षी ॥३३॥
अश्वारूढ येके दिनीं । राजा एकला ये वनीं ।
तो त्या आश्रमा येवोनी । मुनी पाहे ॥३४॥
मुनी बोले ऐकें आज्ञा । संपवी ह्या माझ्या यज्ञा ।
कंठी देतां मला प्राज्ञा । सर्व साधे ॥३५॥
भूप हर्षे कंठी देयी । म्हणे भूपा राहें जायीं ।
वरुणाची भेटी घेयीं । येयीं शीघ्र ॥३६॥
राजा तेथेंचि राहिला । कपटी तो पुरा आला ।
सांगे तो मदालसेला । मेला राजा ॥३७॥
दैत्यें द्वेपानें मारिला । मरतां ही कंठी मला ।
दिल्ही ही घे जातों तुला । कळवूनी ॥३८॥
येवोनी तो भूपा बोले । माझें कार्य सांग झालें ।
आतां निजपुरा चाले । स्वेच्छेनें तूं ॥३९॥
राजा नगरा चालिला । पुरीं[1] आकांत वर्तला ।
ऋतध्वज वनीं मेला । म्हणोनीयां ॥४०॥
मदालसा धड फोडी । उंचस्वरें हंबरडी ।
म्हणे कंठीसह उडी । खायींत घे ॥४१॥
पतिसवें रामराज्य । पुत्राचें तें धर्मराज्य ।
अन्यासवें यमराज्य । प्राज्यकष्टें[2] ॥४२॥

---

१ नगरांत. २ अतिशय.

नको नको रांडपण । पदोपदीं जें दे शीण ।
विरह दुःख दारूण । कोण भोगी ॥४३॥
ऐसा निर्धार करूनी । चित्तिं पति आठवुनी ।
अग्निप्रवेश करूनी । दग्ध झाली ॥४४॥
ऐसें पाहोनी सासरा । म्हणे सोडूं या संसारा ।
सून लेंक मेले खरा । दुर्भाग्य मी ॥४५॥
मीही पापी त्याच पंथा । घरीं वांचावें कां वृथा ।
ऐसें बोलोनी तो माथा । फोडीतसे ॥४६॥
तंव आला ऋतध्वज । म्हणे ताता पाहे मज ।
राव देखोनी आत्मज । भ्रांत झाला ॥४७॥
म्हणे मरोनी हा आला । किंवा देवें पाठविला ।
सर्व कळवितां त्याला । झाला खिन्न ॥४८॥
पुत्र म्हणे दैत्यें मला । ठकविलें पूर्वीं मला ।
न कळलें आतां झाला । अनर्थ हा ॥४९॥
मेली गंधर्वाची कन्या । पतिव्रता लोकमान्या ।
धन्या ती वांचूनी अन्या । न भोगीन ॥५०॥
ऐसा निश्चय करूनी । सर्व भोगांतें सोडूनी ।
न राहे तो नृप जनीं । वनीं क्रीडे ॥५१॥
अश्वतरनागपुत्र । विप्रवेषें आले तेत्र ।
त्यांचा होवोनी तो मित्र । नित्य खेळे ॥५२॥
भूपदुःखातें जाणुनी । घरीं येती खिन्नपणीं ।

१ राजाजवळ.

पिता पुसे कां वाळुनी । गेलें मुख ॥५३॥
नागा सांगती ते पुत्र । आमुचा हो दुःखी मित्र ।
मदालसा तत्कलत्र[1] । तें जळालें ॥५४॥
झालों मित्रदुःखें ग्रस्त । पिता म्हणे न व्हा त्रस्त ।
त्या दुःखाचें करूं अस्त । शिववरें ॥५५॥
मग नाग येते वेळीं । निराहार हिमाचळीं ।
भावें चिंती हृत्कमळीं । सरस्वती ॥५६॥
वंदूं सरस्वती मती । मन आठ स्थानें हातीं ।
धरोनी ह्या नाना युक्ती । करवीसी ॥५७॥
जळ समुद्रीं सोडिती । सूर्या दीप ओवाळिती ।
त्या न्यायें ही तव स्तुती । आम्ही करूं ॥५८॥
व्हावें माते त्वां प्रसन्न । सांग राग रंग गान ।
करवीं जेणें प्रसन्न । होय शंभू ॥५९॥
प्रगटुनी बोले वाणी[2] । गाववीन गोड गाणीं ।
तेणें शिव शिरीं पाणी[3] । देयील जा ॥६०॥
ऐसें बोलोनि हो गुप्त । अश्वतर शिवा गात ।
सांग राग मूर्तिमंत । प्रगटवी ॥६१॥
स्मरहरा श्रीशंकरा । दरहरा[4] भक्तोद्धारा ।
धरधरा गौरीवरा । हरा पावें ॥६२॥
ऐसें गातां शंभू भुले । येवोनी त्या प्रेमें बोले ।
या गाण्यानें मन धालें । वर घे रे ॥६३॥

---

१ त्याची स्त्री. २ सरस्वती. ३ वरदहस्त. ४ गर्व.

नाग बोले मदालसा । मेली स्मृती देह तसा ।
घेवोनी हो कन्या असा । मागें वर ॥६४॥
शिव म्हणे तीची चाड । धरीं श्राद्धीं मध्यपिंड ।
पत्नीला दे तुझे कोडं । पूर्ण होयी ॥६५॥
बुद्धी रूपा त्या आकारा । धरोनी ये तुझ्या घरा ।
देवोनी तो ऐशा वरा । गुप्त झाला . ॥६६॥
नाग घरीं तैसें करी । तेव्हां श्वासाबरोबरी ।
प्रगटली क्षणांतरीं । वाढली ती ॥६७॥
पूर्वस्मृतीनें हो खिन्न । नाग करी समाधान ।
म्हणे पुत्रानों जावून । आणा मित्रा ॥६८॥
पुत्र विप्रवेषें गेले । भूपा पाताळीं आणिलें ।
तेव्हां त्याला ते कळले । मित्र नाग ॥६९॥
नृपा वदे अश्वतर । तुझ्या भेटीनें नृवरा ।
धन्य झालों मागें वरा । जो अभीष्ट ॥७०॥
राजा लाजेनें न बोले । नागसुतें जाणविलें ।
पत्नीवांचून न भलें । अन्य मानीं ॥७१॥
नाग वदे जी जळाली । तुला तीची इच्छा झाली ।
तरी मायेची बाहुली । दावीं पाहें ॥७२॥
मदालसा दावी त्याला । भूप मूर्च्छित पडला ।
पुनः उठोनी धांवला । तीला धरूं ॥७३॥
नाग म्हणे दूरी पाहे । माया शिवतां न राहे ।

---

१ इच्छा.

भूप घडबडां मोहें। लोळे तेव्हां ॥७४॥
नाग सर्व सांगे त्याला। यथाविधी दे कन्येला।
परस्परां हर्ष झाला। तो न माये ॥७५॥
राजा म्हणे धन्य मित्र। माझें पूर्वत्रत्कलत्र।
देवविलें हा हो मंत्र। कोणी नेणे ॥७६॥
मदालसा जैसी तैसी। ब्रह्मनिष्ठा विशेषीं।
तीला घेवोनी राष्ट्रासी। ये तो भूप ॥७७॥
मग सर्वां हर्ष झाला। तातें राज्य दिल्हें त्याला।
स्वयें वनीं तो चालिला। झाला मुक्त ॥७८॥
ऋतध्वज राज्य करी। त्याला मदालसा नारी।
दे संभोग स्वयें जरी। ब्रह्मनिष्ठा ॥७९॥
दैवें तिला पुत्र झाला। उपजतां सांगे त्याला।
कां रडसी तूं कोणाला। आतां व्यर्थ ॥८०॥
जातां मार्गीं भूल घेशी। म्हणोनी ह्या चौऱ्याऐशीं।
योनी कष्टें धुंडलासी। निजकर्में ॥८१॥
कुठें तुझीं रांडापोरें। कोठें धन घरें गुरें।
मिळविले चोर सारे। लुटारू रे ॥८२॥
करितासी देवध्यान। तप्तलोह स्त्र्यालिंगन।
न होतें रे पोरा मन। सांवरी हें ॥८३॥
वैराग्यानें खातां भीक। तोंडी येना न नरक।
रूपा न भूलतां आंक[1]। न फूटते ॥८४॥

---

१ डोळे.

नानायोगी त्वां धुंडतां । तेथें मार्ग न ये हाता ।
मार्गावरी[1] तूरें आतां । पातलासी ॥८५॥
नको रडूं उगी राहे । बुडशील मिथ्या मोहें ।
तुझा मार्ग तूंची पाहें । विचारानें ॥८६॥
जन्ममरणा रडसी । तरी त्याच्या संबंधासी ।
कदापी तूं न शीवसी । निर्विकारा ॥८७॥
जो मातेच्या विटाळांत । भेटतां रे रेत रक्त ।
विष्ठा मूत्रीं झाला मूर्त । तो तूं कैसा ॥८८॥
हाडामासाच्या देहासी । मूर्खपणें भूललासी ।
त्याच्या योगें संबंधासी । घेसी व्यर्थ ॥८९॥
कोण माता कोण पिता । कोण तुझी कांता सुता ।
अविचारें ही ममता । कां धरिसी ॥९०॥
हाडामासावर कात । विष्ठा मूत्र ज्याचे आंत ।
त्याला मी मी ऐसी भ्रांत । येवूं न दे ॥९१॥
जडप्राण रजोगुणी । कर्मेंद्रियां[2] कवळूनी ।
खातो पीतो रे त्याहुनीं । तूं वेगळा ॥९२॥
ज्ञानेंद्रियाचे मेळणीं । मन पळे क्षणोक्षणीं ।
त्याचा साक्षी तूं त्याहुनी । निश्चळ रे ॥९३॥
ज्ञानेंद्रियां[3] आंत धरी । मी कर्ता हा गर्व करी ।
निजे उठे तीरे दूरी । बुद्धी तुला ॥९४॥

---

१ मनुष्यजन्माला. २ वाणी, हस्त, चरण, गुद, शिश्न हीं कर्मेंद्रियें.
३ श्रोत्र, त्वचा, डोळे, जिव्हा, नासिक.

प्रिय मोद प्रमोदानें । जो भासे त्या आनंदानें ।
न घे भोक्तृत्वाला ध्यानें । पाहें स्वात्मा ॥९५॥
ऐसें जरीं हें करिसी । तरीं बारे न फससी ।
नाहीं तरीं पुनः घेसी । ऐसी फेरी ॥९६॥
तीनी[1] देहांचा मी साक्षी । तीनी[2] अवस्था नीरीक्षीं ।
निरंतर ऐसा लक्षी । व्यापकत्वें ॥९७॥
ऐसा रोज वारंवार । माता करी बोध फार ।
द्वैतवार्ता करी दूर । कळवळें ॥९८॥
जैसा जैसा वाढे सुत । तैसा बोध ये ठसत ।
नाम ठेविलें विक्रांत । प्रेमें भूपें ॥९९॥
तेंव्हां हंसे मदालसा । पुत्रा झाला बोध खासा ।
लोकां दिसे जैसा पिसा । अंतर्निष्ठ ॥१००॥

इति श्रीदत्तलीलामृताब्धिसारे मदालसोत्कर्षाख्या
षष्ठलहरी समाप्ता । ओव्या ॥६००॥

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।
असी मदालसा नारी । प्रारब्धाचा भोग करी ।
पुनः झाले कालांतरीं । दोन सुत ॥ १ ॥
त्यां सुबाहु शत्रुजित । ऐसीं नामें तात देत ।
मदालसाही हंसत । तीं ऐकूनी ॥ २ ॥
त्यांला नित्य करी बोध । त्याहीं संसाराचा बाध ।
केला झाले ते विबुध । लोकीं जड ॥ ३ ॥

---

१ स्थूल, सूक्ष्म, कारण. २ जागृत्, स्वप्न, सुषुप्ति.

पाहोन ते तीन लेंक । राजा करी बहु दुःख ।
केले उपाय अनेक । सुधाराया ॥ ४ ॥
म्हणे पुत्र होती वेडे । ऐसें कर्म माझें कुडें ।
आतां पुढें वंश खंडे । रडे ऐसा ॥ ५ ॥
कुळीं ब्रह्मनिष्ठ लेंक । दैवयोगें होतां येक ।
सर्वां दे तो ब्रह्मलोक । हें तो नेणें ॥ ६ ॥
ओळखाया साधुपणा । स्वयें ध्यावा साधुबाणा ।
साधूच्या त्या गुप्त खुणा । भोंदू नेणें ॥ ७ ॥
उच्चीं पांच ग्रह येतां । प्रसवली पुनः सुता ।
म्हणे राजा नाम आतां । प्रिये तूं दे ॥ ८ ॥
माझ्या नामा तूं हंससी । तेव्हां साध्वी म्हणे त्यासी ।
तुम्ही ठेविल्या नामासी । बाधा पहा ॥ ९ ॥
क्रांति नाम गतीं राया । ती ह्या नसे म्हणोनियां ।
विक्रांत हें नाम वायां । झालें पहा ॥ १० ॥
मूळीं अमूर्त हा तेथ । सुबाहु हें नाम व्यर्थ ।
एकला तो शत्रुजित । होतो कसा ॥ ११ ॥
व्यवहारार्थ देह्याला[1] । देणें तरीं तूं दे ह्याला ।
नाम अलर्क हें मला । आतां रुचे ॥ १२ ॥
राजा ठेवी नाम तसें । एके दिनीं राजा पुसे ।
विक्रांता तूं वेड असें । कसें घेसी ॥ १३ ॥
पढें विद्या राज्य करीं । नारी वरीं स्वयंवरीं ।

---

[1] देहधाऱ्याला.

भोग भोगीं यज्ञ करीं । तरीं धन्य ॥१४॥
विक्रांत तो बोलूं लागे । माता परा विद्या सांगे ।
निवृत्ति स्त्री वरीं अंगें । स्वात्मराज्यीं ॥१५॥
करायाचें तें मी केलें । मिळायाचें तें मिळालें ।
झालों तिघे बंधू भले । चौथा होतो ॥१६॥
ऐसें वाक्यामृत त्याचें । भूपाळाला तें न रुचे ।
जेवी आचार साध्वीचे । कुलटेला ॥१७॥
कोपें बोले तो भार्येला । वंशनाश त्वां हा केला ।
उपदेश खोटा दिल्हा । त्यांला मूढे ॥१८॥
खरा प्रवृत्तिमार्ग हा । देव पितृनरां दे हा ।
उपभोग तसा पहा । दुजा नोहे ॥१९॥
राज्य गजाश्व स्त्री धन । भोग शक्तीं देव दान ।
दे ज्या भगवंता त्याणें । तें भोगावें ॥२०॥
अन्यथा तो देवद्रोही । ही सामग्री ज्याला नाहीं ।
त्या दुर्भाग्यासाठीं पाहीं । निवृत्ती ती ॥२१॥
जरी निवृत्ती घे नर । त्यासी आमुचेंच द्वार ।
मग कां हें घरदार । सोडावें गे ॥२२॥
पुत्राविणें परलोक । न साधे हा श्रुतिलेख ।
ऐकें आतां चौथा लेंक । भ्रष्ट न हो ॥२३॥
हंसोनी ती बोले ऐका । बोधें आत्मलोक जिंका ।
काय कीजे रंका लेका । हे ही श्रुति ॥२४॥
न रुचे हा तुम्हां पंथा । तरी अलर्काला आतां ।

देतें वेदशास्त्रसंथा । कंथा[1] न दें ॥२५॥
मग अलर्काला वेद । विद्या कला धनुर्वेद ।
सांगे शास्त्रा न्यायवाद । व्यवहार ॥२६॥
झाला अलर्क पंडित । स्वयंवरीं स्त्री वरित ।
तें पाहोनी पिता प्रीत । होता झाला ॥२७॥
राज्य देववुनी सुता । माता म्हणे शत्रू होतां ।
पेटी उघडीं ह्या हिता । तेव्हां पाहें ॥२८॥
ऐसें सांगोनी दे पेटी । राजा राणी वनीं जाती ।
तीणें बोधवूनी पती । उद्धरिला ॥२९॥
सायुज्यता घेती दोघे । करी पुत्र राज्यमाघें ।
सहासष्ठ हजारें घे । वर्षे भोग ॥३०॥
परिसंख्या मुख्य मानीं । रती मांस सुरापानीं ।
झाला सक्त तो जाणोनी । सुबाहु ये ॥३१॥
तिघां माता पाजी बोध । आम्हा दुग्धसा तद्वंध ।
ह्याला न लाधता छंद । ऐसें करी ॥३२॥
तरी आमूचा दायाद । आहे हाची याची याद ।
करूं पूर्वी देवूं खेद । भेद नुरे ॥३३॥
ऐसा विचार करूनी । पुरा आला वनांतूनी ।
जडमूढता सोडूनी । बोले प्रौढ ॥३४॥
म्हणे अलर्का मी पूज्य । मला दे तूं आतां राज्य ।
येरु बोले सर्व त्याज्य । कां केलें त्वां ॥३५॥

1 निवृत्तिमार्गचिन्ह.

आतां भीक देवूं काय। जरि होसी तूं क्षत्रिय।
युद्धीं घेयी निजदाय[1]। नायकें मी ॥३६॥
सुबाहू तें परिसोनी। काशीराजा कळवूनी।
त्याचें साहाय्य घेवूनी। युद्धा आला ॥३७॥
लोक भेदानें फोडिले। किती दानें वळविले।
किती सामें मेळविले। प्रधानादि ॥३८॥
योग सामर्थ्य अचाट। फोडविले किल्ले कोट।
घाली कोशांची तो लूट। फूट होतां ॥३९॥
जे जे आपुले मानिले। ते ते सर्व उलटले।
तें पाहुनी मन भ्यालें। अलर्कांचें ॥४०॥
तेव्हां त्याचें धैर्य गळे। एकला तो वनीं पळे।
मातृवाक्याला त्या वेळे। आठवी तो ॥४१॥
पाहे पेटी उघडून। त्यांत पत्रिका पाहून।
वाची चित्तीं घाबरून। अलर्क तो ॥४२॥
उलटती आपुलेची। तेव्हां संगती साधूची।
करिं तेणें स्वहिताची। लब्धी होई ॥४३॥
ऐसा लेख तो पाहुनी। मनीं निर्धार करूनी।
दत्तापाशीं तो येवोनी। बोले दीन ॥४४॥
जी सद्गुरो स्वामी मला। थोर दुःख झालें याला।
दूर करा न या वेळा। दुजा त्राता ॥४५॥
हंसोनी श्रीदत्त बोले। दुःख तुला कोठें झालें।

---

१ आपुला वांटा.

कोण तूं रे हें पहिलें । बोलें प्राज्ञा ॥४६॥
असें वचन ऐकोनी । झाला विवेकी तत्क्षणीं ।
पाहे विचार करूनी । कोण मी हें ॥४७॥
म्हणे स्थूळ देह जड । ज्याला भूतांची सांगड ।
नाना विकारांची धाड । पडे येथें ॥४८॥
आत्मा सर्वगतपूर्ण । हा तों दिसे परिछिन्न ।
हा मी चिदात्मा याहून । वेगळाची ॥४९॥
बळें इंद्रियां चाळवी । झोपेमाजी जाड्य दावी ।
तो मी प्राण होवूं केवीं । मी ज्ञानात्मा ॥५०॥
क्षणें मन जायी येयी । विभू मि हा राही ठायीं ।
त्याचा संशय न येयी । डोयीं माझ्या ॥५१॥
देहा व्यापी जागेपणीं । झोपेमध्यें जी लपोनी ।
जाते बुद्धी माझ्याहुनी । वेगळी ती ॥५२॥
जड जो हा अहंकार । त्रिगुणीं त्याहुनी पर ।
शुद्ध बुद्ध मी अमर । नर नोहे ॥५३॥
ऐसा माझा मी निर्धार । केला दुःखाचा विचार ।
करूं आतांची सादर । होवोनीयां ॥५४॥
नखापासोनी केशांत । ह्या देहाबाहेर आंत ।
शोधीतां न दुःखा यांत । दिसतसे ॥५५॥
प्राण भूक तान्हेवीणें । ऐसें दुःख कधीं नेणें ।
इंद्रियेंही भृत्यपणें । स्वार्था घेती ॥५६॥
राग द्वेषाचें तें मूळ । मन स्वभावें चंचळ ।

सुखदु:खाचा सांभाळ । हेंचि करी ॥५७॥
मन अन्नमय असे । विकारानें भ्रमतसे ।
परकी तें त्याचें कसें । दु:ख मज ॥५८॥
गुरूजी म्यां चांचपलें । माझ्या रूपा ओळखिलें ।
हे हो दु:ख मैना झालें । बोलें साच ॥५९॥
हाच विचार दुर्धर । धुंडिती ज्या मुनीश्वर ।
तुम्ही दिल्हा हा सत्वर । सार प्रश्नें ॥६०॥
खातां मार्जारें उंदिरा । दु:ख नोहे तेची कीरा ।
खातां हो हा दोष खरा । ममतेचा ॥६१॥
कोणी छी: थू: केल्या दु:ख । हो आपणा रोग विख ।
वैऱ्या होतां हे घे सुख । ते अहंता ॥६२॥
ह्या दोहोंला कवटाळी । म्हणोनी घे मन भाळीं ।
सुखादु:खा ह्यां ह्या वेळीं । जाळिले म्यां ॥६३॥
न घें अंगाच्या संबंधा । मग कैंचा राज्यधंदा ।
शत्रुमित्रत्वाचा भेदा । सांधा दिल्हा ॥६४॥
दत्त म्हणे धन्य तूं रे । क्षणें जाणियेलें सारें ।
आतां याचें स्थैर्यत्वांरे । बरें करीं ॥६५॥
करीं अर्धा सूक्ष्माहार । नीज रात्रीं दोनपार ।
मठीं एकांतीं विचार । कर हा रे ॥६६॥
तीनी भूमीच्या[2] पूढती । रोकें पांच[3] मनोवृत्ती ।

---

१ मना झाले किंवा बंद झाले. २ मूढ, क्षिप्त, विक्षिप्त ह्या पुढें ऐकाग्र्य, निरुद्ध. ३ प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, स्मृति.

सत्कारें अभ्यासरीतीं[1]। मती धरीं ॥६७॥
वशीकार[3] वैराग्यें हो। संप्रज्ञात[4] समाधि हो।
सिद्धींला तूं वश्य न हो। मोहोनी रे ॥६८॥
अपमान सुधा[5] मान। विषासमान रे मान।
काळें मान खातां मा[6] न। मान दे ती ॥६९॥
तिसरेपारीं माधुकरी। तीन पांच सात घरीं।
मार्गे खातां दूर करीं। बरी रुची ॥७०॥
हाचि तुला उपदेश। निर्विकल्प समाधीस।
येणें जासी तूझा खास। वास ब्रह्मीं ॥७१॥
सोन्यावरी मळ येतां। त्या अग्नीची आंच देतां।
जैसी येयी प्राग्रूपता। तैसें येथें ॥७२॥
जीव ब्रह्मची असोन। अविद्यांशें हो मलिन।
योगें विशुद्ध होवून। होतो प्राग्वत् ॥७३॥
पिंडीं ब्रह्मांडीं जें गूढ। तें मी मी तें हेची दृढ।
होई तावत्करीं वाढ। हा अभ्यास ॥७४॥
ऐसें सांगोनी धाडीला। पुरा त्या तो स्वबंधूला।
प्रेमें येवोनी बोलिला। घे तूं राज्य ॥७५॥
बंधू म्हणे तूं रे आर्य। गळलें कीं तुझें वीर्य।
तूं क्षत्रिय धरीं शौर्य। कार्य साधीं ॥७६॥
येरू बोले त्वां तारिलें। दत्तें स्वात्मराज्य दिल्हें।

---

१ ब्रह्मचर्य, श्रद्धा, विद्या, तप. २ यमादिकांचें अनुष्ठान. ३ दृष्टा, दृष्ट, विषय-वैतृष्ण्य. ४ सविकल्प. ५ अमृतासमान. ६ गजाश्वधनादिरूपा लक्ष्मी.

आतां कांहीं न मी बोले। धालें मन ॥७७॥
मग सुबाहू आलिंगी। म्हणे झालों समभागी।
मातेची ही कृपा जगीं। हो जी मान्य ॥७८॥
काशिराजा कार्य भलें। झालें मीही वनीं चालें।
काशीराजा त्याला बोले। झालें काय ॥७९॥
बंधू तुला न दे भाग। म्हणोनी त्वां केला संग।
आतां दोघेही निःसंग। कां होतां हो ॥८०॥
म्हणे सुबाहू हा स्वार्थ। सांडी त्या दाविला पंथा।
हेंची कार्य झालें आतां। स्वस्थता ये ॥८१॥
काशीराजा म्हणे धन्य। बंधू उद्धरिला मान्य।
झालों मी कीं बोल अन्य। संन्यस्त तूं ॥८२॥
स्वपर न साधूजना। दयेनें तारिती दीनां।
सम विषम न त्यांना। जनामाजीं ॥८३॥
आजी मजवरी कृपा। करीं बंधूपरी बापा।
येरू म्हणे अनुतापा। न पावसी ॥८४॥
जरीं अलर्क विषयीं। अनुतापें दत्तपायीं।
पडे राज्या लात देयी। घेयी मुक्ती ॥८५॥
भक्ति वैराग्यावांचोनी। प्रबोध[1] न भरे कानी।
हें तूं समजुनी मनीं। वनीं जायीं ॥८६॥
सांडीं राज्य पत्ती[2] हत्ती। घेयीं साधन संपत्ती।
एकांतीं तूं निजचित्तीं। वृत्ती लक्षीं ॥८७॥

१ ज्ञान. २ पायदळ.

लक्षीं उठे जी जी वृत्ती। साक्षीपणें मुरवी ती।
तो मी साक्षी ऐसी मती। अंतीं ठरे ॥८८॥
ठरे निरुपाधी बुद्धी। दृश्यानुविद्ध समाधि।
निर्विकल्प तो समाधी। दृढत्वें हो ॥८९॥
आंत तसेच बाहेर। समाधी निरहंकार।
येणें आत्मसाक्षात्कार। शीघ्र लाभे ॥९०॥
ऐसें होतां मन जेथ। जायी समाधी ही तेथ।
संदेह न धरीं येथ। सत्य मानीं ॥९१॥
ऐसें सुबाहू सांगोनी। पुसोनी त्यां चाले वनीं।
काशीराजा तें ऐकोनी। पुरा आला ॥९२॥
पुत्रा राज्य दे ये वनीं। तसा अभ्यास करोनी।
तोही पावला निर्वाणीं। साधुसंगें ॥९३॥
पुत्रा राज्यीं बैसवूनी। अलर्कही आला वनीं।
योगाभ्यासा आचरोनी। स्थिरावला ॥९४॥
तत्त्वज्ञानें मन स्थैर्य। वासनेला तो निर्वीर्य।
करी राहे योगिवर्य। तुर्यपदीं[1] ॥९५॥
तेव्हां स्मरे पूर्ववृत्ता। प्रौढ जैसा बाल्यावस्था।
म्हणे कैसी ये मूर्खता। चित्ता तेव्हां ॥९६॥
विचार हा होतां नीट। आतां वाटे तीचा वीट।
माया घालोनी हें कूट। लुटतसे ॥९७॥
पृथ्वींतील धनधान्य। नारी वस्त्र गो भूषण।

---

१ चतुर्थ.

एकालाही न हो पूर्ण । तृष्णायोगें ॥९८॥
तृष्णा मरतां ये तोषे[1] । जेथें तेथें होतो हर्ष ।
लपे गड्यांसह रोषे[2] । हें म्यां देखें ॥९९॥
ऐसें बोलोनी शरीर । योगाग्नीनें जाळी वीर ।
दत्तरूपीं मिळे धीर । समरसें ॥१००॥

इति श्रीदत्तलीमृताब्धिसारे अलर्कगत्याख्या
सप्तमलहरी समाप्ता । ओव्या ॥७००॥

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।
असे जेथें प्रेमभक्ती । वसे तेथें भुक्तिमुक्ती ।
ऋद्धिसिद्धी दासी होती । खंती न हो ॥ १ ॥
भजो कसाही[3] हरीतें । त्याचें कर्म होतें रितें ।
देव कष्ट येतां त्यातें । घे तें अंगीं ॥ २ ॥
सोमवंशी आयूराजा । पुत्रापरी पाळी प्रजा ।
दैवयोगें त्याला प्रजा । न जाहाली ॥ ३ ॥
त्याची पत्नी इंदुमती । श्रीदत्ताची करी भक्ती ।
प्रेमभावें सदां चित्तीं । चिंती देवा ॥ ४ ॥
आयूराजा सह्यतटीं[4] । श्रीदत्ताची घेयी भेटी ।
दत्त येवूं न दे मठीं । काठी मारी ॥ ५ ॥
देयी मोये[5] आलिंगन । वारंवार घे चुंबन ।
परस्पर देती पान । नग्न दोघे ॥ ६ ॥

१ संतोष. २ क्रोध. ३ नवविध भक्तींपैकीं कोणत्याही भक्तीनें.
४ सह्याद्रि पर्वतावर. ५ मायेची स्त्री.

पाद धरूं इच्छी राजा । वारी दत्त म्हणे जा जा ।
अपूज्य आश्रम माझा । तूं जा शीघ्र ॥ ७ ॥
असें बोलोनी दे मार । राजा किंचित् होयी दूर ।
पुनः येयी घेयी मार । दररोज ॥ ८ ॥
असा जातां बहुकाळ । दत्त वदे रे कपाळ ।
उठवीलें तूं रे खळ[1] । पळ आतां ॥ ९ ॥
आतां येनां ठार मारीं । भीड कोणाची न धरीं ।
धर्मशास्त्रा न विचारीं । चारी वेदां ॥१०॥
मदांधसा मी अकृपे[2] । माझा अनिवार कोप ।
मी न गणें परताप । पाप तें ही ॥११॥
मी अस्पृश्य हें नेगसी । माझा पाद कसा घेसी ।
राव म्हणे या उक्तीसी । खासी मानें[3] ॥१२॥
जें बोलतां तें हो सत्य । मज पादाचें अगत्य ।
तदर्थ हें करीं कृत्य । नित्य नेमें ॥१३॥
जरीं मना इंद्रियांला । तुझा ठाव न लागला ।
असा निगम[4] बोलिला । भला बोलो ॥१४॥
पाद घें भावजोरानें । बांधीं प्रणयदोरानें ।
ठेवीं चित्तीं ह्या करांनें[5] । धरूं न दे ॥१५॥
तुमच्या ह्या रूपा भेदें । जाणे त्याला केला वेदें ।
नामदांमें[6] बंध तो दे । तोडूनी मी ॥१६॥
बोले हंसोनी श्रीदत्त । तूं रे जरी माझा भक्त ।

---

१ दुष्ट. २ निर्दय. ३ प्रमाणें. ४ शास्त्र. ५ हस्तानें. ६ दावें.

मला संस्कारूनी रक्त । मांस देयीं ॥१७॥
ताजी नराची करटी । ती आवडे मला वाटी ।
ठेवीं मद्य मांसासाठीं । मोठी प्रीती ॥१८॥
भूप ऐसें परिसोनी । प्रेमें देयी प्रतिदिनीं ।
पशुसोम यज्ञ मानी । मनीं हर्षें ॥१९॥
ओळखूनी त्याची भक्ती । हर्षें दत्त वर देती ।
भूप मागे दृढमती । नेती[1] पूर्व ॥२०॥
गुणपूर्ण व्हावा पुत्र । जो तारी इह परत्र ।
दाता मान्य लोक मित्र । शत्रुहंता ॥२१॥
देव विप्र पितृभक्त । रणशूर धर्मसक्त ।
पित्रांसह व्हावें मुक्त । ज्याच्या योगें ॥२२॥
दत्त बोले घे हें फळ । पत्नीला दे तसें बाळ ।
होवो तुला भक्तिबळ । फळ तसें ॥२३॥
भूप वंदोनी घे फळा । वंदोनी ये तो स्वस्थळा ।
सर्व सांगोनी दे फळा । महिषीला[2] ॥२४॥
तीणें फळ तें भक्षिलें । रात्रौ स्वप्नीं देखियेले ।
अवधूत तिशीं बोले । धन्य हो तूं ॥२५॥
म्हणोनी तो देयी मोतीं । दुग्ध पूर्ण शंख हातीं ।
घेवोनीयां प्रोक्षी प्रीती । चित्तीं देयी । ॥२६॥
राणी पाहे त्याचें वक्त्र । शिरीं दिसे सर्पछत्र ।
दिव्य माल्यांबर वस्त्र । चित्रकांती ॥२७॥

---

१ नमन. २ राज्याभिषेक झालेल्या स्त्रीस.

ऐसें पाहोनी ऊठली । राणी चित्तीं आनंदली ।
स्वप्न भूपातें बोलिली । पाहिलें जें ॥२८॥
प्रातःकाळीं शौनकाला । भूप स्वप्न सांगे त्याला ।
म्हणे मुनी होयी तुला । पुत्ररत्न ॥२९॥
हुंडासुरा मारोनियां । सार्वभौम होय जया ।
दत्त रक्षील अपाया । निवारोनी ॥३०॥
तें ऐकोनी स्वर्गीं देव । करीताति महोत्सव ।
हुंडासुर कन्या तंव । स्वर्गीं गेली ॥३१॥
हिंडे ती नंदनवनीं । चारणाच्या[1] मुखांतूनी ।
वार्ता ऐसी ही ऐकोनी । परतली ॥३२॥
पित्यापुढें ये धांवोनी । सांगे ऐकिलें जें कानीं ।
दैत्य डचकला मनीं । मानी सत्य ॥३३॥
जेव्हां आयू तपा गेला । मागें दैत्यें भूमंडळा ।
जिंकोनीयां अमरांला । जिंकीयेलें ॥३४॥
नामें अशोकसुंदरी । बलात्कारें तिला धरी ।
शाप दे ती तुला मारी । आयुपुत्र ॥३५॥
तीला ठेवी तो बंदींत । जेव्हां कन्या हे सांगत ।
तेव्हां शाप आठवीत । दैत्य मनीं ॥३६॥
जावोनी तो त्या राणीला । पाहे म्हणे गर्भी आला ।
ईचे शत्रू हाचि मला । मारील कीं ॥३७॥
पोटी रिघोनी मारूं कीं । म्हणे तंव तो विलोकी ।

---

१ गंधर्वांपैकीं एक जात.

सुदर्शन फिरे झोंकीं । दुःखी झाला ॥३८॥
म्हणे कोण राखी याला । नावरे हें चक्र मला ।
दावी कोपानें राणीला । दुष्ट स्वप्नें ॥३९॥
सुदर्शन दैत्य पाहे । राणीला तें ठावें नोहे ।
म्हणोनी ते भीती वाहे । पाहे सूर्या ॥४०॥
जय सूर्या तेजःपुंजा । चेतवीसी तूं ह्या प्रजा ।
दुष्टस्वप्ना काश्यपजा[1] । माजा वारी ॥४१॥
ऐसी सूर्या ती प्रार्थुनी । भय मनींचें सोडुनी ।
राहे दैत्य तें जाणूनी । मनीं धाके ॥४२॥
सोडूनी दे खाणेंपीणें । म्हणे माझें सरे जिणें ।
उणें केलें बल ईणें । शीणे असा ॥४३॥
असा किती काल जातां । राज्ञी प्रसूत न होतां ।
भूप उपाय योजिता । झाला मंत्रें ॥४४॥
देवा सप्तवध्रि भीता । नाथमाना सोडा आतां ।
गर्भा माता न शीणतां । प्रसूत हो ॥४५॥
या मंत्रानें जल देती । अर्ध रात्रीं इंदुमती ।
प्रसवली पुत्रज्योती । हो ती हृष्ट ॥४६॥
तेज बाळाचें फांकलें । दीप निस्तेज जाहले ।
रायें जातकर्म केलें । धालें मन ॥४७॥
गीतवाद्यांचे गजरीं । महोत्सव होती पुरीं ।
राजा हर्षोनी अंतरीं । करी दानें ॥४८॥

---

1 काश्यपगोत्रोत्पन्न सूर्या.

तें देखोनी हुंडदैत्य । म्हणे हाची शत्रु सत्य
याला हराया हें कृत्य । करूं आतां ॥४९॥
म्हणे महामाये देवी । माझे ठायीं कृपा ठेवी ।
स्वहिताचा मार्ग दावीं । भाविक मी ॥५०॥
क्लीं मोहिनी हो प्रसन्न । ठेवीं सर्वांला मोहून ।
माझें कार्य दे साधून । बळी देयीं ॥५१॥
स्तवी ऐसें मोहीनीसी । तेव्हां बाहेर ये दासी ।
दैत्य तीचे अंगी घूसी[1] । तीशीं गेला ॥५२॥
असा दैत्य तेथें आला । त्याला कोणी न देखिला ।
तो प्रस्वापीनी[2] मंत्राला । योजी तेव्हां ॥५३॥
देवि स्वप्नाधिकरणीं । ठेवीं सर्वां निजवूनी ।
प्रातःकाळीं प्रस्वापिनी । ऊठवीं तूं ॥५४॥
जरी बाळा रक्षी दत्त । तरी मंत्रा मान देत ।
दैत्यें सर्व होतां सुप्त[3] । बाळा नेला ॥५५॥
तो नेवोनी दे भार्येला । म्हणे वधीं आतां याला ।
रक्त मांस देयीं मला । मूलाचें ह्या ॥५६॥
राणी म्हणे अगई हें । कसें करूं साहस हें ।
ताजें बाळ प्रिया पाहे । न हें बरें ॥५७॥
दैत्य म्हणे शत्रू माझा । आणीला हा यत्नें तूझा ।
काय विचार हा माझा । प्राण घेयी ॥५८॥
अर्थकाम साधाया हा । यत्नें आत्मा राखावा हा ।

---

१ पाठोपाठ. २ सर्वांस निद्रा देणाऱ्या. ३ निद्रिस्थ.

नष्ट होतां पुढें पहा । न हा भोग ॥५९॥
ऐसें गुरूचें हें मत । मूढें कां तूं न जाणत ।
ऐसें ऐकोनी हातांत । पोतें[1] घे ती ॥६०॥
जय लाभ मृयु हाणी । त्या त्या वेळीं घडे कोणी ।
न वारी हें मनीं प्राणी । नाणीती हो ॥६१॥
माराया दे दासीकरीं । राणी गुंते कार्यांतरीं ।
ती दे बाळ सूदाकरीं[2] । मारी तो त्या ॥६२॥
सुदर्शन रक्षीतसे । शस्त्र तुटोनी जातसे ।
कौतुक तें पहातसे । हंसे बाळ ॥६३॥
तेव्हां दासीला ये दया । म्हणें सूदा न मारीं या ।
सूद म्हणे मारवी या । राया कांगे ॥६४॥
दिव्य लक्षण बाळ हा । पहातां मीं घेयीं मोहा ।
या मारवी दैत्य पहा । महादुष्ट ॥६५॥
आतां येथोनी या न्यावें । कोठें तरी लपवावें ।
असें म्हणोनी तें जवें । ने ती बाळ ॥६६॥
पोरा वसिष्ठाच्या द्वारा । ठेवोनी मृगाच्या पोरा ।
मारोनीया तें असूरा । मांस देती ॥६७॥
दैत्य विश्वासें खावोनी । आपणातें धन्य मानी ।
प्रात:काळीं द्वारीं मुनी । देखे बाळा ॥६८॥
ध्यानें सर्व जाणे मुनी । दयेनें घे उचलोनी ।
अरुंधतीला नेवोनी । दे त्या बाळा ॥६९॥

---

१ अर्भक. २ पाक करणाराचे हातीं.

ऋषींसह आशीर्वादा । वदे दत्ता बाळा सदा ।
राखें ग्रह भूतबाधा । कदां न हो ॥७०॥
शत्रू बांधील निकाम । म्हणोनी नहुष नाम ।
ठेवी वाढवी तो प्रेम । बाळ त्यांचें ॥७१॥
थोर होतां व्रतबंध । केला सर्वविद्याबोध ।
झाला नहुष तो बुध । सर्वगुणी ॥७२॥
इकडे तों प्रातःकाळ । होतां गेलें मंत्रबळ ।
इंदुमती पाहे बाळ । न दिसेची ॥७३॥
म्हणे कटकटा हाय । माझें बाळ झालें काय ।
कोणी नेलें तान्हें माय । बहिणी हो ॥७४॥
चोरीलें म्यां काय धन । किंवा हिरोनी घे रत्न ।
त्या पापें कीं पुत्ररत्न । नष्ट झालें ॥७५॥
लाभे होतां महाकष्ट । पुत्ररत्न जें उत्कृष्ट ।
केलें कोणी तें अदृष्ट । कष्ट हे कीं ॥७६॥
श्रीदत्ताचा हा प्रसाद । तेथें केवि ये विषाद ।
काय आम्ही केला भेद । मंदबुध्या ॥७७॥
न झाल्याचें एक दुःख । ह्या दुःखाचा कोण लेख ।
करी जें दे सदा शोक । ऐक दत्ता ॥७८॥
पुरे पुरे देवा आतां । परीक्षा हे गुरुनाथा ।
पदीं आठवूनी गाथा । माथा ठेवीं ॥७९॥
असें म्हणोनी ती दीन । भूमीवरी लोळे खिन्न ।

---

१ सर्व. २ दुःख.

शोक करी आक्रंदोन। दोन घडी ॥८०॥
आयूराजा तें ऐकोन। आला तेथें तो धांवोन।
पाहे कष्टी बाळावीण। दीन राणी ॥८१॥
म्हणे बाळा कोणी नेलें। किंवा भूतें लपविलें।
मायाजाळ पसरिलें। भले कोणी ॥८२॥
मंत्ररक्षा मी ठेविली। ती हो सर्व व्यर्थ झाली।
कुलदेवी कोठें गेली। मेलीं सर्व ॥८३॥
धिक्प्राकारा धिक् ह्या पुरा। धिक् धिक् वीरां महाशूरा।
मंत्र तंत्र यंत्राकारां। सुरां धिक् धिक् ॥८४॥
खोटें जणूं तप फळ। मुळीं धर्मा नाहीं बळ।
दान समजें निर्फळ। काळ येतां ॥८५॥
मुळीं जन्माचा मी वांझ। काय देयी देव मज।
हेंची ठावें झालें आज। मज पूर्ण ॥८६॥
दत्ता त्वां हें काय केलें। मज आशेनें गोविलें।
हातीं देवोनी घेतलें। दिल्हें फळ ॥८७॥
बापा हातांत देऊन। कसें घेसी हिसकून।
साजे हें कीं दयाघन। दीननाथा ॥८८॥
लावोनीयां कान मन। आतां ऐकें हा मी दीन।
बाहें तुला मतिहीन। खिन्न चित्तीं ॥८९॥
धांवें पावें गा सत्वर। कितीं बाहुं वारंवार।
गळा टाळा फुटे धीर। धरवेना ॥९०॥
देवा खास तूं अनंत। माझा काय घेसी अंत।

झालों मी हा तवांकित। चित्त दे गा ॥९१॥
पूर्वी अंगिकारोनियां। आतां देसी लोटोनियां।
ऐसें न करीं सखया। दयानिधे ॥९२॥
मी धेनूसा हो व्याकूळ। वत्साविना तळमळ।
करीं माझा तूं सांभाळ। बाळ दावीं ॥९३॥
असा राजा करी शोक। दत्तावांचोनी आणिक।
मना नाणीं हो का दुःख। शोक तरी ॥९४॥
जगीं होती भक्त चार। त्यांत अर्थी आर्त दूर।
जिज्ञासू हा अविदूर। ज्ञानी आत्मा ॥९५॥
राजा संतान न होतां। पुत्रार्थी शरण दत्ता।
ये तो दैवें झाला आतां। आर्त भक्त ॥९६॥
भक्ति द्विगुणित झाली। श्रीदत्तासी कृपा आली।
केवी करी तो आपुली। बोली व्यर्थ ॥९७॥
न मे भक्तःप्रणश्यति। हीच साच जाणा उक्ती।
भुक्ति देवोनी दे अंतीं। गती जो हा ॥९८॥
दत्त म्हणे नारदासी। तुवां जावें आयूपाशीं।
शोकें आर्त झाला त्यासी। बोध करीं ॥९९॥
तें ऐकोनी ये नारद। वीणा वाजवी स्वानंद।
राजा ऐकोनी ये नाद। खेद सोडी ॥१००॥

इति श्रीदत्तलीलामृताब्धिसारे आयुर्वरदाना-
ष्टमलहरी समाप्ता। ओव्या ॥८००॥

श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।

उठोनी तो आयूराजा । नारदाची करी पूजा ।
सेवी त्याच्या पदांबुजा । निजांगेशीं ॥ १ ॥
म्हणे आज हो सुदिन । झालें आपुलें दर्शन ।
धन्य माझें हें जीवन । मुनीश्वरा ॥ २ ॥
संत अंतरीं कोमळ । दयाघन न केवळ ।
ज्यांला नाहीं काळवेळ । दया वर्षूं ॥ ३ ॥
बुडतां मीं दुःखाब्धींत । मला द्याया वर हात ।
तुम्हां पाठवित दत्त । येथ जणूं ॥ ४ ॥
दत्तें मला पुत्र दिल्हा । अकस्मात नष्ट झाला ।
त्याचा झाला शोक मला । काय करूं ॥ ५ ॥
म्हणे नारद हंसुनी । ज्याला एकदां चिंतूनी ।
मुक्त होती त्या सेवूनी । दुःखी कां तूं ॥ ६ ॥
पुत्र गौणात्मा हा तुला । जरि असे रे कळला ।
अवकाश या शोकाला । झाला कसा ॥ ७ ॥
पुत्र-दारा-दि नश्वर । तैसें जाण हें शरीर ।
मुख्यात्मा अजरामर । धर त्या तूं ॥ ८ ॥
देह घटसा विकारी । त्याचा साक्षी अविकारी ।
प्राणेंद्रिय चित्ता दूरी । तो तूं भिन्न ॥ ९ ॥
स्वप्रीत्यर्थ देहादिक । प्रिय ज्या तो तूं अधिक ।
लोहचुंबकसा एक । चाळक तूं ॥ १० ॥
तुझ्यायोगें जड हे रे । चेतनसे होती सारे ।

तो तूं ह्या मनाचे फेरे। ठायीं पाहे ॥११॥
जाग्रत्स्वप्ना निर्विकारें। पाहें निद्रा बुद्धिचे रे।
लय उदयहि जो रे। पाहे तो तूं ॥१२॥
असावें ज्यां ह्या प्रेमा घे। धन-पुत्र-स्त्री अवघे।
स्वप्रीत्यर्थ घेयी न घे। तत्प्रीत्यर्थ ॥१३॥
सर्वांहुनि जो वेगळा। तो तूं आतां तें तूजला।
सांगों सर्वेश्वर ज्याला। सर्वज्ञता ॥१४॥
ज्याच्या ज्ञानें सर्व कळे। जीवरूपें देहीं चळे।
जीवा कर्तृत्व ज्यामुळें। फळे दे जो ॥१५॥
संसाराला जो न शिवे। स्थूळ सूक्ष्म न म्हणवे।
सर्वानंदाचे विसावे। जेथें होती ॥१६॥
हें तों परमात्मरूप। तेंचि तुझें निजरूप।
हें लक्षीतां शोक पाप। ताप कैंचा ॥१७॥
हाची तुझा मुख्य आत्मा। देह होय मिथ्या आत्मा।
पुत्र जाण गौण आत्मा। शोक दे तो ॥१८॥
पूर्वी न होतांही शोक। गर्भी येतां पातधाक[1]।
जन्मी वेदना अनेक। तोकें[2] दे तो ॥१९॥
उपजल्या बाधाव्याधी। किंवा होतील हो व्याधी।
नाना आळींच्या उपाधी। बाधी बाल्यें ॥२०॥
व्यसनाची येयी खंती। किंवा मूर्खत्वाची भीती
विवाहाची चिंता मोठी। थोरपणीं ॥२१॥

---

१ गर्भस्रावाचें भय. २ बाळ.

संतानाचीही ये भ्रांती । दांपत्याची हो कीं प्रीति ।
आतां हे हो काय खाती । भीति ही हो ॥२२॥
कैसीं पोरें यांना होतीं । त्यांचीं लग्नें कीं घडती ।
माता पिता ऐसे अंतीं । होती दीन ॥२३॥
एवं न झाल्यापासोनी । पुत्रशोक मोठा वन्ही ।
टांकी सजीवां जाळोनी । मायबापां ॥२४॥
ऐसें जाणूनी तूं आतां । गौणात्म्याची सोडीं चिंता ।
मुख्यात्म्याची करी वार्ता । त्राता तोची ॥२५॥
हुंडासुरें मारावया । तुझा पुत्र नेला तया ।
मुनीगृहीं रक्षोनियां । ठेवी दत्त ॥२६॥
दैत्या मारूनी उद्वाहा । करोनी येईल पहा ।
याच डोळां बोल न हा । माझा खोटा ॥२७॥
असें सांगोनी नारद । गेला भूपा हो आनंद ।
राणीचाही त्याणें खेद । दवडिला ॥२८॥
नहुष तो एके दिनीं । मृगयेसी गेला वनीं ।
तेथें तो आकाशध्वनी । कानीं ऐके ॥२९॥
सोमवंशी आयूराजा । नहुषा तो पिता तुझा ।
माता इंदुमती तूं जा । तया भेट ॥३०॥
नारी अशोकसुंदरी । तुझेसाठीं तप करी ।
हुंडासुरा शीघ्र मारीं । वरीं तीला ॥३१॥
ऐसें ऐकोनी नहुष । मनीं मानी बहु हर्ष ।
भ्रांती एक हो विशेष । त्याचे चित्तीं ॥३२॥

अरुं तीवसिष्ठांचा । हा मी पुत्र होय साचा ।
आज ही आकाशवाचा । कां चळवी ॥३३॥
असें चिंतूनी तो आला । सर्व सांगे वसिष्ठाला ।
वसिष्ठही सर्व त्याला । जाणवीत ॥३४॥
सर्व साद्यंत सांगुनी । नहुषाला बोले मुनी ।
आतां सत्वर जावूनी । हाणी दैत्या ॥३५॥
दत्तात्रेय तुला तारी । सर्व संकटें निवारी ।
जा तूं त्याला चित्तीं धरीं । कैवारी तो ॥३६॥
ऐसी आज्ञा देयी मुनी । नहुषही स्वीकारूनी ।
गेला एकला निघोनी । मनीं हर्षें ॥३७॥
मला सुगम हो पंथा । मार्गीं न हो चिंता व्यथा ।
शीघ्र जया सह दत्ता । आतां आणीं ॥३८॥
ज्याला युद्धीं बोलाविती । निवारी जो येतां भीती ।
मला तोची शचीपती । साथी होवो ॥३९॥
असें प्रार्थूनी तो चाले । मार्गीं सुशकुन झाले ।
कन्या गायी कुंभ आले । फलें पुढें ॥४०॥
स्वर्गीं इंद्र म्हणे सूता । शस्त्रांसह घेयीं रथा ।
जा तूं नहुषाला आतां । साह्य करीं ॥४१॥
ऐसें इंद्रानें सांगतां । छत्रवर्मशस्त्रयुता ।
घेवोनी ये साश्वरथा । मातली तो ॥४२॥
म्हणे देवेंद्रें धाडिला । देवोनी ह्या सामग्रीला ।
युद्धीं साह्य करीं तूला । भला हो तूं ॥४३॥

नहुषही तें ऐकूनी । सर्व सामग्री पाहुनी ।
स्वीकारी तो आठवूनी । मनीं दत्ता ॥४४॥
यथाविधी रथीं चढे । किंचित् जातांची त्यापुढें ।
देव येवोनियां गाढें । आलिंगिती ॥४५॥
देव म्हणती रे सुता । एकला तूं जासी आतां ।
हें पाहोनी सहाय्यता । करूं आम्ही ॥४६॥
बोले नहुप देवांला । दत्त राखी सदां मला ।
तोची करवी तुम्हांला । मला साह्य ॥४७॥
गुरुआज्ञा मी प्रमाण । मानीं त्याचें हें कारण ।
करी कष्ट निवारण । प्राणदाता ॥४८॥
असें म्हणोनी तो चाले । देवासह हें कळलें ।
अशोकसुंदरीबाले । ध्यानयोगें ॥४९॥
तिची होती रंभासखी । तिला पाठवीती दुःखी
म्हणे राजाला संमुखी । सखि होयी ॥५०॥
नहुषाच्या पुढें आली । रंभासखीची ती बोली ।
भूपा जाणवी त्या वेळीं । भूप म्हणे ॥५१॥
मला सर्व ठावें झालें । रंभे तुवां मागें चालें ।
दैत्या मारोनी पहिलें । भेटूं तुम्हां ॥५२॥
ऐकोनी हें आनंदली । रंभा त्वरें मागें आली ।
सखीला ती कळविली । बोली त्याची । ॥५३॥
देवीं कोलाहल केला । हुंडासुरें तो ऐकिला ।
म्हणे कोण मारूं आला । मला शत्रू ॥५४॥

पाहें शीघ्र जायीं दूता। कोण शत्रू येतो आतां।
किती बल त्याचें वार्ता। शीघ्र आणी ॥५५॥
दूत संमूख जावूनी। प्रयत्नें घे समजुनी
पुनः आला परतोनी। दैत्यापाशीं ॥५६॥
म्हणे आयुराजसुत। नहुषचि शत्रू येत।
सवें देवही अमित। पातले हो ॥५७॥
तें ऐकोनी घाबरला। बोले असुर भार्येला।
सत्य बोलें त्वां वधिला। त्या बाळा कीं ॥५८॥
राणी बोले दासीकरीं। त्याच क्षणीं बाळा मारीं।
दासी तीही बोले अग्रीं। मारिला म्यां ॥५९॥
त्याचें मांस त्वां भक्षिलें। आतां मन कां शंकलें।
तर असें कसें झालें। बोले दैत्य ॥६०॥
दैत्य मनीं धरी धीर। म्हणे या हो सर्व शूर।
युद्ध करूनी दुर्धर। वीर मारूं ॥६१॥
युद्धभयें जे लपती। पूर्वीं मारीं त्यां ह्या हातीं।
हें ऐकोनी सर्व भीती। जाती युद्धा ॥६२॥
रथीं बैसोनी तो स्वयें। हुंडासूर युद्धाला ये।
त्या पाहोनी खचे भयें। नये धीर ॥६३॥
धनुर्बाण धरी करीं। मातली सारथ्य करी।
त्याला इंद्र रथावरी। दूरी देखे ॥६४॥
जैसा शोभे नभीं रवी। तैसी नहुषाची छवी।
पाहोनी तो दैत्य जवीं। लोटी सैन्य ॥६५॥

चतुरंगदळ[1] भार । चाले देवसैन्यावर ।
युद्ध होय अति घोर । मरणांत ॥६६॥
एकाएकीं पाशशर । दैत्य सोडीती तोमर ।
नाना शस्त्रें अनिवार । मार देती ॥६७॥
देती जेव्हां असा मार । देव जाहले जर्जर ।
देती सोडूनी ते धीर । दूर जाती ॥६८॥
तें देखोनी नहुष यें । दैत्यां मारी बाण घायें ।
त्याच्यापुढें दैत्य भयें । न येती ते ॥६९॥
बळें समोर जावूनी । नहुष त्यां दैत्यां हाणी ।
जाती धाकानें मरोनी । कोणी दैत्य ॥७०॥
कित्येकांचे रथ मोडी । गजगंडस्थळें फोडी ।
बाणें घोड्याचीही हाडी । पाडी खालीं ॥७१॥
त्याचीं कवचेंही फाडी । करांसह धनू तोडी ।
एकाएकीं मान खंडी । फोडी पोट ॥७२॥
ज्या त्यापुढें घेयी उडी । न मारूं दे कोणा दडी ।
वीरां शोधूनी तो काडी । पाडी खालीं ॥७३॥
पाशें फरफरा ओडी । त्या दैत्यांची बांधी मुडी ।
तोडी सर्वांची तो खोडी । झाडी शौर्य ॥७४॥
रक्तप्रवाह चालिले । शव ते वाहूं लागले ।
असें घोर युद्ध झालें । मेले दैत्य ॥७५॥

---

१ सैन्य = हा यवनी शब्द असोन ईशइच्छेनें योजला गेला, अन्यही असेच आहेत.

हुंडासुर ये धांवुनी । भूपा बाणें आच्छादूनी ।
टांकी करी घोर ध्वनी । झणी तेव्हां ॥७६॥
देव ऋषी चित्तीं भीती । तें जाणूनी उग्रमूर्ती ।
सरसावे तो नृपती । मतिमंद ॥७७॥
दैत्य दावी नाना माया । भूप त्या त्या नेयी लया ।
गर्जोनीयां बोले तया । मायावी तो ॥७८॥
अरे मानवाच्या पोरा । उभा राहें धरीं धीरा ।
न जाणसी माझा बरा । पराक्रम ॥७९॥
तुला दावीं यमपुरी । जीविताची आशा जरी ।
शरण ये मला दूरी । करीं शस्त्र ॥८०॥
बोले भूप सोमवंशी । न घडली गोष्ट अशी ।
जरी शूर तूं असती । मशीं भीड ॥८१॥
माझ्या बाळपणीं माता । त्वां पीडिली त्याचा आतां ।
सूड घेतों न जीविता । तुझ्या ठेवीं ॥८२॥
असें बोलोनी तो शर । सोडी चूकवी असूर ।
लपे मायीक दुर्धर । वारंवार ॥८३॥
जेथें भासे तेथें नसे । दैत्य कृत्य करी असे ।
त्याचें कर्म पाहे तसें । हंसे भूप ॥८४॥
म्हणे मातले उलठ । रथ फीरवी मी पाठ ।
त्याची पुरवूनी कंठ । तोडीं आतां ॥८५॥
तसा रथ तो भोवंडी । भूप तेव्हां बाण सोडी ।
त्याचे दोनी बाहू तोडी । पाडी खालीं ॥८६॥

तरी तो ये अंगावर । सोडूनीयां दोन शर ।
पाय तोडूनी तो वीर । दूर टाकी ॥८७॥
तरीही तो सर्पवत् । मुख पसरोनी येत ।
तोडी नहुष त्वरित । कंठ त्याचा ॥८८॥
असा मारीतां असुर । पुष्पें वर्षती ते सुर ।
झाला जयजयकार । थोर हर्ष ॥८९॥
हर्षे देव स्वर्गी जाती । अशोकसुंदरी ये ती ।
रंभेसह बोले चित्तीं । प्रीती ठेवीं ॥९०॥
म्हणे धन्य दिन आज । भूपा वरीं तूंची मज ।
अर्पिला हा देह तूज । लाज याची ॥९१॥
दैत्यें नानापरी मज । गांजीलें जें माजें गूज ।
दत्त समजवो तूज । मी न बोलें ॥९२॥
बोले नहुष जें गुरु । सांगेल तें तसें करूं ।
गुरुपाशीं ये मी येरू । म्हणे तया ॥९३॥
राज्य दैत्याचें लुटोनी । गुरुपाशीं दे आणोनी ।
सवें दोघीही येवोनी । वंदितातीं ॥९४॥
बोले अशोकसुंदरी । मला भूपाच्या पदरीं ।
घाला निश्चय अंतरीं । धरीं ह्याची ॥९५॥
म्हणे वसिष्ठ नहुषा । मला आवडे ही स्नुषा ।
खास आहे ही निर्दोषा । योषा साध्वी ॥९६॥
मग नहुषें वरील्री । रंभा तेव्हां स्वर्गी गेली ।
मुनी म्हणे माता झाली । भली कष्टी ॥९७॥

जा नहुषा तिला भेट। राज्य करीं धर्मे नीट।
सेवीं धर्म निष्कपट। धन्य होसी ॥९८॥
अरुंधती वसिष्ठातें। वंदोनी घे तो भार्येतें।
भेटे जननी तातातें। सर्व सांगे ॥९९॥
तया आयू राज्य देयी। स्वयें भार्येसह जायी।
वनीं तेथें दत्ता ध्यायी। घेयी मुक्ती ॥१००॥
इति श्रीदत्तलीलामृताब्धिसारे नहुषविजया
नवमलहरी समाप्ता। ओव्या ॥९००॥

हें शंभर ओव्यांचे खेरीज कंस करून त्यांत पुढें लिहिले आहे ते ( मूळ प्रतींतील )

( क्षेपक ) धर्मे वागें भक्त भूप। त्याला दत्त दावी रूप।
त्याचें दुःखही अमूप। दूर करी ॥१०१॥
तद्भक्तीचा हा महिमा। वेद नेणे ज्याची सीमा।
काम पुरवूनी धामा। ने मानवा ॥१०२॥

या दोन जास्तीच्या ओव्यांना धर्मे याच्यावर बाजूस क्षेपक अशीं अक्षरें आहेत.

---

श्रीगणेशाय नमः। श्रीदत्तात्रेयाय नमः।
महात्म्याच्या मेळें कळे। धर्मतत्त्व जें आगळें।
कळतांची दुःख टळे। पळे काळ ॥ १ ॥
बाळ ययातीचा यदू। वनीं देखे नग्न साधु।
तेजस्वी हा न हो भोंदु। वंदूं म्हणे ॥ २ ॥
ज्याणें सर्वही सोडीलें। तरीं आंग न रोडिलें।

म्हणे तुम्ही हें जोडिलें। भलें ज्ञान ॥ ३ ॥
जन आयुःश्रीकीर्त्यर्थ। व्यर्थ भोगिती अनर्थ।
तुम्हां केवी ये स्वार्थ। अर्थत्यागें ॥ ४ ॥
मागें कांहीं नाहीं फांस। चित्तीं न ठेविली आस।
रुचे तरी हें अम्हांस। खास सांगें ॥ ५ ॥
सांगे साधू म्यां चौवीस। गुरू केले त्यांहीं खास।
बोध दिल्हा तो परिस। फांस तुटे ॥ ६ ॥
मोठें दुःख झालें तरी। दैवाधीन जीवांवरी।
धरण्युपदेशें[1] वरी। धरीं क्षमा ॥ ७ ॥
द्रुमानें[2] उपदेशिले। परोपकारीं आपुले।
कलेवर हें लाविलें। झालें धन्य [1]॥८॥
अन्य गोडी न पाहणें। आहारानें तुष्ट होणें।
अंतर्वायूच्या शिक्षणें। क्षणें धालों ॥ ९ ॥
कालोद्भवगंधें बद्ध। जातां वायू न हो बुद्ध।
तैसा इंद्रियार्थीं विद्ध। बद्ध नोहे [2]॥१०॥
नोहे मेघानें विकार। नभा[3] घटानें आकार।
तेवीं वृत्ति देह पर। थोर मी हा [3]॥११॥
पाहा सर्वांमाजी मिळें। गोडी दें करिं सोवळें।
उपदेश हा विमळें। जळें केला [4]॥१२॥
ठेला गुप्त किं प्रगट। न राखीजे लाघे काष्ठ।

---

१ पृथ्वी. २ वृक्षानें. ३ आकाश. + ओवीच्या आंकड्यावरील बारीक अंक केलेल्या गुरूचे दर्शक आहेत.

कुठें खातां न ज्या वीट । नीट शोधी ॥१३॥
साधी भजकांचें हित । उपाधीनें हो आकृत ।
अग्नी तैसा मी वागत । ख्यात भला ॥१४॥
कलावत्तनु विकारी । वृद्धि कार्श्य दावी परी ।
मी चंद्रसा अविकारी । धरीं मनीं ॥१५॥
जनीं आत्मा तैसा भासे । जळीं सूर्यबिंब जसें ।
संधीं हालचाल असे । नसे रूपीं ॥१६॥
जो पी करें[1] सूर्य जळ । सोडुनी दे येतां काळ ।
त्या शिक्षणें मी सकळ । घें दें लोकां । ॥१७॥
मूर्खा अति स्नेह जाचे । तदर्थ हें कपोताचें ।
आख्यान हें चित्ता खोंचे । वेंचे[2] स्नेहा ॥१८॥
महावृक्षीं करी घर । राहे कपोत सदार[3] ।
वाढे त्यांचा परस्पर । थोर स्नेह ॥१९॥
मोह मायेचा दुर्धर । न सोडिती क्षणभर ।
परस्परां हो संचार । बरोबर ॥२०॥
परस्पर न्याहाळिती । एकेठायीं खाती पिती ।
दैवें त्यांला पोरें होती । मतीहीना ॥२१॥
दीनापरी त्यां पाळीती । जरी महाकष्ट होती ।
तरी आपणा मानिती । चित्तीं धन्य ॥२२॥
अन्य कांहीं न पाहती । स्नेहामुळें बद्ध होती ।
स्तुती पोरांची करिती । गाती मूढा ॥२३॥

---

१ किरणानें. २ सोडीं. ३ बायकोसह.

घडल्याही उपोषण । त्यांचें प्रेमानें पोषण ।
करीती हो त्यां भूषण । कण देतां ॥२४॥
घेतां त्यांचें आलिंगन । गोड मानीती चुंबन ।
ऐसें आयुष्य खर्चून । क्षीण होती ॥२५॥
होती त्यांचीं थोर पोरें । पोट नीट नच भरे ।
म्हणोनी ते जाती त्वरें । बरे दूर ॥२६॥
पोर मागे हळू हळू । घराबाहेरचि खेळूं ।
आले त्यांला नये पळूं । बाळू स्तब्ध ॥२७॥
लुब्धक[1] त्यावरी जाळें । टाकोन घे मार्घे वळे ।
माय देखे ती त्या वेळे । बाळें बद्ध ॥२८॥
मुग्धपणें आक्रोशें ती । पडली जाळ्यावरती ।
अनायासें त्याच्या हातीं । येती दीन । ॥२९॥
खिन्न कवडाही पाहे । तेथें पडे तोही स्नेहें ।
ऐसा मृत्यू त्यां ये मोहें । नोहें बोध ॥३०॥
बाध अर्थी जे न देती । भोगें तृप्त जे न होती ।
स्नेहें गेहीं सक्त होती । गती त्यां हीं ॥३१॥
ज्यां ही तनू मोक्षद्वार । मिळाली ते हा विचार ।
न करिती जरी तर । घोर भोग ॥३२॥
भोग स्वर्गीं नरकीं हे । घेतां हृद्रोग कां वाहें ।
आरा परी येथें राहें । नोहे दुःखी ॥३३॥
राखीं अंतर्वृत्ती सदां । कदां नाणी मनीं खेदा ।

[1] पारधि.

दैवलब्धा खायीं मुदा । छंदा नेणें [९] ॥३४॥
जेणे परीपूर्ण सिंधू । येतां न येतां ही सिंधू ।
न हो हर्षामर्षबंधू [२] । साधू तेवी ॥३५॥
जे विषय दैवें भोगीं । त्याणें न क्षोभे मी जागीं ।
अंतपार न दें जगीं । उगी राहें [१०] ॥३६॥
मोहो स्त्रीच्या हावाभावा । रूप लावण्य वैभवा ।
पतंगसा [३] ये अभावा । भवा घे तो [११] ॥३७॥
घेतों सार माशीपरी । रमें नैकत्र न करीं ।
सांठा आपुल्याशीं मारी । वारीं दूर [१२] ॥३८॥
शूर मारी स्त्री सेवितां । गजापरी ये बद्धता ।
सोडुनी दें स्त्रीची कथा । वार्ता ही मी ॥३९॥
नेमी गृहस्थेही पोरी । माता बहीणही दूरी ।
कीजे काम अग्निवारी । करी विद्ध [१३] ॥४०॥
सिद्ध करी मधुमाशी । पूर्वीं मधु हा घे त्यासी ।
ह्या शिक्षणें घें सुखेंसी । त्या सिद्धान्ना [१४] ॥४१॥
ज्याना गीतवाद्यें बंध । ते हरिण देती बोध ।
चित्ता न लावीं तो नाद । बंध जो दे [१५] ॥४२॥
मोदे गंधें मीन त्याला । जिव्हा नावरिता आला ।
मृत्यु तोची गुरु मला । झाला खास ॥४३॥
रस न जिंकी तो न हो । जितेंद्रिय महाबाहो ।

---

१ नद्या. २ क्रोध. ३ अग्नीमध्यें पतंग जसे पडतात = येथें ईशइच्छेनें अग्निपद लोपलें [ सलिलं सर्वमाइद मित्यादिवत्. ]

रसजयें विजयी हो । न हो खिन्न [१६]॥४४॥
मानवती वेश्या एक । धन इच्छुनी अधीक ।
फिरवी त्या जो धनिक । निकट ये ॥४५॥
तयेचा हा ल्हात्र ठावा । होतां कोणी तीचा हावा ।
न देखती तरी हावा । भावा दावी ॥४६॥
जेवीं डोंले[१] हाले तेवीं । आंत बाहेर ये जवी ।
रूपें पालटोनी नवीं । दावी लीला ॥४७॥
तीला कोणी न पूसतां । निराशें ये विरक्ता ।
आठवूनी भगवंता । नता बोले ॥४८॥
घालें तेंची माझें मन । रतीं अर्थीं जे हो दीन ।
आत्मारामें आलिंगन । मान देनां ॥४९॥
घेतां नराचें चुंबन । भय शोक मोहें म्लान ।
होतें आजी मदानन । पीनें[२] झालें ॥५०॥
कलेवर हें विकोनी । नित्य रमें आलिंगुनीं ।
अंतरात्म्या निराशेनीं । ध्यानीं निजें ॥५१॥
निजे निराशा होतां ती । हें शिक्षण घें मी चित्तीं ।
आशा दुःख निराशा ती । शांती थोर [१७]॥५२॥
कुररें राखितां मांस । रिते ते मारिती त्यास ।
तेव्हां मी परिग्रहास । खास सोडीं [१८]॥५३॥
जोडी सुखा आत्मरति । चिंतापमान न चित्तीं ।
त्या बाळाच्यायोगें ये ती । शांती मज [१९]॥५४॥

---

१ डोंलारा. २ पुष्ट.

द्विजकन्या एक बरी । जातां स्वीय ग्रामांतरीं ।
तीला वरूं आले घरीं । भारी विप्र ॥५५॥
क्षिप्र कराया सत्कार । साळी कांडी तेव्हां थोर ।
कांकणाचा शब्द फार । दूर जायी ॥५६॥
मायबापा ये दूषण । म्हणोनी दोन कंकण ।
राखी तींही होती जाण । खणखणें ॥५७॥
तीणें एक एक ठेलें । कांकण तें न वाजलें ।
तें शीक्षण म्यां घेतलें । भलें ऐका ॥५८॥
एकाजागीं होतां लोक । तंटा हो दोन्ही ही देख ।
वार्ता तपःसिद्धी चोख । एक होतां [२०]॥५९॥
जातां हुशार एकला । परघरीं सर्प धाला ।
तेव्हां न बांधीं गेहाला । झाला हर्ष [२१]॥६०॥
तर्ष सोडी हो एकाग्र । बाह्य नेणें शराकार ।
त्या शिक्षणें ध्यानें दूर । वारी द्वैता [२२]॥६१॥
ध्यातां तदाकारता ये । पेशस्कारकीटन्यायें ।
जीव ब्रह्म ब्रह्मत्वा ये । माये सोडी ॥६२॥
ओढी तंतू नाभींतून । कोळी खेळे ते खावून ।
अंतीं एकला होवून । आन राहे ॥६३॥
पाहें ईश मीही तैसा । स्वमायेनें ह्या विलासा ।
पसरी त्या खातां जैसा । तैसा हो कीं [२४]॥६४॥
लोकीं देह हा जायाचा । दे वैराग्यबोध ज्याचा ।
वृक्षधर्म जो बीजाचा । सांचा करीं ॥६५॥

वरीती इंद्रियें ह्याला । सवतीच्या परी त्याला ।
पावतां हा मनीं म्याला । झाला दीन ॥६६॥
मी न मानीं हो ह्याहुन । आन दुर्लभ म्हणून ।
ह्याच्या योगें घें साधून । ज्ञान हें रे ॥६७॥
तूं रे बरें हें जाणूनी । सुविचारें घेयीं मनीं ।
तेव्हां यदू हें ऐकोनी । मनीं धाला ॥६८॥
त्याला श्रीदत्त हा असें । भान होतां दावी तसे ।
दत्त आत्मरूप असे । जसें वेदीं ॥६९॥
आधीं होती परभक्ती । ह्या बोध हो त्याची मुक्ती ।
जे हें तत्त्व घेती चित्तीं । गती त्यां हो ॥७०॥

( अलंकार )

**वा**चे मना अगोचर । तो हा स्वेच्छें हो गोचर ।
**श्री**भगवान्भक्ताधार । तारक तो ॥७१॥
**सु**लभ जो स्मरणेंची । भावें गातां लीला ज्याची ।
**क्षे**म लाभे मरणाची । न चिंता हो ॥७२॥
**दे**वांलाही जो दुर्लभ । भावें अम्हा तो सुलभ ।
**त्रा**ता सदा स्वयंप्रभ । अभय दे ॥७३॥
**वा**सनेची जडी तोडी । स्वभक्ता दे ज्ञानजोडी ।
**म**नाचे चापल्य झाडी । गोडीनें जो ॥७४॥
**नं**दन अनसूयेचा । दत्त नामें जो मुनीचा ।
**ध्ये**य देव तो आमुचा । साच स्वामी ॥७५॥
**द**यासिंधो भक्तपाळा । तूझी अगाध हे लीला ।

गोब्राह्मणप्रतिपाळा । काळांतका ॥७६॥
सत्वर हें मन आतां । निज पदीं ठेवीं शता ।
विंचू डंकाची हो व्यथा । अंतकाळीं ॥७७॥
रसना ही ओढ घेयी । दृष्टी उफराटी होयी ।
दशन मिटती घायीं । जायी त्राण ॥७८॥
स्वयें होतां पराधीन । त्रिदोषही ये वाढून ।
यमपाशें हो बंधन । दीनत्व ये ॥७९॥
ती वेळा हो सुदारुण । तेव्हां न घडे स्मरण ।
ती दशा न येतां जाण । शरण हो ॥८०॥
मुखीं नाम डोळ्या धाम । चित्ता पदीं दे विश्राम ।
श्वसूकरविष्ठोपम । मान वाटो ॥८१॥
खेंचीं रागा द्वेषा चोपी । प्रारब्ध भोगीता रूपी ।
रमो मन न विक्षेपीं । ओपी दत्ता ॥८२॥
मानापमान नाठवे । मित्र शत्रु तुल्य व्हावे ।
प्रसादें निश्चळ व्हावें । भावें रूपीं ॥८३॥
लक्ष्य अचूक राहावें । निजरूपीं म्या जागावें ।
साक्षीपणेंची वागावें । गावें तुला ॥८४॥
वर हाची देयीं देवा । सदा सत्संग घडावा ।
दासापरी तुझी सेवा । भावार्थें हो ॥८५॥
देश काल वस्तुनें ज्या । परिच्छेद न तत्पूजा ।
नेणें तरी कल्पूं निजा । काजासाठीं ॥८६॥
शीतांशूचेपरी भासे । मुख ज्याचें मंद हासें ।

**अ**ब्ज प्रफुल्ल हो जसें । तसे डोळे ॥८७॥
**हा**तीं अभय वर दे । जो खेचरीमुद्राछंदे ।
**व**से पद्मासनीं मोदें । नादें लीन ॥८८॥
**नि**त्य चिंतीं रूप असें । सुमनासन देतसे ।
**धु**वीं पाद प्रेमरसें । नसें व्यग्र ॥८९॥
**ज**ल आवडीचें स्नाना । देवूं भक्तीचें भूषणा ।
**त**सें भाव विलेपना । ध्याना आणूं ॥९०॥
**ली**नपण फूल माळूं । अहंकार धूप जाळूं ।
**प**हा सोहंदीप हळू । ओंवाळूं हा ॥९१॥
**ला**डू नवविध भक्ती । वाढूं नैवेद्यार्थ भुक्ती ।
**दी**नोद्धारा करीं मुक्ती । पाहुनी हे ॥९२॥
**सिं**चिलें जें आवरण । त्याचें करीं आचमन ।
**ज्या** योगें ये हें बंधन । मनःक्षोभ ॥९३॥
**धु** हें भक्तांचें अंतर । येथें वसें निरंतर ।
**चें**दा कर्माचा सत्वर । बरा करीं ॥९४॥
**गु**रु तूंची देव तूंची । हेची भक्ती करी साची ।
**म**नीं नाणीं मी भेदाची । कची वार्ता ॥९५॥
**रू**प तुझें हेंचि जग । कोणाही न दें उद्वेग ।
**न**मी सर्वां तेणें व्यंग । सांग होयी ॥९६॥
**व**दवी हें त्या आरती । उजळूनी अंतर्ज्योती ।
**र**वि दुजे थळपती । त्या ओंवाळूं ॥९७॥
**द**त्तात्रेया गुरुराया । जयजया योगिवर्या ।

मनोरमा भक्तिगम्या । दयासिंधो ॥९८॥
लेकुराचे बा बोबडे । हे बोल वेडे वांकुडे ।
लेण्यापरी मानी लाडे । कडे घेयी ॥९९॥
सानुस्वार जो ओवी या । एक सहस्र ओविया ।
तया मध्येंची ओंवीया । ॐकारात्मा ॥१००॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य वासुदेवानंदसरस्वतिविरचिते श्रीदत्तलीलामृताब्धिसारे यद्वनुग्रहो दशमस्तरंगः । ओव्या ॥१०००॥ अक्षरें २८००० संपूर्णोऽयं ग्रंथः । श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

## या ग्रंथपठणाची फलश्रुति

अनधिकारां स्त्रीशूद्रां । ॐकारी भाविकां भद्रा ।
दुष्ट मानी कीं भक्त्यार्द्रां । हा धर्मांशु ॥ १ ॥
ठसवी जो बोध खेद । न राखी नुरवी भेद ।
काळावरी मारी पाद । लीलेनेची ॥ २ ॥
राग द्वेषां देयी लत्ता । मोहादिकांची जो सत्ता ।
लपवी त्या गुरुदत्ता । लाजेतीमा ॥ ३ ॥
शोंकडोही विघ्न कुत्रे । नाशा जाती हो ती भित्रे ।
दत्तात्रेय स्मृतिमात्रें । मृत्युग्रासीं ॥ ४ ॥
एक भक्ती असे जया । राहे निर्धार हा तया ।
वसे गंगा गोदा गया । तयापाशीं ॥ ५ ॥
कुलशीला की जे काय । यमादिकाविना स्वीय ।
तारी कर्तृत्व तें हेय । सिंचिद्रूत ॥ ६ ॥

**णी**जंतता ही ज्या येन । णावमकार म्हणून ।
**प**रभक्त्या ध्यातां मन । **धूवी पाप** ॥ ७ ॥

**स**मबुद्धये ते नमः । यतीश्वराय ते नमः ।
**शां**ति प्रयच्छ ते नमः । **नित्यसाक्षिन्** ॥ ८ ॥

**श**र्वो जोपि कुर्यात्कामं । मंदस्याभक्तस्यवामं ।
**त**त्रापि ते कृताकामं । **बंधुताऽऽहो** ॥ ९ ॥

**किं**चिन्नांतरं कुर्वेत्र । त्रयीमूर्ते त्वं साक्ष्यत्र ।
**ये** तत्कुर्युर्भयं तत्र । **धत्सेऽद्वय** ॥ १० ॥



# अथ दत्तमालावर्णांकितमाघमाहात्म्यप्रारंभः

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः ।

श्रीकुलदेवतायै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।

**ॐ** कारसद्रस पाजुनी । आवृत्तिरोग निरसुनी
टांकिला ज्या गुरुवैद्यानीं । त्यांला ध्यानीं आणूं नित्य ॥ १ ॥

**न** चले कोणाचें औषध । व्यर्थ झाले यत्न विविध ।
असाध्य तो रोगबाध । प्रणवबोधरसे केला ॥ २ ॥

**मो** घ होता अन्योपाय । भावें धरिले ज्यां पाय ।
प्रीत होवुनि गुरुमाय । सर्वापाय दूर करी ॥ ३ ॥

**भ** क्तिरसाच्या अनुपानें । ज्याणें अर्धमात्रादानें ।
ध्यानपथ्य योजुनी क्षणें । रोगभेणें दवडिलें ॥ ४ ॥

**ग** ती अतर्क्य औषधाची । एकाक्षरें या जीवाची ।
एकाक्षरता झाली साची । नवल हेंची न वर्णवे ॥ ५ ॥

**व** र्णवेना द्वैतपणा । तथापि वाराया कृतघ्नपणा ।
गुरुशिष्यत्व लक्षणा । योजूं बाणा प्रगटाया ॥ ६ ॥

**ते** जस्वी यदुपदेश । अविद्यांधतमसनाश ।
कराया जो सामग्रीस । इच्छी खास न कदापी ॥ ७ ॥

**दत्** ताभय दत्तात्रेय । तोचि माझा गुरुराय ।
त्याचे नित्य चिंतूं पाय । जे अपाय निवारिति ॥ ८ ॥

**ता** रक जो ह्या कलियुगीं । स्मृतिगामी पावे वेगीं ।
यत्कृपेनें धन्य जगीं । होती रागी विरागी ॥ ९ ॥

**त्रे** धा पापतापहर । त्याणें केला जो सादर ।
कार्तवीर्या बोध रुचिर । भाषांतर करूं त्याचें ॥१०॥

**या** भाषेची प्रौढी आज । लोकां असे प्रायः मज ।
धीप्रेरकें दिधला उमज । निजगुज समजवाया ॥११॥

**य** मादियोगसंपन्न । कार्तवीर्य तो अर्जुन ।
सह्यतटीं माघीं येवुन । श्रीदत्तचरण वंदितसे ॥१२॥

**स्म** रणभक्ति ज्याची पूर्ण । ज्याला मानिती सिद्धगण ।
माघस्नाता तो देखोन । प्रार्थी अर्जुन श्रीदत्ता ॥१३॥

**र** क्षावा हा यत्नें देह । ह्याच्यायोगें स्वसंदेह ।
फिटे त्याला जनसमूह । पीडितो मोहग्रस्त हा ॥१४॥

**ण** कारांत रायमध्य । ज्याला नाकार हो आद्य ।
तो तूं ह्या नरांला साध्य । होसी दुराराध्य इतरांला ॥१५॥

**मा** नुपदेह दुर्लभ । त्याचा झाला ज्यांलां लाभ ।
ते त्या देती जरी क्षोभ । ईशक्षोभ तयां हो कीं ॥१६॥

**त्र** स्त पूर्वीं जो शीतानें । पुनः त्याला माघस्नानें ।
अत्यंत शीतजलानें । नित्य यत्नें कष्टविती ॥१७॥

**सं** कल्प तरी त्या स्वर्गाचा । काय उपयोग नश्वराचा ।
संदेह हा मच्चित्ताचा । वारा साचा शिष्य मी ॥१८॥

**तुष्** ट होवुनी दत्त वदे । उपाय हा योजिला वेदें ।
लोकां वळवाया फलवादें । अधिकारभेदें योजिला ॥१९॥

**टा** ळावया विषयाशा । वेद योजी युक्ती अशा ।
सद्धर्में क्षाळुनी दुराशा । क्रमें पाशा तोडवितो ॥२०॥

य ज्ञादिक धीशुध्यर्थ । योजिले ते यथार्थ ।
न घडती त्याला हा स्वार्थ । दावी समर्थ वेदराज ॥२१॥

म हाकष्ट स्वार्थामुळें । न पाहती हे जन भोळे ।
देहा धन्यत्व सोहाळे । धर्मबळें त्यां लाधती ॥२२॥

हा रक्तमांसास्थिमय देह । पंचभूतांचा समूह ।
नाना दोषांचें हें गेह । काममोहस्थान हेंची ॥२३॥

भ य ज्याच्यायोगें निश्य । यदर्थची घडे अकृत्य ।
तथापि हा अशुची अनित्य । त्याचें अगत्य किती पहा ॥२४॥

य ज्जन्म स्त्रीविटाळांत । विष्ठामूत्रीं झाला मूर्त ।
विष्ठा मूत्र ज्याचे आंत । वाहतसे नवद्वारें ॥२५॥

नि त्य क्षाळितांही ये वीट । कृमिविट्भस्म शेवट ।
ज्याचें तो हा देह स्पष्ट । दोषदुष्ट काळभक्ष्य ॥२६॥

वा सनेचें हें माहेर । ममताहंतेचें हें घर ।
मोक्षस्वर्गनरकद्वार । दुर्धर दुष्पूर वंचक ॥२७॥

र क्षणार्थ यत्न करितां । काळ पळवी न कळतां ।
जीववियोगें अस्पृश्यता । मग कां अहंता तशाची ॥२८॥

णा णें पारखी परीक्षक । तैसा आत्मानात्मविवेक ।
सत्तास्फूर्तीनें हा येक । करी चोख न इतर ॥२९॥

य त्प्राप्ति अति दुर्लभ । ह्याणेंच घडे मुक्तिलाभ ।
व्यर्थ याचा न कीजे लोभ । देवक्षोभ अन्यथा ॥३०॥

म नुष्यें स्वदेहपीडन । व्यर्थ न कीजे साच जाण ।
शास्त्राधारें करितां कोण । अकारण वदेल तें ॥३१॥

ह्या माघ अघनाशन। सूर्योदयीं करितां स्नान।
सर्व पातक परिहारून। अढळ स्थान देतसे ॥३२॥
ज्ञा नेंच मोक्ष होतो खास। परंतू तें न पापियास।
लाभे म्हणोनि पापऱ्हास। शास्त्र खास करवी असें ॥३३॥
न होतां पापक्षालन। न लाभे ज्ञानसाधन।
साधनाविना न ठसे ज्ञान। म्हणोन योजी शास्त्र हें ॥३४॥
प्र कृती प्राक्तन चेष्टा करवी। ह्या सद्धर्में तीला बरवी
वळवितां मोक्षपदवी। अचूक पाविजे न कष्टें ॥३५॥
दा रपुत्रादिकां करितां। देहा कष्टविती त्या परता।
शास्त्राधारें पुण्य करितां। ईशक्षोभता न घडे ॥३६॥
य ज्ञादिक परतंत्र। देह साध्य हें स्वतंत्र।
ऐकें एक द्विजकलत्र। गेलें परत्र ह्या योगें ॥३७॥
च्चि मणी एक ब्राह्मणीं। बालवैधव्यें पीडूनी।
कपिलारेवासंगमीं जावुनी। माघस्नानें साठ केलीं ॥३८॥
दा नधर्म करी नित्य। वदे वाक्य मिताल्पसत्य।
दुष्टसंग सोडुनी स्वकृत्य। करी अकृत्य निवारी ॥३९॥
नं दन भ्रात्रादि स्वजन। धर्म एक सनातन।
ऐसें मानी अनुदिन। न करी पीन स्वदेहासी ॥४०॥
दातृ त्री साध्वी उंछवृत्ती। नित्य करी शिणे न चित्तीं।
स्वधर्मीं ठेवी जागृती। राखी सन्मती निरंतर ॥४१॥
म न विषयीं न घाली। कृछ्र चांद्रायणें करी भलीं।
अशा आचारें वृद्ध झाली। ब्राह्मणी भली ऋचीका ॥४२॥

ने मैं करितां माघस्नान। तिची बुद्धी पालटोन।
सहज लागलें विष्णुध्यान। देहावसान समयासी ॥४३॥
बा ल्यापासून केले कष्ट। त्याचें घे ती फल उत्कृष्ट।
विष्णुलोकीं अप्सरा वरिष्ट। ब्रह्मनिष्ठ तीसी ॥४४॥
लो कीं नसे जीला उपमा। नाम जीचें तिलोत्तमा।
यत्सौंदर्या नसे सीमा। तिला ब्रह्मा प्रार्थितसे ॥४५॥
नृ त्यगीतादि कौशल। तिलोत्तमे वाक्पेशल।
असे तुला निश्चल। ह्मणोनी चाल भूलोकीं ॥४६॥
मत् त दैत्य सुंदोपसुंद। तन्मतीचा करीं भेद।
तेणें त्रैलोक्याचा खेद। निर्विवाद दूर होयिल ॥४७॥
त थास्तु ह्मणोनी ये ती। सुंदोपसुंद तिला पाहती।
भुलोनी ऐक्य सोडिती। भोगू इच्छिती दोघेही ॥४८॥
पि टोनि बाहू गदा घेती। परस्परें गजसे भिडती।
मींच भोगीन हे युवती। ह्मणोनी ताडिती परस्पर ॥४९॥
शा तकुंभ आणि युवती। मती कोणाची न भेदिती।
त्यांत ही लावण्य संपत्ती। तन्मती भेदी बळें ॥५०॥
च तुर दोघे देह भिन्न। नित्य ज्यांचें एक मन।
व्यवहार अन्नपान। एक वर्तन दोघाचें ॥५१॥
वे धा वर दे जेव्हां त्यांला। हाचि वर त्यांणीं वरिला।
इतरांपासूनी आम्हाला। मृत्यू न घडला पाहिजे ॥५२॥
षा ड्गुण्ययुत जरी होते। मोहें परस्पर गदाघातें।
मेले तेव्हां ब्रह्मा तीतें। सूर्यलोकातें नेतसे ॥५३॥

**य** मादिकें न साधे। ती पदवी तिला लाधे।
जीवन्मुक्ता तेथें नांदे। ब्रह्मानंदें अद्यापि ॥५४॥

**म** ग औदार्य सोडुनी। काय कार्पण्य जोडुनी।
लाभे ऐक पुरातनी। कथा पावनी अर्जुना ॥५५॥

**हा** टकाष्टकोटिनायक। हेमकुंडलाख्य धनिक।
न्यायें धनसंपादक। वैश्य एक नैषधीं ॥५६॥

**यो** ग्य भार्या असे त्याला। दोन पुत्र झाले तीला।
श्रीकुंडल विकुंडला नाम त्यांला। ठेविता झाला तो वाणी ॥५७॥

**गि** ळे काळ कधीं न कळे। दुर्दशा येतां बुद्धी चळे।
म्हणोनी तो उपरमी वळे। धर्मबळें तराया ॥५८॥

**ने** णुनी अथवा जाणुनी। घडल्या पापाची करी धुणी।
षष्ठांश द्रव्य वेंचुनी। करी धनी दानादिक ॥५९॥

**व** नीं वैश्य स्वयें चाले। पुत्रां सर्वस्व ओपिलें।
ईश्वरध्यानें वपू त्यजिलें। त्याणें जोडिलें स्वर्गपद ॥६०॥

**धू** र्तसंगतीनें तत्पुत्र। व्यसनीं झाले परतंत्र।
अपकीर्ति गाजविती सर्वत्र। कुमित्रसंगें बुडाले ॥६१॥

**ता** तें कष्टें मेळविलें धन। वेश्या नट वीत भाट दुर्जन।
त्यांचे ठायीं व्यर्थ खर्चून। झाले निर्धन निराश्रय ॥६२॥

**या** न छत्र नानावेष। नित्य पालटोनि विशेष।
विषय भोगितां निःशेष। द्रव्यकोष संपले ॥६३॥

**न** परिसतां वृद्धवचना। गती आली अशी त्यांना।
क्षुधातुर धरिती राना। स्वजनांनीं त्यागितां ॥६४॥

सू र्यास्त होतां ग्रामी लुटती । पांथांची चोरी करिती ।
किंवा जीवहिंसा करिती । भिल्लसंगती धरूनी ॥६५॥
या परी काळ कंठिता । व्याघ्रें मारिला ज्येष्ठ भ्राता ।
सर्पदष्ट दुजा भ्राता । पंचता पावला एके वेळीं ॥६६॥
नं दन वैश्याचे दोन । त्यांचें करोनी बंधन ।
दूत नेती ताडून । तयां ओढून यमापुढें ॥६७॥
द ण्डधर वदे दूतां । विकुंडला न्या वैकुंठा ।
श्रीकुंडला नरकीं लोटा । पापी मोठा हा असे ॥६८॥
वर्त न याचें कुत्सित । कनिष्ठाचें असे सुकृत ।
त्याला वैकुंठीं नेवोन । विष्णुदूत सन्मानें ॥६९॥
ध र्मरायें असें बोलतां । विष्णुदूतें कनिष्ठ भ्राता ।
विमानीं बैसविला तो दूतां । प्रार्थिता झाला नम्रत्वें ॥७०॥
ना नापापें आम्हीं केलीं । पुण्यवार्ता न ऐकिली ।
तुल्यमृत्यु एककालीं । केंवी झाली भिन्नगती ॥७१॥
या गादिक म्यां न केलें । प्राग्जन्मींचीं कीं हीं फळें ।
धर्मतत्त्व न ऐकिलें । सांगा पहिलें तें मज ॥७२॥
त्रि कालज्ञ विष्णुदूत । म्हणती त्वां होतां दुर्गत ।
दोन माघस्नानें यमुनेंत । हरिमित्रसुतसंगें केलीं ॥७३॥
पु ण्य तेंची अगणित । पाप जावूनी वैकुंठ ।
तुला लाधला अश्रांत । तो अप्राप्त श्रीकुंडला ॥७४॥
त्रा ता आपणा आपण । भोगिजे आपुलें आपण ।
पाप पुण्य तें केवी कोण । भोगील जाण इतरांचें ॥७५॥

**य** त्न न होतां पुण्य । घडलें तत्फल अगण्य ।
दयाळू हरि शरण्य । तारी वरेण्य यापरी ॥७६॥

**ॐ** कारादि नमोंत । नारायण चतुर्थ्यंत ।
उच्चारितां पातकांत । मन शांत होतसे ॥७७॥

**भ** गवन्मूर्ति विश्व असा । निर्धार ठेवुनी न कीजे हिंसा ।
उवा लिखा किडे माशा । आत्मवत् रक्षाव्या ॥७८॥

**व** दे शास्त्र ती अहिंसा । तीणें नये गळां फांसा ।
चुकवुनी नरकवासा । स्वर्गवासा जाती नर ॥७९॥

**बं** ध तोडी अभयदान । तैसेंची स्वधर्माचरण ।
परद्रोहादि सोडुन । देतां स्थान अचळ मिळे ॥८०॥

**ध** र्म इष्टापूर्त दत्त । जे आचरती दयायुक्त ।
अग्निहोत्री वेदरत । त्याला शाश्वत स्वर्लोक ॥८१॥

**वि** वेकी गोद्विजसेवक । वापीकूपप्रपास्थापक ।
पंगुदीनांधतारक । उत्तम लोक तया होय ॥८२॥

**मो** चन करी शरणागता । धर्मयुद्धीं घे पंचता ।
दाता नृप तो नरकत्राता । यमकथाही नायके ॥८३॥

**च** तुर नर मार्गी द्रुम । लावी त्याला लाभे शर्म ।
पुत्राहुनि ही परम । तारी द्रुम मानवां ॥८४॥

**ना** हीं तुलसी ज्याचे द्वारीं । यम त्याला दंड करी ।
वाहे विष्णूला जो मंजरी । तो तारी निजकुळा ॥८५॥

**य** ज्ञ तीर्थ पितर देव । तुळसीपाशीं घेती ठाव ।
तिला सेवी जो मानव । शुद्ध भाव होय त्याचा ॥८६॥

**आं** तरशुद्धी तुलसी जळ। करीं धरितां तुळसीमाळ।
झडे वाङ्मनःकाय मळ। अमंगळ मंगळ होय ॥८७॥
**अ** गत्यें करी शिवार्चन। त्रिपुंड् रुद्राक्ष लेउन।
बिल्वपत्रें लिंगार्चन। करी तो जन कैलासभागी ॥८८॥
**सा** वधानें रुद्र पढे। त्यांचें पाप सर्व झडे।
अरिष्ट टळे आयुष्य वाढे। जायी पुढें कैलासा ॥८९॥
**ध्य** क्ष लावुनी षडक्षर। जपे तो होय अक्षर।
शिवस्व भोगी पामर। नरक दुर्धर होय तया ॥९०॥
**सा** धन जोडाया मोक्षाचें। रूप पंचक ईश्वराचें।
भजावें जें ज्याला रुचे। तेची त्याचें तारक ॥९१॥
**ध** र्मं हाची द्रोह नसणें। मताग्रह न करणें।
देवभक्त एकपणें। हेंचि देखणें डोळसां ॥९२॥
**ना** नायत्नें देवालय। संरक्षितां लाभे श्रेय।
गोशाला विश्रमालय। करितां होय स्वर्गवास ॥९३॥
**य** तिमठ देवमंदिर। जीर्ण होतां करी उद्धार।
तो तरे जो त्यावर। लोभ करी नर नरक तया ॥९४॥
**ऱ्हीं** कारांकित शक्तियंत्र। पूजितां होयी स्वतंत्र।
शक्ति सूर्य गजवक्त्र। हरि त्रिनेत्र तारक ॥९५॥
**सर्** वपाप्याहुनी अधिक। देवद्रव्योपजीवक।
निर्लोभ जो देवार्चक। तोचि एक धन्य होय ॥९६॥
**व** से प्रीती जसी विषयीं। लागे तैसी देवाविषयीं।
भला हो कां तो विषयीं। मुक्तिविषयीं न शंका ॥९७॥

वि धाता जो जीवांचा । वेद ही त्याची वाचा ।
ती उल्लंघी तयाचा । कोण कैंचा कैवारी ॥९८॥
भू तदया ही त्याची पूजा । येथें न हो भाव दुजा ।
निजधर्में तया भजा । त्राता न दुजा त्याहुनी ॥९९॥
ति तिक्षापथ्य सेविती । धर्म औषध जे घेती ।
त्यांचे क्लेश रोग हरती । सुखस्थिति तयां होय ॥१००॥
दा नें देती यथाशक्ती । ग्रीष्मी प्रपा स्थापिती ।
हेमंती काष्ठ कंबळें देती । विश्रांति करविती वर्षाकाळीं ॥ १ ॥
य ज्ञदानादिक धर्म । किंवा करणें सत्कर्म ।
याच द्विपीं घडे उत्तम । अन्यत्र शर्म भोगणें ॥ २ ॥
क्रौं चादि द्वीपें असती । तेथें कर्में न घडती ।
जंबुद्विपीं पुण्यें होती । आर्यावर्ती विशेष ॥ ३ ॥
अ सें जाणुनी सादर । नित्यकर्म करी नर ।
पापें वारूनी सत्वर । जायी पार भवाब्धीच्या ॥ ४ ॥
सा दरें करी प्रातःस्नान । यथाकाळीं संध्यावंदन ।
पंचयज्ञ आचरोन । राहे तो न बद्ध होय ॥ ५ ॥
ध्या नीं धरी विष्णूसी । कर्मे करी निराशी ।
मुक्ती त्याचि होयि दासी । सिद्धी त्यापासीं रांगती ॥ ६ ॥
कर् माकर्म विकर्म । जाणावें ह्याचें वर्म ।
तोचि सनातन धर्म । शर्म घडे त्यायोगें ॥ ७ ॥
ष ट्शास्त्रेंही जाणिलीं । परि कर्माची हे किल्ली ।
जंववरी हातीं न आली । तंव शिणविलीं त्रिकरणें ॥ ८ ॥

णा डितो पक्ष करूनी । अन्या ठेविती अडवुनी ।
ते जातील निर्वाणीं । हे कहाणीं नायकावी ॥ ९ ॥
य थोक्त कर्मे करून । जे करिती ईश्वरार्पण ।
दंभासूयादि सोडून । तेची जाण मोक्षभागी ॥१०॥
ऐं द्रीपासूनी अष्ट दिशा । तीर्थें हिंडतां न दुर्दशा ।
दुरावे धरितां फलाशा । ईशानुग्रहावांचुनी ॥११॥
ाक्र पटुत्व बुद्धिकौशल । असे जरीं विद्याबल ।
तरीं अज्ञानाचें मूळ । नरा निर्मूळ न करवे ॥१२॥
प्र त्यक्षादि प्रमाणानें । न मिळे तें स्वधर्मानें ।
लाभे बुद्धिशुद्धीनें । वेदवचनें विश्वासितां ॥१३॥
दा वी गुरु शास्त्राधारें । तें श्रद्धेनें जो आचरे ।
तो नर भवाब्धी तरे । हेंची खरें मुख्य वर्म ॥१४॥
य ज्ञ पूर्तेष्टदान । जपतपानुष्ठान ।
सफळ होय भाविकां जाण । गुरुवचन पाळितां ॥१५॥
क्लीं कारादि बीजें योजून । मोहमादिप्रयोगाचरण ।
करविती कर्म दारुण । गुरु कोण म्हणेल ते ॥१६॥
ज नदुःखें कळवळे । ज्याचें चित्त स्वयें वळे ।
दीना तारी निजबळें । उपदेश फळे तयाचा ॥१७॥
गा रज नाहीं स्वार्थी ज्याला । सांगेना कां सकामाला ।
त्याचा उपदेश भला । तो लोकांका तारील ॥१८॥
त्र यिमूर्ति तो मानुन । पाळितां त्याचें वचन ।
उद्धरती हीन दीन । सत्य जाण त्रिवाचा ॥१९॥

य त्नें पाप वर्जावें । घडतां प्रायश्चित्त करावें ।
नित्य हरीतें स्मरावें । पाप दुरावे तयाचें ॥१२०॥

व श्य करी इंद्रियांसी । सोडुनी दे परान्नासी ।
माता मानी परस्त्रीसी । ग्वास त्यासी श्रेय ये ॥२१॥

शी तोष्णादि साहुनीं । भावें वागे सदाचरणीं ।
परनिंदा न घे कानीं । तो तरोनी तारी परा ॥२२॥

क र्म न फळे स्नानाविणें । अस्नाताच्या वीक्षणें ।
देव फिरती मागें क्षणें । त्याचें जिणें शववत् ॥२३॥

र जस्वल स्नानाविणें । म्हणोनी तें नित्य करणें ।
मात्र मानसस्नानें । रोग्याकारणें योजिलीं ॥२४॥

णा डी लोकां पाखंडपणें । खायी पियी स्नानाविणें ।
तो नर नरकीं शिणें । यमभेणें ये तया ॥२५॥

य म न करी पाप्याची दया । अपराध क्षमा नसे जया ।
नृदेहीं धरितां हरिच्या पायां । यम तया काय करी ॥२६॥

सौ ष्ठवें हरिचें नाम । वेदसेवा तीर्थधाम ।
धर्म करी निष्काम । परंधाम त्या लाभे ॥२७॥

सर् वांहुनी अन्नदान । श्रेष्ठ न ज्या काळ मान ।
बुभुक्षित पात्र जाण । हें तारण उभयत्र ॥२८॥

व से गृहस्थ होवुन । त्याणें द्यावें शक्त्या अन्न ।
यती वर्णी ब्राह्मण । विमुख होतां जाण दुर्गती ॥२९॥

म ध्यान्ही ये भुकेला । न देतां दवडी त्याला ।
त्याचे गेहीं अवदशेला । थारा झाला शाश्वत ॥१३०॥

**नः** ष्ट दुष्ट न म्हणावा । यथाशक्ती तोषवावा ।
अतिथीप्रसादें ये देवा । दया भावार्थी याची ॥३१॥

**क्षो** भवितां अतिथीसी । देव पितर तयासी ।
शापिती तो कष्टेंसी । नरकवासी होतसे ॥३२॥

**भ** वभय टाळावया । गंगातीर सेवी तया ।
गती ये हें न घडे जया । नामही तया तारीतसे ॥३३॥

**णा** ठवी जो चित्तीं पाप । लोकां न दे शाप ताप ।
त्याच्या पुण्या नाहीं माप । त्याचा कोप उपशमे ॥३४॥

**य** त्नें तीर्थवास कीजे । प्रतिग्रह न घेइजे ।
अन्यपाप क्षेत्रीं बारिजे । वज्रलेप जें क्षेत्रपाप ॥३५॥

**श्रीं** गितज्ञाची भक्ती थोर । सौख्य दे जी इहपर
साधू होती दुष्ट क्रूर । ईणें पामर तरले ॥३६॥

**म** हामृत्यू अजामिळा । आला फांस घाली गळां ।
नारायणा निजबाळा । बाहे त्या वेळां हरी ये ॥३७॥

**हा** क दिल्ही नारायणा । त्या अंतरीं पुत्रपणा ।
ब्रीद राखाया नारायणा । दया ये शरणागताची ॥३८॥

**सं** ज्ञा पुत्रासी योजिली । तीच दैवें अंतकाळीं ।
वैखरीनें उच्चारिली । ती झाली तारक ॥३९॥

**पत्** ता ज्याचा योग्या नसे । स्वनामें तो भेटतसे ।
विवक्षा न पाहतसे । औदार्य असें जयाचें ॥१४०॥

**प्र** यत्नें न घेतां नामा । पापी गेला परंधामा ।
घेती ठेवूनी जे प्रेमा। हरि नामातें बुडती कीं ॥४१॥

**दा** स होवूनी विष्णूचे । नाम घेती फुका वाचे ।
अर्चन करिती शालग्रामाचें । स्थान त्याचें वैकुंठीं ॥४२॥

**य** ज्ञादिकें पुनरावृत्ती । जन्मक्लेश न चुकती ।
शालग्रामार्चनें मुक्ती । वैकुंठासी निश्चल ॥४३॥

**ग्लौं** बीजयुक्तोपासना । करितां कष्टें मिळे त्यांना ।
भूमिलाभ नश्वर जाणा । अन्य कामना न पुरती ॥४४॥

**भू** ति निधी संतती । एकैक मंत्रें मिळती ।
त्यांची नसे शाश्वती । दैवगती अतर्क्य ॥४५॥

**मं** त्र तंत्रादि फळती । तीं फळें नश्वर होती ।
शालग्राम इष्ट प्राप्ती । दे सन्मती ठेवितां ॥४६॥

**ड** सूं येतां महाकाळ । त्याचें हरावया बळ ।
शालग्रामार्चन सबळ । चित्ता निश्चळ करी जें ॥४७॥

**ला** भे गुरुप्रसादें जी । विष्णुभावें तिला पूजी ।
त्याला गती न ये दुजी । वैष्णवांमाजीं श्रेष्ठ तो ॥४८॥

**धि** क्कार असो तयाला । विके जो शालग्रामाला ।
दान देतां भूदानफलाला । दे जी तिला कोण दवडी ॥४९॥

**प** य आदिकीं अभिषेक । करोनी पीनां तीर्थोदक ।
त्याचें जाय सर्व पातक । चक्रांकयोगें विशेष ॥१५०॥

**त्य** जा विषमचक्रांक । शालग्राम सम सुमुख ।
अथवा पूजावा एक । दोन ऐक न पूजावे ॥५१॥

**प्र** सन्न होय श्रीहरी । शालग्रामार्चनें तारी ।
एकादशी व्रत करी । तोही हरिवल्लभ ॥५२॥

दा न यज्ञ तपाहुन । एकादशी व्रत जाण ।
उपवासें करी पावन । पाप जाळून मानवां ॥५३॥

य त्नें कीजे निराहार । किंवा करूनी फलाहार ।
रात्रौ भजनें जागर । करितां नर पावन ॥५४॥

द्रां बीजयुक्तोपासनें । चिरंजीवित्व मात्र होणें ।
तेही देवूनी भवभेणें । हरी उपोषणें एकादशी ॥५५॥

चि त्तीं ठेवूनी हरीस । एकाहार एकादशीस ।
एकादशीचा उपवास । द्वादशीस पारणा ॥५६॥

रं गी हरिभजनीं नर । दोन्ही एकादशी सादर ।
करी त्याचें वैकुंठपूर । दामोदरप्रसादें ॥५७॥

जी वां विषय सर्वत्र । अन्यत्र मिळे भोगमात्र ।
येथेंची नर ज्ञानपात्र । होतां पवित्र मोक्ष घे ॥५८॥

वि वश न कीजे इंद्रियगण । द्यावें सर्वां अभयदान ।
आपुलें चित्त शोधुन । द्रोहवर्जन करावें ॥५९॥

ने में पाप वारुन । वदावें सत्य वचन ।
परस्व न घ्यावें चोरून । विषय सेवन सोडावें ॥१६०॥

व सती कीजे सज्जनीं । पीडितांही दुर्जनीं ।
विवेक शांति ध्यावी मनीं । संतोषोनी दैवलाभें ॥६१॥

षट् शत्रू जरीं उठती । त्यांची कीजे उलट गती ।
चित्तीं चिंतावा श्रीपति । सन्मती राखावी ॥६२॥

व दोनी वाचे तन्नाम । करी ऐसा स्वधर्म ।
त्याचें कर्म होय अकर्म । जें दे शर्म इहपर ॥६३॥

**शी** ण मनीं न आणितां । असा धर्म आचरतां ।
केवीं न ये मुक्तता । धरितां सत्यता शास्त्रार्थीं ॥६४॥
**कु** शल कर्मीं हर्षति । अकुशला द्वेषिती ।
त्यांला कैंची ऊर्ध्वगती । ते दुर्मती जाणावे ॥६५॥
**रु** द्रोपेंद्रादि देवता । ऐसा धर्म आचरतां ।
तुष्ट होती हें तूं आतां । अनुभविलें ताता विकुंडला ॥६६॥
**व** चन दूतांचें हें ऐकुन । विकुंडल धरी चरण ।
केलें धर्म निरूपण । धालें मन परिसतां ॥६७॥
**शी** त होयी अग्नी सूर्य । ऐसें संतां अगीं वीर्य ।
तुम्हीं चतुर आर्य । एक कार्य करावें ॥६८॥
**कु** त्सित हा माझा भ्राता । नरकांतुनी ये वरता ।
ऐसा उपाय करा आतां । असाध्य संतां नसेची ॥६९॥
**रु** दित जो माझ्याविरहें । यमयातना न साहे ।
त्या वांचुनी सुख मी हें । न पाहें सर्वथा ॥१७०॥
**चौ** ढाळ जरी आपुला । न सोडवे तयाला ।
हें कठिण तुम्हाला । नसे मला वाटतें ॥७१॥
**षट्** शास्त्री जें नेणती । संत तेंची जाणती ।
म्हणोनी करितों प्रणती । द्यावी गति बंधूला ॥७२॥
**डा** कू चाड लबाड । लांडी करी जरी द्वाड ।
तरीं तो उद्धरा म्हणोनि आड । पडला भीड घालुनी ॥७३॥
**कर्** म खोटें श्रीकुंडलाचें । तरीं मन वळे दूतांचें ।
म्हणती आठव्या जन्माचें । पुण्य साचें तुझें असे ॥७४॥

ष डंग वेद निपुण । तूं होतास ब्राह्मण ।
मत्स्यदेशीं तुझें स्थान । तेथें ब्राह्मण चार आले ॥७५॥

या ज्ञीक शाकल मुनी । त्याचे पुत्र ब्रह्मज्ञानी ।
विधिनिषेधा उल्लंडुनी । फिरती सोडुनी देहभाव ॥७६॥

कर् तृत्वादि नसे ज्यांला । तूं त्या दिगंबरांला ।
गेहीं आणूनी भला । सन्मान केला भावार्थें ॥७७॥

ष ड्रिपू ज्यां न शिवतीं । चिदन्वयें विश्व पाहती ।
तत्सेवापुण्यमिती । करूं न सकती कोणीही ॥७८॥

य त्न न होतां सत्संगति । एक दिन घडली होती ।
त्या पुण्याची नसे मिती । अगम्य गती ये ज्या योगें ॥७९॥

हुं तुंकारें गुरूला । अवमानितां ये तुला ।
सहा जन्म भोग सरला । हा लाधला देह मग ॥१८०॥

वि षयकर्दमीं येथें ही । रुततां वर येसी तेंही ।
ज्ञानिसेवा फल पाहीं । संदेह नाहीं यामध्यें ॥८१॥

द्वे षरागादि जावून । माघस्नानें तूं पावन ।
होवुन घेतलें साधून । उत्तम स्थान धन्यारे ॥८२॥

ष ड्रिपुग्रस्त बंधु तुजा । नेणें शुभाशुभ काजा ।
त्याची नसे पुण्यपुंजा । त्या दे तुझ्या पुण्यातें ॥८३॥

य मापाशीं त्वां जावें । तेंची पुण्य वोपावें ।
त्याणें तुझा बंधू पावे । वैकुंठीं जवें करीं हें ॥८४॥

वि कुंडल हें ऐकून । तसें करी पुण्यदान ।
तेणें बंधूला सोडवून । विमानासन्न आणिला ॥८५॥

द्वे ष मत्सरादि जावून । त्या पुण्यें शुद्ध होवुन ।
भ्रात्यासह यानीं बैसोन । विष्णुभवना पातला ॥८६॥
ष डिंद्रियें जिंकिती । त्यांला दुर्लभ जी गती ।
दूतसंगे वैश्या ये ती । सत्संगती तारी असी ॥८७॥
य त्न न होतां केवळ । तारी ऐसें धर्मबळ ।
देहलोभें काय फळ । खायी काळ अंतीं ज्याला ॥८८॥
फट् कारूनी लोभातें । आचरितां धर्मातें ।
नर पावे मुक्तितें । अर्जुनातें म्हणे दत्त ॥८९॥
उ च्च नीच नसे देवा । तो पाहुनी भक्तिभावा ।
देतो आनंदाचा ठेवा । करी भवाब्धीपार ॥१९०॥
चा तुर्य जेथें न चले । जेथें तार्किक भागले ।
योगीश्वरही ठकले । तें पद लाधलें भाविका ॥९१॥
ट पती अर्थी स्वार्थाला । तसे सिद्ध टपती ज्यालां ।
कष्ट होती तयांला । भाविकांला तें सहज हो ॥९२॥
यो द्धा लक्ष्या लक्षी जेवीं । योगी चित्त ठेवी तेवी ।
त्याला जी पदवी । दवीयसी होतसे ॥९३॥
चा ड त्याची न धरितां । सदाचारें येती हाता ।
तेव्हां ऐसें आचरतां । मुक्तता ये जनासी ॥९४॥
ट ळू न देतां काळ । माघस्नान करिती ते सकळ ।
पूजा होम श्रवणीं वेळ । नेती मळ गळे त्यांचा ॥९५॥
य त्नें व्रतस्थ राहती । जरीं ते कामना धरिती ।
नित्य महात्म्यें ऐकिती । पालटे मती आपोआप ॥९६॥

ठः स्का लागतांही विवश । नाम घेतांही तुटे पाश ।
मग स्वस्थ घेती निराश । त्यांचा नाश होय कीं ॥९७॥
ठः स्का लागतां बडबडे । नामोच्चार दैवें घडे ।
तो पडे भवाचे कडे । तेथें नडे कीं सावधान ॥९८॥
स्तं भित होती जेथें श्रुति । म्हणोनियां नेति नेति ।
त्या पदाची प्राप्ति । या रीती होतसे ॥९९॥
भ क्ति श्रद्धा ध्यान । याहीं घडे आत्मज्ञान ।
त्यांत भक्ती ये घडोन । धर्माचरण करितां ॥२००॥
य थार्थ होतां आचरण । शुद्ध होय अंतःकरण ।
मग सहजची ध्यान । लागे जाण अर्जुना ॥ १ ॥
स्तं भाधार जेवीं घर । तेवीं ज्ञान भक्त्याधार ।
परभक्ती ज्ञानोत्तर । जे ईश्वरानुरक्ति ॥ २ ॥
भ क्ती ज्ञानाची जननी । ती मिळे सदाचरणीं ।
तेव्हां ही लोकां करणी । होय तारिणी जाणावी ॥ ३ ॥
य मादि योग सत्कार । कारण असे साचार ।
तप श्रद्धा त्यांत थोर । योगिवर मानिती ॥ ४ ॥
खें चावया इंद्रियां । मन हेतू होय तया ।
बुद्धी खेंचे तिला राया । सत्वशुद्धी पाहिजे ॥ ५ ॥
खें म देतां सत्वें धीला । आत्मा स्वयें दिसे भला ।
आचार हा सत्वाला । शोधक योजिला श्रुतीनें ॥ ६ ॥
मा घस्नान तुच्छ साधन । असें न मानो तुझें मन ।
हें ध्यानीं आणोन । पाहें भ्रमण न ये रे ॥ ७ ॥

र चना वेदाची अचाट । अधिकारें दावी वाट ।
भाविक तेणें जाती नीट । जे धीट ते तरती ॥ ८ ॥
य त्नें आणि मार्गावर । वेद हा दयापर
दोषारोप त्यावर । करतां नर न तरती ॥ ९ ॥
मा घस्नानपुण्यें एक । ब्रह्मराक्षस तरला ऐक ।
माघस्नान अप्सरा सुरेख । करी एकभक्तीनें ॥२१०॥
र मणी सर्वकलापूर्ण । कैलासीं जीचें स्थान ।
उमेची सखी होवून । शिवार्चन नित्य करी ॥११॥
य त्नें प्रतिवर्षीं ती । माघस्नानीं धरी प्रीती ।
अर्धोदयीं आप्लुती । प्रयागीं ती करितसे ॥१२॥
न टळे तीचा कधीं काळ । होतां नित्य उषःकाळ ।
प्रयागीं ये चपळ । योगबळ असे जीला ॥१३॥
मः स्तकीं अंजुली बांधून । करी शंकरा नमन ।
यथाविधी·माघस्नान । करी मन लावुनी ॥१४॥
सं कल्प ईशप्रीत्यर्थ । याहुनी नसे अन्यार्थ ।
मग ती देहाचा स्वार्थ । प्राज्ञी किमर्थ राखील ॥१५॥
पं नग भूषणें न्हाणाया । जल घेवुन चाले तया ।
गायी चित्त लावुनियां । भवभया वारी जो ॥१६॥
न पाहे ती इतस्ततः । ऐसें नित्य आचरत ।
एके दिनीं मार्गांत । देखे अकस्मात राक्षसा ॥१७॥
य क्षादिक ज्याला भीती । हिमाचलीं करी वस्ती ।
त्याची पाहतां आकृती । प्राण होती कंठगत ॥१८॥

**सं** निध येतां तीचा। तुषार पडला आर्द्रवस्त्राचा।
क्रूरभाव राक्षसाचा। गेला पुण्याच्या प्रभावें ॥१९॥
**पं** न जलकणयोगें। पूर्वस्मृती झाली वेगें।
नमूनी म्हणे कोणगे। आकाशमार्गें जासी तूं ॥२२०॥
**न** मितों तुझे चरण। जासी कोठें तूं कोण।
कोठून तुझें आगमन। निवेदन करीं हें ॥२१॥
**य** क्षिणी किंवा योगिनी। किंवा क्षिराब्धिनंदिनी।
वाटे तूं होसी भवानी। माझ्या कानीं दे वार्ता ॥२२॥
**स्वा** गम तुझें रूप। लावण्यतेजें त्वद्रूप।
स्फुरे तेणें माझें दूर। होईजे अज्ञानांध ॥२३॥
**हा** मी ब्रह्मराक्षस। नित्य करीं येथें वास।
कोणी न येती आसपास। करी ग्रास म्हणोनी ॥२४॥
**पो** ट माझें सदां रितें। खातां गजादि जीवातें।
कधीं न जाणें तृप्तीतें। आज मातें शांत केलें ॥२५॥
**ष** डरी नित्य खवळती। कधीं न ये स्वस्थ स्थिती।
ऐसी माझी दुर्गती। आज ती पालटली ॥२६॥
**य** त्न न होतां दर्शन। झालें मला दैवें जाण।
करीं माझें उद्धरण। बहु शीण पावलों ॥२७॥
**पो** र जेवीं मातेपुढें। आळ घेवोनी आड पडे।
तैसा मी हा तुझ्यापुढें। आड पडें मातोश्री ॥२८॥
**ष** डिंद्रियें मी पाहिलीं। क्षणमात्रही नावरलीं।
पापकर्में ग्यां केलीं। गती आली हे त्याची ॥२९॥

य ज्ञादिक नाहीं केलें । परी क्षेत्रवासपुण्य भलें ।
सहजची होतें घडलें । फल आलें तें आजी ॥३०॥
प रिसोनी त्याचें वचन । म्हणे अप्सरा करीं श्रवण ।
तूं म्हणसी मी कोण । अप्सरा जाण निश्चयें ॥३१॥
र हाणें माझें कैलासीं । मी असें उमेची दासी ।
पूजीं नित्य शिवासी । मकरार्क माघमासीं विशेष ॥३२॥
मं नाम कांचनमालिनी । प्रयागीं स्नान करूनी ।
आल्यें जात्यें शिवभवनीं । अर्चीं भवानीपतीला ॥३३॥
त्र यिमूर्तिच्या प्रसादें । सर्वत्र फिरें स्वच्छंदें ।
राहें नित्य परानंदें । नसे संदेह मच्चित्तीं ॥३४॥
प रम हा माघमास । सांप्रत चाले जो जनास ।
स्नानें तारी आणिकास । नसे खास हे शक्ती ॥३५॥
र विमंडलार्धोदयीं । स्नानाकरितां शीघ्र जायीं ।
त्रिवेणी जल न्हेयीं । शिवपायीं अभिषेकीं ॥३६॥
यं नामें पापी तरती । त्याची जडली मला भक्ती ।
तेणें सर्वही मानिती । पूर्वस्थिती ऐक माझी ॥३७॥
त्र पाहीन वेश्याजाती । तेथें माझी उत्पत्ती ।
रूप लावण्य संपत्ती । मीच होतीं कलिंगीं ॥३८॥
प राक्रमी कलिंगेश । तो भुलोनी झाला वश ।
त्याचे लुटिले सर्व कोश । केला दास त्याला मी ॥३९॥
र डती त्याच्या अंगना । त्यांला न घडवीं राजदर्शना ।
इतरांही धनिकजना । ठकवीं नाना प्रयत्नें ॥२४०॥

**तं** टा लावीं परस्परां । कपटें विश्वास दावीं जारां ।
असे सेवीं अनंत नरां । दुराचारा करूनी ॥४१॥

**त्रा** स न ये पापाचा । परिणाम हा अविचाराचा ।
मातेरा नरदेहाचा । केला भोगाचा ल्हावानें ॥४२॥

**णि** कींहिं जे समजती । परी तेही न उमजती ।
कामाची न करवे शांती । भोगासक्ती करूनी ॥४३॥

**छिं** न भिन्न करी यम । हें जाणें बुधस्तोम ।
त्यालाही नावरे काम । तेथें नाम काय माझें ॥४४॥

**धि** क्कारीं संतां महंतां । दुराचार नाणी चित्ता ।
मांस मद्य खातां पितां । तारुण्यसरिता आटली ॥४५॥

**छिं** न करी यम पाप्यांसी । हें देवें माघमासीं ।
माहात्म्य ऐकतां कर्णासी । झोंबलें मानसीं विरक्ती ये ॥४६॥

**धि** क्कारी हीन कुलासी । तेवीच जार भोगांसी ।
पुढें माझी गती कैसी । होईल ऐसी अनुतापें ॥४७॥

**ग्र** स्त होवूनी मोहग्रहें । केलें जें जें पाप हें ।
सांचविलें द्रव्य व्यर्थ हें । बरवा नोहे परिणाम ॥४८॥

**हान्** याय कीं अन्याय । न विचारीं अपाय उपाय ।
न धरिली बरवी सोय । आतां ह्रदय संतापे ॥४९॥

**नि** त्य मानीं भोग गोड । अविवेकीं हें चर्मकुंड ।
विकूनी पाप उदंड । केलें यमदंड भोगाया ॥२५०॥

**वा** सना दुष्ट धरूनी । दुष्टसंगती करूनी ।
पाप केलें हर्षूनी । भागी कोणी नसे त्याचा ॥५१॥

**र** डोनी ऐसी स्वकर्मासी । संतापूनी मानसीं ।
शरण जावूनी द्विजासी । निवेदी त्यासी सर्वही ॥५२॥
**य** मयातना टाळाया । जन्मारभ्य पाप तया ।
निवेदितां माझी दया । आली तया विप्रासी ॥५३॥
**नि** मेळ होसी म्हणे द्विज । सर्व सोडुनी दे आज ।
थोर तीर्थ प्रयागराज । तारील तूज निर्धारें ॥५४॥
**चा** रावया पापासी । शीघ्र जायीं प्रयागासी ।
क्षाळिसी सर्व पापासी । अनुतापासी पावतां ॥५५॥
**र** मणीय त्याचें वचन । निश्चयें अंगीकारून ।
गृह भूषा धन स्वजन । सर्व सोडून दिधलें ॥५६॥
**य** मयातना पुढें जाणूनी । पाप मनीं आणूनी ।
चित्तीं अनुतापूनी । विप्रा वंदुनी विनविलें ॥५७॥
**व्या** कूळ झालें माझें मन । करा त्याचें समाधान ।
प्रयागीं करिता माघस्नान । मत्समान तरे कीं ॥५८॥
**धीन्** धीन् थै थै करोनी । सर्व जन लुटोनी ।
पाप केलें त्याची धुणी । कराया मनीं स्थिरावें ॥५९॥
**वि** श्वास व्हावया चित्ता । सांग एक प्राचीन कथा ।
कोण पापी प्रयागीं न्हातां । तरला दुरितापासुनी ॥६०॥
**ना** नापरी विनवितां । विप्र वदे ऐक आतां ।
गती लाधली पुरुहूता । सर्व दुरिता वारुनी ॥६१॥
**श** ची ज्याची असे प्रिया । उर्वश्यादि वश्य जया ।
दुर्बुद्धी त्या देवराया । बरी न या दवडूनी ॥६२॥

य मादि योगसंपन्न । गौतमर्षी तपोधन ।
तत्पत्नी अहल्या जाण । तीवरी मन इंद्र करी ॥६३॥
वि वेक सोडुन स्वर्गाहुन । इंद्र आला भुलोन ।
गौतमस्वरूप धरून । कामुक होवुन पातला ॥६४॥
ना हीं गौतम जाणून । स्वयें गौतम बनून ।
अहल्येपासीं येवून । तीला फसवून उपभोगी ॥६५॥
श तक्रतू करोनी । देवाधिपत्य पावुनी ।
स्वर्गीं राहे तोची मनीं । हें घेवोनी बुडाला ॥६६॥
य ज्ञीं ज्याचा पूर्वभाग । तो करी ऐसें आग ।
तत्क्षणीं ये ऋषी सवेग । जाणोनी मग इंद्र भ्याला ॥६७॥
दुः खी होवूनी ये बाहेर । गौतमें जाणोनी सत्वर ।
शापिला कीं अंगावर । भगें सहस्र पडतील ॥६८॥
खं ती करी अहल्या ती । अज्ञानें हो दुर्मती ।
मुनी शापूनि शिला करिती । पुढें रामें ती उद्धरिली ॥६९॥
ह तदैव देवेश । भगें पडतां शरीरास ।
मेरुपर्वतीं गुहावास । करी त्रास पावून ॥२७०॥
र डे केल्या कर्मासी । धिक्कारी आपणासी ।
विरह झाला शचीसी । बृहस्पतीसी ती पुसतसे ॥७१॥
ह सोनी म्हणे बृहस्पती । चला दावूं देवपती ।
शची देवांसह येती । मेरुपर्वतीं तेधवां ॥७२॥
र डत बैसला देवेश । बृहस्पती दावी तयांस ।
लाजोनी इंद्र देहास । झांकोनी ठेवी ते क्षणीं ॥७३॥

**दा** टोनी शोकें गुरूला । इंद्र म्हणे तारा मला ।
पुनः न करीं ह्या कर्माला । अनुग्रह केला पाहिजे ॥७४॥

**रि** घतां शरण गुरूतें । दयेनें तो वदे त्यातें ।
जावूनी ब्रह्मक्षेत्रातें । तीर्थराजातें सेवीं तूं ॥७५॥

**द्रं** ममित धन दान । देतां होय मेरुसमान ।
खास ज्याला उपमान । न ये त्रिभुवनतीर्थाची ॥७६॥

**वि** विध पापें जो हरी । तेथें तूं स्नान करीं ।
हें ऐकूनी वृत्रारी । जावूनी करी मकरार्की स्नान ॥७७॥

**द्रा** क्पाप जावून । इंद्र झाला सहस्रनयन ।
तूं करीं त्रिवेणीस्नान । चित्तीं चिंतून शंकरा ॥७८॥

**व** चन ऐसें विप्राचें । परिसोनी मनाचें ।
स्थैर्य करोनी प्रयागाचें । केलें त्याचें दर्शन ॥७९॥

**य** त्स्नान तीन दिन । करितां पाप जावून ।
शेष मासस्नानें जाण । अप्सरापण मज आल्यें ॥२८०॥

**वि** दुषी होवुनी कैलासीं । राहें गौरीहरापासीं ।
अद्यापी माघमासीं । प्रतिवर्षी स्नान करीं ॥८१॥

**द्रा** क्तारिलें हा उपकार । स्मरोनी कराया दूर ।
कृतघ्नत्वा सादर । ऐसा निर्धार केला म्यां ॥८२॥

**व** चन तीचें परिसूनी । राक्षस वदे नमूनी ।
पूर्वजन्म आठवूनी । खिन्न होवुनी निवेदीं मी ॥८३॥

**य** न्नामाचें स्मरण । करी पाप निवारण ।
त्या काशींत जन्मून । श्रेष्ठ ब्राह्मण मी होतों ॥८४॥

**दे** वर्षिपित्रर्चन । न घडलें विप्रतर्पण
न केलें इष्टापूर्तदान । न केलें स्नान गंगेचें ॥८५॥
**हं** सजप किंवा ध्यान । न केलें घेतलें दान ।
दुष्टापासून अनुदिन । ब्रह्मस्व हिरोन घेतलें ॥८६॥
**पो** ट भरीं अभक्ष्यभक्षणें । सत्यवार्ता कधीं नेणें ।
सर्व पापें पूर्णपणें । देती ठाणें माझ्याठायीं ॥८७॥
**ष** डिंद्रियें नावरलीं । थोरांची बोली नायकिली ।
काशीक्षेत्रीं मृती आली । दैवें झाली दुर्दशा ॥८८॥
**य** न्नाम अविमुक्त । जेथें सर्व होती मुक्त ।
तेथें होतां पापसक्त । भैरव युक्त दंडी त्याला ॥८९॥
**पो** ञ्चतां अन्यत्र मरण । त्याला यमयातना दारुण ।
काशींत मरतां जाण । भैरवशासन क्षेत्रपाप्या ॥९०॥
**ष** ट्शास्त्रीं असोनि निपुण । क्षेत्रीं केलें पापाचरण ।
म्हणोनीं विश्वेश्वरें जाण । भैरवशासन योजिलें ॥९१॥
**य** च्छासनें नवू योनी । प्रेतभूतादि भोगूनी ।
दाहावें जन्म ये स्थानीं । राक्षसयोनी मिळाली ॥९२॥
**चित्** तीं नसे सुखलेश । भोगीतसें दारुण क्लेश ।
माझे दृढकर्मपाश । मोक्षीं निराश होतों मी ॥९३॥
**तं** टा करोनी ब्राह्मण । जिंकीं विद्यामदें जाण ।
त्याचें फळ हें दारुण । राक्षसपण शेवटीं ॥९४॥
**तो** क्षेत्रवास केवळ । झाला आतांची सफळ ।
पदरीं तेंची पुण्यबळ । दर्शनें कळतसे तुझ्या ॥९५॥

**ष** ष्ठीसहस्र संवत्सर । या जन्मास झाले फार ।
कष्ट भोगिले आतां तार । मातें सत्वर दयेनें ॥९६॥

**य** थार्थ सर्व सांगून । ब्रह्मराक्षस नमून ।
आड पडला तें पाहुन । वळली कांचनमालिनी ॥९७॥

**तो** जरीं महापाप । त्याला कराया विपाप ।
ती दयेनें आपोआप । त्याचे ताप निवारी ॥९८॥

**ष** ष्ठीसहस्र वर्षें तूं रे । पाप भोगिलें येथें रे ।
नवू जन्मीं तसें सारें । कर्म बरें क्षाळिलें ॥९९॥

**य** मयातना जरीं होत्या । चौऱ्याऐंशीं लक्ष धिरव्या ।
कदापीही न चुकत्या । क्षेत्रवासें त्या वारिल्या ॥३००॥

**सर्** वतीर्थामध्यें थोर । गंगा तीहुनी काशीनगर ।
जेथें तारी विश्वेश्वर । हा निर्धार सत्यची ॥ १ ॥

**व** से ताराया ह्या लोकांला । संगें अन्नपूर्णेला ।
घेवोनी परिवाराला । म्हणती ज्याला विश्वेश ॥ २ ॥

**मं** त्र तारक कानीं । सांगे मरतांची प्राणी ।
नेयी त्याला उद्धरोनी । तो भवानीनायक ॥ ३ ॥

**त्र** यमूर्ति पाप्यास । उपदेशें तारी खास ।
करोनी जे क्षेत्रवास । करिती खास पातकें ॥ ४ ॥

**स्व** यें भैरवाकरवीं । त्यांला यातना भोगवी ।
भोगें पातक संपवी । मग दे पदवी तयाला ॥ ५ ॥

**रू** द्रयोगा दे सायुज्य । अन्य धन्या करी पूज्य ।
कैलासीं ने तेथें प्राज्य । सौख्य होय निश्चित ॥ ६ ॥

पा प काशीमध्यें ज्याणें । केलें त्याला हें भोगणें ।
कल्पित योनी भोगूनी त्याणें । मोक्ष घेणें निश्चित ॥ ७ ॥
य मदूत जेथ न येती । भैरव यातना देती ।
परी अंतीं गती ये ती । क्षेत्रमृती असी असे ॥ ८ ॥
सर् व पाप जातां तूझें । दर्शन हें झालें माझें ।
आतां कष्ट तुझे विझे । देतें माझें थोडें पुण्य ॥ ९ ॥
व सोनी मी कैलासीं । प्रतिवर्षीं माघमासीं ।
करीं स्नान प्रयागासी । पुण्यराशी जोडिले असे ॥१०॥
यं नाम तीर्थराज । स्नानें क्षाळी पापपुंज ।
जेणें तारिलें मज । करविलें अजदर्शन ॥११॥
त्र यमूर्ती तो माझा देव । पुरवो भक्ताचा भाव ।
निजपदीं देयी ठाव । तो हा तव तारक ॥१२॥
स्व रूप चिंतुनी त्याचें । एक माघस्नानाचें ।
फळ देयीं तुला साचें । सद्गतीचें दायक जें ॥१३॥
रू प शिवाचें चिंतून । अप्सरा ती हर्षून ।
पिळूनी आर्द्रवसन । करीं जीवन घेतसे ॥१४॥
पा णी हातीं घेवून । म्हणे एक माघपुण्य ।
तुला म्यां दिल्हें दान । म्हणोनी जीवन सोडिलें ॥१५॥
य द्रूप अति कराल । होतें परंतू तीणें जळ ।
सोडितां तो तत्काळ । शोभे विमल राक्षस ॥१६॥
सर् व क्रूरभाव त्याचे । पालटोनी शांततेचें ।
पात्र झाला तो हें पुण्याचें । फळ वाचे न वर्णवे ॥१७॥

**व** दे वंदूनी अप्सरेला। माये उद्धरिलें मला।
न विसरें उपकाराला। प्रत्युपकाराला काय देवूं ॥१८॥

**तं** त्र मंत्रादि साधन। संतांपुढें जाती लपोन।
ज्यावरी करिती नयन। तो पावन होतसे ॥१९॥

**त्र** यी धर्मादि साधनें। फलद होती कालानें।
तत्काल संतदर्शनें। फल दानें देतात ॥२०॥

**स्व** यें तरोनी तारिती। संतांच्या ह्या विभूती।
लोककल्याणार्थ वांचती। ज्या फळती नमस्कारें ॥२१॥

**रू** प संतांचें अलौकिक। वसे जेथें नित्य विवेक।
त्यांपुढें बापुडें पातक। शोक धाक कायसे ॥२२॥

**पा** पी मी हो महाक्रूर। माझा केला त्वां उद्धार।
तुला प्रसन्न शंकर। असो धरसुताही ॥२३॥

**य** त्प्रसादें तूं धन्य। असती लोकमान्या।
तो ताराया अन्या। करो वदान्या नित्य तुला ॥२४॥

**सर्** वत्र जें दिसे मज। अनित्य वाटे तें आज।
आतां मातें ज्ञान पाज। अन्य काज न उरलें ॥२५॥

**व** दें निश्चय करून। इहपर भोग साधन।
तें मानी श्ववमन। विटे मन तेथें आतां ॥२६॥

**पल्** लवूनी वदूं किती। त्वद्दर्शनें शांति दांती।
समाधान उपरती। लाधली क्षांती पूर्णत्वें ॥२७॥

**ल** क्ष्य लावूनी श्रद्धायुक्त। उपदेश श्रवणीं सक्त।
झालों आतां करीं व्यक्त। प्रबोध मुक्त करी जो ॥२८॥

**च** सें दैवें कोठेंतरीं । पुनः ऐसें न करीं ।
ऐसा धर्म सुंदरी । सांगें वारी जो आवृत्ती ॥२९॥
**स्व** भाव जाणूनी त्याचा । मग अप्सरा बोले वाचा ।
हा देह देवयोनीचा । झाला साचा तुझा रे ॥३०॥
**रू** पें देव तूं खास । नरधर्मीं नहो वास ।
नर जे दैवी संपत्तीस । धरिती त्यास मोक्ष ये ॥३१॥
**पा** वले देव जयासी । स्वसंपत्तीनें दैत्यांसी ।
आसुरी संपत्ती ग्रासी । मोक्ष त्यासी दुर्लभ ॥३२॥
**य** मेंद्राश्विवरुणादि । पद पावले अनादि ।
तूंही जावया त्या पदीं । वागीं मदीयोक्तधर्में ॥३३॥
**ॐ** कारवाच्य जो देव । त्याच्या पदीं ठेवीं भाव ।
त्याला समर्पूनी सर्व । वायां गर्व न करीं ॥३४॥
**न** म्र होई सर्व भूतां । दैवी संपत्ती तत्वता ।
राखें शोधीं निजचित्ता । ब्रह्मसत्ता लक्ष्यीं धरीं ॥३५॥
**मो** चन करीं हिंसेला । न वदें परदोषाला ।
सद्वृतीमतीनें मनाला । आवरी कामाला वारूनी ॥३६॥
**म** हादेवा भजें नित्य । दृश्य हें पाहें असत्य ।
प्रवाहपतितकृत्य । करीं अहंता सोडुनी ॥३७॥
**हा** ची तुला उपदेश । चिदन्वयें देखें विश्वास ।
जीवन्मुक्ति दशेस । जासी खास समत्वें ॥३८॥
**सि** द्धीलागीं न भुलता । असा नित्य वागतां ।
जीवन्मुक्ती तत्वतां । मिळोनी विदेहता मिळेल ॥३९॥

धा म लाधलें त्याला खास । विमान आलें सूर्यसंकाश ।
राक्षस वंदूनी तीस । गेला स्वर्गास पुण्य भोगूं ॥४०॥

य त्नाविना मुक्ति देवुनी । अप्सरा गेली शिवभुवनीं ।
अर्जुना म्हणे श्रीदत्तमुनी । माघस्नानीं फळ हें ॥४१॥

स्वा शय हा ठेवुनी । जनांला फल दावुनी ।
वेद तारी असें ऐकुनी । अर्जुन मनीं आनंदला ॥४२॥

हा श्रीदत्तार्जुन संवाद । माघमाहात्म्यमिषें विषद ।
हो हा हरी जीवात्म भेद । अखेर पद दे ध्रुव ॥४३॥

श्रीगोविंदकृपापूर्णा वासुदेवसरस्वती । मृगार्के नर्मदातीरे तीर्थराज इवोद्गता ॥ १ ॥

इति श्रीदत्तात्रेयाऽर्जुनसंवादे मकरार्कमाघमाहात्म्यं संपूर्णं ॥
श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# स्त्रीशिक्षा

## प्रकरण १ लें

कोणी एक मुलगी प्रियविरहानें दुःखित होऊन गुरूला शरण येऊन प्रश्न करिते; अशी कल्पना करून, सुखबोधाकरितां व आत्मविद्या केवळ ईश्वरस्वरूपी प्रसादानेंच मिळणारी आहे, असें कळविण्यासाठीं हा **स्त्रीशिक्षा** नांवाचा सुलभ ग्रंथ रचिला आहे.

**मुलगी**-गुरुमाउली ! मी तुमच्या चरणांला शरण आलें. पराधीनपणानें घरधंद्यांत गुंग होऊन गेल्यामुळें स्वप्नामध्यें सुद्धां सुखाची वार्ताही मिळाली नाहीं व सासुरवासाचा जाच सोसून दिवस कसेतरी लोटीत असतां प्रियवियोग झाला. ज्यापासून पुढें परमानंद होईल असा भरंवसा होता, तेंही मूळ खुंटलें. अशा दुर्दैवानें प्राप्त झालेल्या तापत्रयानें पोळून हुकूहुकू प्राण धरून राहिल्याचें आज सार्थक झालें. आतां हे पाय अपाय दूर करितीलच; असें म्हणून गुरुचरणीं लीन झाली. तेव्हां तिला आश्वासन देऊन गुरु म्हणतात—हे वत्से, तूं कोण ! व तुला परमानंद देणारा, विरहित झालेला तुझा प्रिय कोण ! हें सांग बरें आधीं !

**मुलगी**—( काळजावर हात ठेवून ) **ही मी** काश्यपगोत्रोत्पन्न देवदत्त ब्राह्मणाची मुलगी. विष्णुदत्त नांवाचा माझा जिवलग मला दुःखसमुद्रांत लोटून गेला. हाय ! हाय ! हे दुर्दैवा ! गुरुजी, त्यांची आठवण होण्याबरोबर कसेंसेंच होतें. काय करूं ?

**गुरुजी**—ऐक, उगीच त्रास करून कां घेतेस ? माझ्या वचनाकडे लक्ष दे.

**मुलगी**—बरें.

**गुरुजी**—तूं तर हृदयावर हात ठेवून ही मी असें म्हणतेस तेंच आत्मप्राप्तीचें स्थान व तेंच तुझें स्वरूप तुला समजलें; पण उमजलें नाहीं.

**मुलगी**—तें कसें ?

**गुरुजी**—**ही मी** म्हणतेवेळीं तूं डोळ्यांवर किंवा मस्तकादिकांवर हात न धरितां आत्मप्राप्तीस्थानावर ( हृदयावर ) च हात ठेविलास, तर "सर्व भूतांच्या हृदयांमध्यें ईश्वर राहतो" इत्यादि प्रमाणानें तें ईश्वरस्थान होय व जो जीवात्मा तोच ईश्वर असें शास्त्रप्रतीतीनें, गुरुप्रतीतीनें व आत्मप्रतीतीनें तुला उमजतें, तर मग शोक व मोह कसा राहता ? राहिला नसता. तेव्हां तुला जडाचा व चेतनाचा विवेक नाहीं म्हणून ज्या जडावर नाम, रूप, कुल, गोत्र, जाति व लिंग अशी कल्पना केली, त्या देहाला मी व माझा म्हणून बसलीस. आत्मा तर नाम-रूप-कुल-गोत्र-वर्णाश्रम-जाति-संबंधरहित असून एकच निर्विकार आहे.

**मुलगी**—जडाचें व चेतनाचें स्वरूप काय ?

**गुरुजी**—जें आपणांस व परास जाणत नाहीं तेंच जड व आपणांस आणि इतरांस जाणतें तें स्वयंप्रकाश चेतन होय. हेंच निर्विकारकूटस्थसाक्षिचैतन्यप्रत्यगात्म्याचें स्वरूप अज व अजरामर होय.

**मुलगी**—गुरुजी मग मी खोटसाळ काय सांगितलें ! पहा—

**उद्वेजयति सूक्ष्मोऽपि चरणं कंटकांकुरः**

जर कांटा पायांस टोंचला, तर मस्तकापर्यंत तिडक मारते व नाकावर बसलेली माशी सुद्धां ज्याला खपत नाहीं तो देह जड कसा ?

**गुरुजी**—हाच तुझा व्यामोह—विपरीत ज्ञान—होय. पहा ! जर देह चेतन असता तर पाहिजे तिकडून पाहता व ऐकता; मग कान, डोळे इत्यादि इंद्रियसामुग्रीची गरज लागलीच नसती, परंतु तसें होत नाहीं. अहंकाराचा आत्म्याशीं तादात्म्याध्यास (एकाकार) झाल्यानंतर अहंकार आपाद-तलमस्तक व्यापून राहतो, तेव्हां जागृदवस्था होते. त्यावेळीं देह जड असतांही अजडासारखा भासतो व अर्धा अहंकार विकास झाल्यावर स्वप्नावस्था होते व सगळा अहंकार लीन झाला म्हणजे निद्रावस्था होते. तेव्हां सर्व लोक-व्यवहार नाहींसे होतात.

**यात्यस्तं तत्र लोकव्यवहृतिरखिला पुण्यपापानुबंधः**
**शोको मोहो भयं वा समविषममिदं न स्मरत्येव किंचित् ॥**

असें आहे तेव्हां देह चेतन कसा ? दुसरें हें कीं, चेतनास जन्ममरण नाहीं. देहावर तर जन्ममरणादि सहा विकारांची उघड धाड पडली आहे. हा पांचभौतिक ( पंचीकृतपंचभूतांचा ) पिंड अन्नमय कोश होय. ह्याच्या द्वारा बरीं वाईट कर्में घडतात. जीवा-त्म्याला पूर्वीं असाच देह होता, म्हणून बरें वाईट कर्म घडलें, त्या-मुळेंच हा देह घ्यावा लागला. आतांही ह्याच डोळ्यांनीं मुक्तीचा

सोहळा पाहण्यास न मिळाला तर जुनें वस्त्र टाकून नवें वस्त्र घेतात, त्या न्यायानें तत्त्वज्ञानानें मोक्ष होई पावेतों पुनः पुनः असेंच घडेल. हें न पत्करलें तर अकृताभ्यागम[1], व कृतप्रणाश[2] या दोषांचा प्रसंग येईल. तेव्हां आईबापांनीं खाल्लेल्या अन्नाच्या रक्तरेतोरूपी परिणामानें हा भौतिक अन्नमय देह कर्मयोगानें बनून पुढें अन्नानेंच वाढला. अतएव हा जड विकारी असून दृश्य आहे. जो ज्याला पाहतो, तो त्याहून निराळाच असतो; ह्या न्यायानें देह आपणांस दिसतो तेव्हां तो आपल्याहून निराळाच जाणावा व जें दृश्य तें जड असा वेदांतसिद्धांत आहे.

**मुलगी**—केवळ वेदांतसिद्धांत ऐकून उगी रहावें काय?

**गुरुजी**—असें पहा! हा आपला व दुसऱ्याचा देह आई-बापाच्या रक्तरेतानें उत्पन्न झाला. जसें पाण्याचें आधण ठेवून वर दाथर घालून मोदक उकडतात, त्याप्रमाणें आईच्या मुताचें आधण, विष्ठा दाथर व वारीचें वेष्टणरूप पात्रांत मोदकाप्रमाणें रेतरक्त कढून हा देह होतो. हाडें, स्नायु व मज्जा हीं पित्याच्या रेतानें होतात; व त्वचा, मांस, रक्त आईच्या रक्तानें होतात. असा हा कफवात-पित्तधातुबद्ध, मळमूत्रश्लेष्मपूर्ण देह नऊ महिन्यांनीं अनुक्रमें करून रजस्वलेच्या विटाळांत बनतो. सहा महिन्यांच्या आंत जर पडला, तर केवळ मांसाच्या गोळ्यासारखा असतो; हालचाल नसते. सातव्या महिन्यांत टाळु भेदून ईश्वरानुग्रहरूपी अनुप्रवेश होतो, तेव्हां हालचाल समजते. उपजल्यावरही कांहीं काळपर्यंत पहिल्यापेक्षां

---

१ कांहीं न करितां परिणाम होणें. २ केलेल्याचा नाश होणें.

नवीन जन्मलेली टाळू खोल असून मऊ असते. हा गर्भांत अनु-प्रवेश झाल्यावर मागचीं सर्व कर्मे आठवून दुःखी होत्साता प्रार्थना करितो हे ईश्वरा, दत्तात्रेया, माझ्या कर्मयोगानें मला नरकवासा-पेक्षांही घोर गर्भवासरूपी नरकवास दाखविलास. पुरे! पुरे! आतां मी तुला शरण येतों. एकदां येथून सुटका कर म्हणजे मग मी सोऽहं असें तुझें अभेदानें भजन करून मुक्ती घेईन. अशी नित्य प्रार्थना करून बेंबीच्या नाळयाच्या द्वारानें आईनें खाल्लेल्या अन्नरसाचा द्रव मिळतो तेवढ्यावर वांचून पिंजऱ्यांतल्या पक्ष्याप्रमाणें आंतल्याआंत घुसमटतो. नंतर दहावे मासीं आईला मरणप्राय दुःख देऊन व्रणांतून किडा पडल्याप्रमाणें योनिद्वारा सूतिवायूच्या वेगानें मेल्यासारखा बाहेर पडतो. कदाचित् आडवा आलाच तर कापून काढण्याचाही प्रसंग येतो, असल्या जन्माचा कायसा उत्सव! पुढें बाहेर पडतांच पूर्वीचें ( सोऽहं ) विसरून ( कोऽहं कोऽहं ) करूं लागतो. जसजसा वाढेल तसतसा पूर्वीच्या भजनाचा करार एकीकडे ठेवून बालपण खेळांत घालवितो. ज्या खाण्यापिण्याचें मळमूत्र होतें, त्यावर तात्पर्य[1] ठेवून त्या खाण्याकरितां मरीं मरून सदोदित खाऊनपिऊन विषय कर्दमात लोळून तारुण्याचा मातेरा करून टाकितो. जरी जारकर्मानें यमयातनानरक भोगून वारंवार श्वान, सूकर, खरादि[2] योनी पुनः पुनः भोगाव्या लागतात असें कदाचित् कथापुराणप्रसंगानें कानावर आलें तरी अंः करून विवेक न करितां पाहिजे तसे भोग भोगून जीव-देहतादात्म्यानें यौवन-

---

१ अत्यासक्त ठेवून. २ गर्दभादि.

सरिता आटवून टाकितो. मग सरल्यावर साचूं, पडल्यावर वेंचूं म्हणण्यासारिखी वृद्धावस्था आल्यावर शेंबडांत माशी अडकल्याप्रमाणें पोरांबाळांच्या चिंतनेनें व्यापून डोळ्यांनीं दिसत नाहीं, कानांनीं ऐकूं येत नाहीं, पायांनीं चालतां येत नाहीं अशी अवस्था प्राप्त झाली तरी व ज्यांच्याकरितां देह झिजविला, त्यांजकडून पदोपदीं अपमान होत असतांही माझें बरें व्हावें असें चिंतन करीत शेवटीं हजार विंचू डसल्यासारखी चिरकाल वेदना भोगून मोठ्या कष्टानें मरतो. जातेवेळीं घातपात करून मिळविलेल्या धनादिकांपैकीं एक कवडी सुद्धां बरोबर येत नाहीं. बरें वाईट केलेलें कर्म मात्र पाठीशीं लागतें. जिकडे जाईल तिकडे तेंच पाठलाग करून अवश्य फळ भोगवितें. हें जरी ब्रह्मदेवाच्या पाठीं राहिला तरी चुकणार नाहीं. याप्रमाणें जीव देहाहून निराळा आहे, जीवानें देह सोडला म्हणजे त्या देहास मरण येतें. जीव मरतच नाहीं. तो आजन्म अजरामर आहे. जो जिवलग देह पूर्वी अत्यंत प्रीतिपात्र असतो, तोच निर्जीव झाला म्हणजे अत्यंत अमंगळ होऊन भयंकर दिसतो. पाहाणाऱ्यांस सुद्धां वीट येतो व जीवदशेमध्यें छीः थुः म्हटलेलें सुद्धां खपत नाहीं, नाकावर बसलेली माशी तोलत नाहीं त्याचें तोंडाडोळ्यांत माशांचा गुंजला ( घोळका ) होऊन घोंघोंवला तरी पत्ता लागत नाहीं. जिवंतपणीं जरा आंगास विस्तव झळकल्यावर “ अरे बा-बा-बा, हाय हाय ” करितो, तोच घट्ट बांधून मसणांत नेऊन जाळला तर हाय हाय करतो काय ? नाहीं. नाहीं. मग वेदांत-सिद्धांत खोटा काय ?

**मुलगी**—बरें, असो. ब्रह्मदेवानें आमचे कपाळीं स्त्रीपणा घातला तर आम्हीं पुनः पुनः स्त्रीजन्म घेऊन चुलकोंबड्याच बनून असावयाचें. पुरुषांनीं मात्र पुरुषार्थ मिळवायचा असेंच ना ?

**गुरुजी**—छीः छीः मी त्या अभिप्रायानें नाहीं बोललों. जीवाला पुरुषत्व, स्त्रीत्व व नपुंसकत्व मुळींच नाहीं. जसें पूर्वार्जित असेल, तसा देह मिळतो; त्यायोगानें स्त्रीपुन्नपुंसकत्व येतें. अधिष्ठानभूत चैतन्य व पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच प्राण व मन, बुद्धि, चित्त, अहंकार हें अंतःकरणचतुष्टय मिळून एकोणीस अवयवांचा एक लिंगदेह व त्या लिंगदेहामध्यें पडलेली चैतन्याची छाया मिळून जीव म्हटला जातो. त्याला लिंग ( स्त्रीपुन्नपुंसकादिक ) नाहीं. असें पहा ! स्त्री मेली तर तिचा जीव गेला असा पुल्लिंगीच प्रयोग होतो. तेव्हां जी स्त्री ती स्त्रीच राहील असें नाहीं. एखाद्यास भाग्यानें संन्यास घडला तर—

**पुंजन्म लभते माता पत्नी च प्रैषमात्रतः**

त्यानें प्रैषमात्र[1] केल्यानें त्याच्या मातेला व पत्नीला पुढें पुंजन्म मिळतो व पुरुष असोन स्त्रीवेष घेतला तर पुढें त्याला स्त्रीजन्म मिळतो. अशीं अनेक कारणें लिंग पालटण्याचीं आहेत. तुम्हांला स्त्रीजन्माचीच आवड असते असा तुमचा मूढपणा जागोजाग वर्णन करितात. पुष्पदंतानें—

**स्वलावण्याशंसाधृतधनुषमन्हाय तृणवत्पुरः प्लुष्टं दृष्ट्वा पुरमथन पुष्पायुधमपि ।। यदि स्त्रैणं देवी यमनिरत दे-हार्धघटनादवैति त्वामद्धा बत वरद मुग्धा युवतयः ।।१।।**

---

१ प्रणवाचा उच्चार.

असें पार्वतीला सुद्धां दूषण दिलेलें आहे.

**अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभता ॥**
**अशुचित्वं निर्दयत्वं स्त्रीणां दोषाः स्वभावजाः**

**आवर्तः संशयानामविनयभवनं पत्तनं साहसानां दोषाणां सन्निधानं कपटशतमयं क्षेत्रमप्रत्ययानाम् ॥ स्वर्गद्वारस्य विघ्नं नरकपुरमुखं सर्वमायाकरंडं स्त्रीयंत्रं केन सृष्टं विषममृतमयं प्राणिनां मोहपाशम् ॥**

इत्यादि भर्तृहरिप्रमुखांनीं दोष दिलेले आहेत व वेदांत उर्वशीचें वाक्य असें आहे कीं, ' स्त्रिया म्हणजे जीवंत प्राण्यांस खाणाऱ्या लांडग्यांचीं काळजें होत. ' थोड्यासाठीं खोटें बोलण्यास तुम्ही मागेंपुढें पाहणार नाहीं. जरा सासू वगैरे कोणी विरुद्ध बोलूं लागलें तर कुडच्यांत पाणी घेऊन जीव देण्यासाठीं पदर खोंचतात. यापुढें साहस तें काय वाखाणायचें ? पहा ! तुमचा केवढा अधिकार आहे ! तुमच्याच योगानें पुरुषाचे धर्म, अर्थ व काम सिद्ध होणारें आहेत. पंचमहायज्ञादि गृहस्थाश्रमधर्म तुमच्याच योगानें घडतात. पुरुषानें केलेल्या धर्मापैकीं अर्धा धर्म अचूक तुमच्या पदरीं पडतो. पुरुष महाप्रयासानें शास्त्री किंवा मामलेदार झाला म्हणजे बिन-खटपटीशिवाय शास्त्रीण किंवा मामलेदारीण असे किताब तुम्हांला तेव्हांच मिळतात. तुम्ही आमच्या मायबहिणी आहां, तुमचे हात आमच्या पोटांत जातात.

**यथा मातरमासाद्य सर्वे जीवंति जंतवः ॥**

जशीं मुलें भूक लागली म्हणजे बापुडवाणीं होऊन आईकडे

जाऊन हात पसरतात, त्याप्रमाणें ब्रह्मचारी, संन्यासी वगैरे सर्वांना मायबहिणी तुम्हींच हात उचलून देणार आहांत. मग तुमची आम्ही प्रतारणा, निंदा करूं काय? नाहीं. तर तुमचा दुर्गुण जावा या इच्छेनें अधिक उणें बोललों तरी तें मनांत आणूं नका. तुम्हांला स्त्रीजन्माची आवड असते असें म्हटलें तें पहा! व्रत व दान करिते वेळीं '**मम इह जन्मनि जन्मांतरे चाखंडसौभाग्य-पुत्रपौत्रादिकल्पोक्तफलावाप्तये**' असा संकल्प केलाच पाहिजे व ह्यांत उपाध्येबुवांनीं कमी केलें तर त्याला दोन पैसे मिळण्याची अडचण पडेल. तेव्हां '**इह जन्मनि जन्मांतरे च**' ह्या जन्मांत जसा कित्येकांस कोलनांचा मार मिळतो असाच जन्मजन्मांतरीं मिळावा असेंच तुमचें मनोगत असतें ना?

**मुलगी**—तर व्रतें, दानें वगैरे आम्हीं करूं नये काय?

**गुरुजी**—वाहवा. बरीच बुद्धी वाहते. अग पुरुष तर व्रतें, दानें, वायनें, कार्तिकादिस्नानें ह्यांची वार्ता सुद्धां करीत नाहींत. पण तुम्ही करीत असतां तुम्हाला बहुधा अडथळा करीत नाहींत. हा एक त्यांचा तुमच्यावर मोठा आभार आहे. म्हणून तुमच्या द्वारानें व्रतोपवासादि निमित्तानें बिचाऱ्या उपाध्येबुवांस दोन पैसे मिळतात ते बंद झाले म्हणजे त्या बिचाऱ्याच्या तोंडास पानें पुसल्यासारखें होईल. तर तसें न घडावें एवढयाचकरितां व्रतोपवासदानादिक करावें. यज्ञ-दान-तप हें जसें पुरुषाला ज्ञानसाधनत्वें करून सांगितलें, तशींच व्रतादिक तुम्हांला सांगितलीं. स्त्रियांला पृथक् यज्ञ करण्याचा अधिकार नाहीं. पतीच्या आज्ञेनें व्रत, पूजा करणें हाच

तुमचा यज्ञ व कल्पोक्त दानें, आणि तप म्हणजे **स्वधर्माचरण,** हीं तुम्हीं अवश्य करावीं. **इहजन्मनि जन्मांतरे च** इत्यादि लांबलचक संकल्पाची गरज नाहीं; ( ईश्वरप्रीत्यर्थ ) एवढाच संकल्प करून हें मी करतें असा अहंपणा व फलोद्देश हे टाकून करावीं. जसें पुरुषाला **ममोपात्तदुरितक्षयद्वारा** असा संकल्प करून दिवसाचें पाप रात्रीं व रात्रीं केलेलें पाप दिवसाचे आरंभीं दूर करण्याचें संध्यावंदनादिक साधन आहे तसें तुम्हांला नाहीं. तेव्हां व्रतदानादिकच सांगितल्या-प्रमाणें केलीं तर चित्तशुद्धि होऊन मोक्षही ईश्वरप्रसादानें मिळेल.

तुमचा जन्म होण्याबरोबर दोन वर्षें चंद्र उपभोग घेतो व दोन वर्षें गंधर्व उपभोग घेतो नंतर विवाह होईपर्यंत अग्नी उपभोग घेतो. हें शास्त्रप्रमाणानें व दैवी दृष्टीनेंच कळेल. देवांनीं उपभोग घेतलेल्या स्त्रिया **सोमाद्युपभुक्तदोषपरि-हारार्थं** असा संकल्प करून वधूवस्त्रदान देऊन स्वीकार करण्यास दोष नाहीं. स्त्रियांना उपनयनस्थानीं विवाह आहे. विवा-हानंतर भर्त्याबरोबर वेदमंत्रानें वैदिक कर्म करण्यास व यज्ञांग-स्वकीय मंत्र म्हणण्यास अधिकार येतो. त्याशिवाय वेदमंत्र ऐकण्या-चासुद्धां अधिकार नाहीं. अतएव वेदमंत्र पुरुषांचे ऐकून म्हटले तर आर्षद्रव्यचोरीचा दोष येतो. व्रतपूजादिकांकरितां ब्राह्मणांनीं पौरा-णिक मंत्र म्हणावे आणि स्त्रियांनीं पूजनादिक करावें. जन्मापासून आईबापांचे ताब्यांत राहावें व तेथें घरचेघरांत अक्षरओळखीपुरतें लिहिणें करावें; न केलें तरी चालेल. पण शाळाशिक्षण घेऊन पुढें आपण लिहिणें वगैरे करून बसून रहावें व नवऱ्यानें ओलीं धुवावीं

काय ? हा अशास्त्रीय प्रकार कुलीन स्त्रियांला नसावा. विवाह झाल्यानंतर सासुसासऱ्यांच्या ताब्यांत राहून ब्रह्मचर्य करावें; हाच गुरु-कुल-वास गर्भाधानापर्यंत सांगितला आहे. लाजाहोम करिते वेळीं 'सासरा, सासू, नणदा, भावेदीर यांच्या ठायीं सम्राज्ञी हो म्हणजे मर्यादा धरून सौजन्यपणानें वाग. तोंडाळ होऊं नकोस.' अशा अर्थाच्या वेदमंत्रानें होम होतो, करितां तसें वागावें. (मग नवऱ्याबरोबर तेरीमेरी करण्यास हरकत नाहीं असें म्हणूं नये. कारण 'प्रतिवादाच्छुनी भर्तुः' नवऱ्याबरोबर भांडणारी कुत्री होते, भालू होऊन भुंकते, असें अनिष्ट फल आहे.) भूमीवर दणदणून चालणें, उच्चासनीं वेमर्यादेनें बसणें इत्यादि सच्छिक्षणा-करितां सासूनें गांजलें तरी सर्व सोसून ब्रह्मचर्यानें रहावें. नंतर ऋतु आल्यावर नवऱ्याचे ताब्यात रहावें.

इंद्रस्य ब्रह्महत्यास्ति यस्मिन् तस्मिन्दिनत्रये ॥
प्रथमेऽहनि चांडाली द्वितीये ब्रम्हघातिनी ॥
तृतीये रजकी प्रोक्ता चतुर्थेऽहनि शुध्यति ॥

असा रजोदोष दुष्ट आहे, तो होतांच बाहेर राहून श्वश्रूशिक्षणा-प्रमाणें वागावें. जर तो चोरला तर कुत्रीचा जन्म मिळतो व सांसर्गिक लोकांना पशुयोनी प्राप्त होते. म्हणून सर्वथा विटाळ चोरूं नये. पतिव्रताधर्म स्वीकारून छायेप्रमाणें पतीशीं अनुकूल वागावें. कुबुद्धीनें परपुरुषावर दृष्टी करूं नये. जर दुष्टबुद्धीनें जारकर्म घडलें तर

पुंसो यत्पारदारेषु स्त्रीणामपि तदेव हि ॥

जें पुरुषांना प्रायश्चित्त तेंच स्त्रियांना सांगितलें आहे. तें जर न

केलें तर यमलोकीं तप्तलोहस्तंभालिंगन व शुनी, वाराहगार्दभादि योनि प्राप्त होईल; मग मोक्षाची वार्ताच नको. तेव्हां हुशारीनें राहून वाईट मार्गावर पाऊलसुद्धां न पडेल असें वागा. विवाहानंतर सोवळ्यानेंच जेवावें. कच्छरहित राहूं नये. विवाहसमयीं कच्छरहित संस्कार करितात तो अशास्त्रीय आहे. आतां येथें पतिव्रताधर्म सांगितले तर उगीच ग्रंथ वाढेल. तो धर्म काशीखंडीं व श्रीगुरुचरित्रांत सांगितला आहे तो ब्राह्मणद्वारा ऐकावा. वाचतां आलें तरी स्वतः गुरुचरित्र वाचूं नये. गर्भिणी झाल्यावर अगर्हितान्न-भक्षणादि नियमानें गर्भपोषण करावें. प्रसुति झाल्यानंतरसुद्धां पुत्रांना बाधा होईल असें खाणेंपिणें, वागणें करूं नये. स्त्रियांना पति, देवता होय. जशी शालिग्रामावर विष्णुबुद्धि ठेवण्याची तशी पतीचे ठायीं ‘पतिउपाधिक ब्रह्म आहे’ अशी दृष्टी ठेवावी. कर्मवशात् वैधव्य प्राप्त झालें तर—

पत्यौ मृते तु नारीणां विधिद्वयमुदाहृतम् ॥
वैधव्यं पालयेत्सम्यक्सहाग्निं प्रविशेत्तु वा ॥

हे दोन मार्ग सांगितले. ह्यांतून वैधव्य पालन करण्यापेक्षां सहगमन करणें उत्तम होयं.

वर्तंते याश्च सततं भर्तॄणां प्रतिकूलतः ॥
कामात्क्रोधाद्भयान्मोहात्सर्वाः पूता भवंति ताः ॥

असें सहगमन हें महाप्रायश्चित्त होत असतें. देशकालवशात् सहगमन न घडलें तर आपलें सच्छील राखून वैधव्य पाळावें.

---

१ शास्त्रानें निषिद्ध नाहीं म्हणून सांगितलेलें अन्न.

**विधवा पालयेच्छीलं शीलभंगात्पतत्यधः ॥**
**तद्वैगुण्यादपि स्वर्गात्पतिः पतति सर्वथा ॥**
**तस्याः पिता च माता च भर्तृवर्गस्तथैव च ॥ १ ॥**
**विधवाकबरीबंधो भर्तृबंधाय कल्प्यते ॥**
**शिरसो वपनं तस्मात्कार्यं विधवया स्त्रिया ॥ २ ॥**

इत्यादि वैधव्यधर्म पालन न केल्यास पुढें अनर्थ आहे. करितां हें व्रत धारण करून श्रवणादिक करावे. **"न स्त्री स्वातंत्र्यमर्हति"** असें स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं म्हणून अन्नाच्छादन देऊन धर्म चालविणारा पति ( पातीति पतिः म्हणजे पालक ) करावा.

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ॥**
**पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥**

पति नष्ट झाला म्हणजे जिवंत असून कुठें आहे त्याचा पत्ता लागत नसला तर, मेला तर, संन्यासी झाला तर, नपुंसक होऊन पालन करीत नसला तर, जातिभ्रष्ट झाला असेल तर, ( कोणी असेंही म्हणतात कीं, जन्मठेप कारागृहबंधन झालें असेल तर ) स्त्रियांनीं अन्य पति ( पालक ) करावा; पुनर्विवाह करावा अशी विधिक्रिया नाहीं. ब्राह्मण भ्रष्ट झाला तर पुनरुपनयन सांगितलें व त्याचा विधीही सूत्रकारांनीं सांगितला, तसा पुनर्विवाह द्विजातिवर्णस्त्रियांनीं करावा असें सांगितलें नाहीं. म्हणून अर्थात विधीही नाहीं.

**प्रजाप्रवृत्तौ नारीणां वृत्तिरेषा प्रजापतेः ॥**

इत्यादि वचनांत देवरापासून पुत्रोत्पादन करावें असें युगांतर

धर्मामध्यें सांगितलें तेंसुद्धां त्यावेळीं गौणच होय. आतां तर त्याची वार्ताही नको.

**मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्यं व्यवस्थिता ॥**
**स्वर्गं गच्छत्यपुत्राऽपि यथा ते ब्रह्मचारिणः ॥**

भर्ता मेल्यानंतर जी नारी—

**स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणम् ॥**
**उत्साहोऽध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेव च ॥ १ ॥**
**एतदष्टांगमिथुनं प्रवदंति मनीषिणः ॥**
**विपरितं ब्रह्मचर्यमेतदेवाष्टलक्षणम् ॥**

अशा अष्टांग ब्रह्मचर्याचा आश्रय करून रहाते, ती अपुत्रा असली तरीही स्वर्गाला जाते. जसे अपुत्र असतांही अष्टांग ब्रह्मचर्य पाळणारे ब्रह्मचारी स्वर्गास जातात त्याप्रमाणें हीहि जाईल. ' व जी भर्ता जिवंत असतां जारकर्मानें पुत्र उत्पन्न करिते तो पुत्र **कुंड** नावांचा होतो व वैधव्यपणीं पुत्र उत्पन्न केला तर **गोलक** नांवाचा होतो आणि पुनर्विवाह करून अशास्त्रीय पुत्र उत्पन्न केला तर **कुंडगोलक** नांवाचा होतो. ' हे तिघेही धर्मबाह्य अपवित्र आहेत व ह्याच्या मातेला आकल्प नरकवास होईल. हें सर्व मनांत ठेवून दूरदृष्टीनें समजून उमजून स्वप्नामध्येंही आडमार्गीं पाऊल न पडेल असाच महाप्रयत्न करावा. स्त्रियांनीं आचार स्वच्छ ठेवावा.

**गंधलेपक्षयकरं शौचं कुर्यादतंद्रितः ॥**

असें मलमूत्रोत्सर्गानंतर सांगितलें. शौचास जाऊन आल्यानंतर नुसत्या फरशीवर पाय ठेवून वरून पाणी टाकलें व मूत्रोत्सर्गाला

मुळींच पाणी घेतलें नाहीं आणि मलमूत्रोत्सर्गशुध्यर्थ व स्नानानंतर आचमन न केलें तर अशुद्धपणा राहतो व तुमच्याच हातून पंचमहायज्ञांची निष्पत्ती आहे. अतिथिसत्कार तुम्हीच करणार. जर मलिनपणा राखला तर आपणास व दुसऱ्यास बद्धता आहे. पहा! सदाचारानें वागणाऱ्या विष्णुदत्तपत्नीपतिव्रतेच्या हातचें अन्न खाण्याबरोबर ब्रह्मनिष्ठाचें संगभय गेलें असें दत्तमहात्म्यांत आहे. गार्गी, वाचक्वी, वडवा, सुलभा, मैत्रेयी इ. इ. स्त्रिया पातिव्रत्य सदाचारानें ह्याच जन्मीं मुक्त झाल्या. अनुसूयामायीनें त्रिमूर्तीचें बाळ केलें. सतीनें सूर्याची गति बंद केली, असें तुमचें सामर्थ्य आहे. ध्रुव-प्रल्हाद-शुकासारिखीं मौक्तिकें विणाऱ्या शिंप्या तुम्ही आहां. मात्र तुम्हीं शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें वागावें.

## पद

जीवात्मा देहाहून भिन्न जया नच जनिमरणं ॥ धृ० ॥ निजकर्में वृष्टिद्वारा। अन्नरसाश्रय होऊन ॥ पितृदेहीं येऊन तीन। मासांनीं रेत बनून ॥ चाल ॥ ऋतुकाळीं स्त्रीसंयोगें ॥ मातृदरि येवुनि भोगे ॥ गर्भवासकष्टकुसंगें। जोडियलें जें प्राक्तन ॥ १ ॥ आठवुनि पहिलें कर्म। नमि देवा होउनि सभय। हो प्रसन्न मजला डोळां। ह्या बाळावरि करि सदया ॥ चाल ॥ तूं आतां सोडविं मजला ॥ माझि किंव येवो तुजला ॥ ह्यानंतर तव चरणाला ॥ नच कदापि मी विसरेन ॥ २ ॥ मग देवा येउनि कींव ॥ मुक्त करि परि तो जीव ॥ स्त्रीपुंनपुंसक लिंग ॥ नसतांही हो स्वयमेव ॥ चाल ॥ तत्तदाकार अवश्य ॥ बाल्ययौवन वार्धक्य ॥ भोगुनियां सहसा जाय ॥ मृत्यु-

मुखीं पुनरपि दीन ॥ ३ ॥ बरें वाईट कर्म करून ॥ विषयांचें सुख भोगीलें ॥ तें सर्वहि व्यर्थचि गेलें ॥ पाठीला कर्मचि खिळलें ॥ चाल ॥ श्रीदत्तरूपी गुरुजी ॥ ज्ञानांजन नेत्रांमाजी ॥ घालीलचि होउनि राजी ॥ तैं जीवभ्रममोचन ॥ ४ ॥ सोडुनियां सकलहि चिंता ॥ नच आदरीं नश्वर वित्ता ॥ तूं निर्मळ करिं निजचित्ता ॥ निजधर्मे तोषवि दत्ता ॥ चाल ॥ काकुळती येउनि ऐसें ॥ वासुदेव उपदेशितसे ॥ जी नारी करिलचि ऐसें ॥ घेतसे ती निर्वाण ॥ ५ ॥

## फटका

कामाधीन होउन हीन कुलशीलाला बुडवुं नको ॥ कवटाळुनिया नश्वर काया वैर कुणाशीं करूं नको ॥ होतां लाभहि जातां प्राणहि कधींहि खोटें बोलुं नको ॥ ऋजुता धरुनि मन सावरुनि श्रीदत्ताला विसरूं नको ॥ चाल ॥ निजधर्माला दवडुं नको ॥ सत्याला कधि सोडुं नको ॥ उगिच कुटाळ्या करोनि टाळ्या पिटोनि काळा दवडुं नको ॥ १ ॥ हलकट बुद्धी करुनि कुणाशीं लावालावी करूं नको ॥ तूं कोणाची कवडी सुद्धां कधींहि चोरुन घेउं नको ॥ देहीं खोटा धरूनि ताटा परापमाना करूं नको ॥ सुकृत आपुलें दुष्कृत केलें दुसऱ्यानें तरि वदूं नको ॥ चाल ॥ लोकांवरि उगि रुसूं नको ॥ लोकांत खदूखदां हंसूं नको ॥ राहें स्वजनीं सरळ वागुनी कलह कुणाशीं लावु नको ॥ २ ॥ कोण कुणाचें कसें बोलुंघा तें कानावर धरूं नको ॥ शेजारगृहीं जाउनि तूंहि उगीच वटवट करूं नको ॥ थाप ऐकुनी वेडी होउनि दुर्जनसंगति धरूं नको ॥ स्वजना वंचुनि शिनार करुनी स्वतः व्यापार मांडुं नको ॥ चाल ॥ थाटमाट

तूं दावुं नको ॥ तूं कुडि भुलथाप देउं नको ॥ बाळीबुगडी उत्तम लुगडीं घ्याया फुगडी घालुं नको ॥ ३ ॥ दोदिवसाची लक्ष्मी साची जाणुनि धनमद करूं नको ॥ विपत्ति येतां आवरिं चित्ता उगीच धडपड करूं नको ॥ कोणी कैसा बोलो सहसा जबाब तडफड देऊं नको ॥ दवडुनियां यश कधींहि अपयश लोकांमाजी पसरूं नको ॥ ॥ चाल ॥ मर्यादेला टाळुं नको ॥ आचारा कंटाळुं नको ॥ आलिया भोगा होउनि सादर बोल कुणावर ठेवुं नको ॥ ४ ॥ व्याहि जांवया खुषी कराया कोणाचें ऋण काढुं नको ॥ चिंतुनि शर्मा करितां धर्मा मागें पुढती पाहुं नको ॥ पतिआज्ञेविण धर्माचरण स्वेच्छेनें तूं करूं नको ॥ कोणी करितां व्रतदानादिक मधींच आड तूं येउं नको ॥ चाल ॥ ह्या उपदेशा दवडुं नको ॥ दत्ताज्ञेनें वासुदेव हे कथि यातें उल्लंघुं नको ॥ ५ ॥ इति स्त्रीशिक्षायाः प्रथमं प्रकणरम् ॥

**मुलगी**—गुरुजी ! तुम्ही आमचे मायबाप आहांत. तुम्हीं केलेला हितोपदेश शिरसा पुष्पवत् मान्य केला. आतां समजून उमजून मी प्रश्न करितें असा कीं, देह तर जड आहे व जीव तर असंग आहे; मग सुखदुःखादि संबंध प्राणाला असावा. प्राण देहाहून निराळा आहे. तो देहामध्यें परिपूर्ण राहून बळ देतो, व इंद्रियाला स्वकार्य करण्याकरितां वळविनो. देहाला हालचाल प्राणामुळेंच आहे; भूक तहान सुद्धां प्राणाचाच धर्म होय; प्राणच देतो घेतो, निजल्यावरही प्राण आपलें शरीर कुत्रे वगैरे खातील म्हणून श्वासोच्छ्वासरूपानें राखत असतो. ज्याचे श्वासोच्छ्वास बंद होतात

तो मेला असें समजून तें त्या प्राणानें सोडलेलें अमंगळ व भयंकर प्रेत जाळतात. जोंपर्यंत प्राण आहे, तोंपर्यंत कोणी कोणाला विरुद्ध बोलल्यावर दुसरे संभाविन त्याला म्हणतात कीं तूं पतीचा किंवा मायबापाचा अशस्त्र वध केलास व प्राण निघोन गेल्यानंतर तो देह पतीचा, पुत्राचा, पित्याचा, मातेचा, बंधूचा व ब्राह्मणाचाही कां असेना त्याला बांधून मसणांत नेऊन सरणावर ठेवून जाळून राख केली तरी मग तूं भर्तृहत्या, पुत्रहत्या, पितृहत्या, मातृहत्या, बंधुहत्या किंवा ब्रह्महत्या केलीस इत्यादि कोणीही म्हणत नाहीं; तेव्हां प्राणच पती, प्राणच पुत्र, प्राणच पिता, माता, सुहृत् ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम, प्राणच कां न म्हणावा ? प्राणाला चेतनताहि आहे. पहा, अकस्मात् मूर्च्छा आली किंवा सन्निपात झाला तर आवडीचें पोर जवळ रडून कहर करीत असतां किंवा मोठ्यानें आरोळ्या ठोकीत असतां न कळल्या तरीही जर पदर इकडचा तिकडे सरकला तर त्या मूर्च्छेच्या वेळीं किंवा सन्निपाताच्या वेळीं, सावरून घेतात हें जगांत प्रसिद्ध आहे; तर प्राणाला आत्मा कां न म्हणावा ?

**गुरुजी**—शाबास, विचार तर बरा केलास. तुझी बुद्धि विवेक करणारी आहे, असें जाणून मला आनंद झाला. पण अजून आत्मा कोण हें तुला कळलें नाहीं. मात्र देहाचा अनात्मत्वें निरास चांगला केलास. पतिपुत्रादिक प्राणच आहे, असा निर्धार करून मेल्यावर हिरण्यगर्भोपासकांप्रमाणें प्राणलोकीं कांहीं काल गति होईल; पण पुनरावृत्ति चुकणार नाहीं. कारण प्राण हा आत्मा नव्हे, तर

बाहेरच्या वायूप्रमाणें हाही जड आहे; जरी मूर्च्छेमध्यें पदर सांवरून घेतला तरी ते पूर्वसंस्कारवशात् काकतालीयन्यायानें कार्य घडलें; म्हणून प्राणांला चेतनत्व आलें असें म्हणणें तर दुरापास्तच आहे. बरें, पहा! प्राण हा चेतन असता तर झोंप लागल्यावर तो जागा असतांही आंगावरील अलंकार चोरानें चोरून नेले तरी त्याला कांहींच कळत नाहीं. मी भुकेलों, मी तान्हेलों, आतां माझे प्राण व्याकुळ झाले इत्यादि स्पष्ट व्यवहारावरून असें म्हणणारा प्राणावांचून निराळाच असला पाहिजे. तो प्राणाचाही प्राण आहे व बळ देऊन शरीर धारण करणें व वांचविणें हेंही काम केवळ प्राणाचेंच म्हटलें जात नाहीं, तर प्राणाच्याही आंत असणारा अंतर्यामी जो तोच बल देतो व प्राणाला हृदयांत खेळवून खाणेंपिणें करवितो. खाल्लेलें अन्न पचविण्याकरितां—

उर्ध्वमग्नेर्जलं कृत्वा कृत्वाऽन्नं च जलोपरि ॥
अग्नेश्चाधः स्वयं प्राणः स्थित्वाऽग्निं धमते शनैः ॥

प्राणेनांभांसि भूयः पिबति पुनरसावन्नमश्नाति तत्र
तत्पाकं जाठरोऽग्निस्तदुपहितबलो द्राक् शनैर्वा करोति ॥
व्यानः सर्वांगनाडीष्वथ नयति रसं प्राणसंतर्पणार्थः
निःसारं पूतिगधं त्यजति बहिरयं देहतोऽपानसंज्ञः ॥
व्यापारं देहसंस्थः प्रतिवपुरखिलं पंचवृत्त्यात्मकोऽसौ
प्राणः सर्वेंद्रियाणामधिपतिरनिशं सत्तया निर्विवादम् ॥
यस्येत्थं चिद्घनस्य स्फुटमिह कुरुते सोऽस्ति सर्वस्य साक्षी
प्राणस्य प्राण एषो ह्यखिलतनुभृतां चक्षुषश्चक्षुरेषः ॥

इत्यादि प्रमाणानें व अनुभवानेंही प्राणादिद्वारा अंतर्यामींच आत्मा सर्व करवितो, पण करवून सुद्धां कर्ता, करविता न होतां निर्लेप राहतो; तेव्हां प्राणाप्रमाणें अचेतन (जड) हा आत्मा नव्हे. तूं असें पहा, स्वसन्निधानानें सर्व करूनही हा आत्मा अकर्ता राहतो. तुम्ही तर सर्वथा पराधीन असून स्वतः डोळ्याची पापणी सुद्धां हालविण्याचें सामर्थ्य नसूनहा (मीं जळतें खापर डोक्यावर घेतल्यामुळेंच हें घर चाललें, मीं केलें म्हणूनच हें झालें, माझ्या-सारखी कोण शहाणी आहे काय? असा) पदोपदीं अहंपणा करितां. काय तुमच्या हातांत आहे? कांहीं नाहीं, तेव्हां असा वारंवार विचार करून कर्तेपणा व करवितेपणा घालवून निर्लेप रहावें. जो अकर्ता निर्लेप राहील त्याचे हातून बरें वाईट कर्म घडलें तरी त्यापासून त्याला बद्धता नाहीं. जशी लोखंडाची बेडी तशीच सोन्याचीहि बेडी बांधण्यास सारखीच आहे. त्याप्रमाणें पाप व पुण्य हीं दोन्हींहि मोक्षप्रतिबंधास सारखींच आहेत. जसें पाप नरकयातना भोगवितें, तसें संकल्पपूर्वक फलकामना धरून केलेलें पुण्य, स्वप्नसुखाप्रमाणें थोडा काल स्वर्गसुख दाखवून पुनः अधःपात देतें. तो अधःपात दुःसह आहे.

> यः प्रेत्यात्मानभिज्ञः श्रुतिविदपि
> तथा कर्मकृत्कर्मणोऽस्य ॥
> नाशःस्यादल्पभोगात्पुनरवतरणे दुःख
> भोगो महीयान् ॥

असें वचन आहे म्हणूनच तेंच पुण्य ईश्वरप्रीत्यर्थ केलें तर ईश्वर-

प्रसादानें बुद्धि-सिद्धि द्वारा ज्ञान होऊन याच जन्मांत मोक्ष मिळतो. तेव्हां पूर्वीं तसें पुण्य केल्यामुळें आज ही तुझी सारासार विचार करणारी बुद्धि होऊन श्रीदत्तात्रेयाच्या प्रसादानें सद्गुरूची गांठ पडून सदुपदेश झाला. असो; हा देहाहून वेगळा प्राण तूं निवडलास तो पांच प्रकारचा, पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व मन आणि बुद्धी या सत्रांचा मिळून हा लिंगदेह. पैकीं एक प्राणमय नांवाचा कोश होय. आत्मा तर याहून निराळाच आहे.

मु०—बरें, आपण म्हणतां हें तर सयुक्तिक माझ्या मनांत भरलें. मला असें वाटतें, मी पहात्यें, मी बोलत्यें, मी ऐकत्यें इत्यादि व्यवहारावरून इंद्रियांला चेतनता असावी. तेव्हां आंत असणारीं इंद्रियेंच आत्मा असावा, किंवा त्या इंद्रियांचें चालक मनच आत्मा असावा, कारणः—

**मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥**

इत्यादि प्रमाण ऐकिवांत आहे. तेव्हां बंधमोक्षव्यवस्थासिद्धिही होते. म्हणून मनाला आत्मा म्हणणें प्रशस्त आहे, व

**मनःकृतं कृतं राम न शरीरकृतं कृतम् ॥**
**येनैवालिंगिता कांता तेनैवालिंगिता सुता ॥**

इत्यादि उपपत्ति पाहिल्यावर मनच आत्मा ठरतो. देहादिकांचे ठायीं अहंता व गृहदारादिकांचे ठायीं ममता तर मनच करितें. इंद्रियांपेक्षांही जाणणेपणा हा मनाचाच धर्म आहे. कारण एखादे वेळीं आपलें मन भलतीकडे गेलें म्हणजे पुढ्यांतून वाजत गाजत राजाची स्वारी गेली तरी पत्तासुद्धां लागत नाहीं. कोणी विचारल्यावर हेंच

उत्तर मिळतें कीं, माझें मन तिकडे नव्हतें. अतएव माझ्या डोळ्यांना दिसलें नाहीं असा व्यवहार उघड दिसतो; तर मनच आत्मा म्हणण्यास काय हरकत आहे ?

गु०—शाबास, उत्तरोत्तर तुझें पाऊल पुढें पुढेंच आहे. असें आंत आंत चांचपून पाहिलें तर बरेंच होईल. जसें एका राज्यांत अनेक राजे परस्पर विरुद्ध होतील, तसें इंद्रियांना आत्मे म्हटल्यावर होईल; हीं इंद्रियें भौतिक जड करणें आहेत. जसा प्राण हा रजोगुणी भूतविकार आहे, तसें मनही सत्वगुणी भूतविकार आहे. जसें केवळ मातीच्या भांड्यापेक्षां माती गाळून भट्टी लावून केलेल्या कांचेच्या भांड्याला चकाकी येते म्हणून तो मातीचा विकार नव्हे असें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें अन्नाच्या सूक्ष्म वाफेनें बनलेल्या मनाला आत्मा म्हणतां येणार नाहीं. हें मन ( अन्नमय ) भूतविकारच आहे, व कामादि अवस्थेनें हें क्षणोक्षणीं भ्रांत होतें व संकल्प विकल्पात्मक असल्यामुळें हें चंचल आहे. आत्मा निश्चल आहे. हें मन विषयांकरितां इंद्रियांला क्षोभविणारें आहे. आत्मा तर नित्य तृप्त आहे; पण हें मन त्रैलोक्यांतील सर्व वैभव मिळालें तरी आशातृष्णारूपीवृत्तीनें कधींही तृप्त होत नाहीं. दुर्वासना धरून पुढें भूतप्रेत पिशाचादि भावाला पाववितें. आत्मा सर्वव्यापी असल्यामुळें अपरिच्छिन्न असून मन परिच्छिन्न आहे हें उघड कळतें.

**अगमन्मे मनोऽन्यत्र सांप्रतं च स्थिरीकृतम् ॥**

**माझें मन दुसऱ्या ठिकाणीं गेलें होतें तें पुनः परत आलें, आतां त्याला स्थिर केलें असें स्वानुभवानें सर्वांलाही कळतें. हें परिच्छिन्न**

नसेल तर जाणें येणें कसें घडेल? व जें कर्म पुढच्या जन्माला फलोन्मुख होतें त्या त्या आकाराचें मन अंतकाळीं होतें; म्हणून त्यां त्या जन्माला जावें लागतें. [जो ज्याला जाणतो तो त्याहून निराळाच असतो] ह्या न्यायानें आपलें मन गेलें, आलें इत्यादिक ज्याला कळतें तो आत्मा त्या जडमनाहून निराळाच आहे हें जागेपणीं उघड कळतें व स्वप्नामध्यें वाचा आदिकरून सर्व इंद्रियें मनांत लीन होतात, म्हणजे मनाच्या ताब्यांत राहतात, म्हणूनच मन स्वतः आपणच ग्राह्यविषयरूपी होऊन ग्राहक इंद्रियेंही स्वतःच बनून देणें घेणें इत्यादि सर्व व्यापार आत्मसांनिध्यानें बळ पावून करितें, आत्मा तर स्वयंज्योति आहे. ज्यास स्वप्नावस्थेमध्यें कार्यज्योती सूर्य, चंद्र, अग्नि इत्यादिक नसतां व करणज्योती डोळे इत्यादि इंद्रियें नसतांही स्वचैतन्यप्रकाशानें मनःकृत सर्व पदार्थाला प्रकाशित करितो, तो आत्मा मन व मनोव्यापार ह्या सर्वांहून निराळा साक्षिभूत निर्विकार आहे. तो मन निश्चल झालें म्हणजे निश्चल कळूं लागेल.

मनोजृंभणराहित्ये यथा साक्षी निराकुलः ॥

इत्यादि प्रमाणानें पांच ज्ञानेंद्रियें, व संकल्पविकल्पात्मक मन मिळून एक मनोमयकोश लिंगदेहापैकीं आत्म्याला उपाधिभूत आहे, तेव्हां तो आत्मा त्या मनउपाधीहून वेगळाच जाणावा. उगीच मनाच्या तादात्म्याध्यासानें मरून आशाभूत होऊं नये. जर मन आवरत नसून रूपलावण्यसौंदर्यादिकांला भुलून हट्टी द्वाड पोराप्रमाणें आवरलें असतांही पुनः पुनः चपळपणानें पळत असेल तर सगुण

ईश्वराची सुरेख प्रतिमा करून, आपल्या अधिकाराप्रमाणें प्रतिष्ठा करून, यथाविधि पूजा करून, मोकळ्या वेळीं पायापासून मस्तकापर्यंत ध्यान करून, स्थिरासनावर बसून, हृदयकमळांत ती प्रतिमा सांठवून ठेवावी. पुनः पुनः ध्यान सुटलें तरी तशीच आपादतलमस्तकापर्यंत भरून घ्यावी. जरी महिना, दोन महिने किंवा वर्षपर्यंत मन स्थिर न झालें तरी नाउमेद न होतां खेद सोडून हात धुवून मनाचे पाठीस लागावें म्हणजे आपोआप स्वाधीन होईल. कितीही उच्छृंखल झालें तरी श्रीगुरुदत्तात्रेयाच्या पादुकांचें चिंतन करितांच मन शांत होईल.

मु०—गुरुजी ! यथार्थ सांगितलेंत. त्याच पादुकांचें आजपर्यंत चिंतन केलें त्याचेंच फळ हें चरणकमल पाहिलें. असो, असें हें मन भौतिक जड आहे व वाचा मनासह मागें फिरतें, पण त्याला आत्म्याचा पत्ताही लागत नाहीं; असेंहि कानावरून गेलें आहे. तेव्हां पुढें रिघून विचार केल्यावर बुद्धि आत्मा म्हणण्यास हरकत नाहीं. मन बुद्धीची वृत्ति आहे. तेव्हां ती जड असली पाहिजे; पण बुद्धि मात्र जड नव्हे, ही मनाची नियंत्री असल्यामुळें स्वतंत्र आहे. बुद्धि करील तें होईल. बुद्धि नसेल तर प्रत्यक्ष, अनुमान, उपमा इत्यादि प्रमाणें तरी कशीं करितां येतील ? येणार नाहींत. बुद्धिवांचून स्मरण, उहापोहज्ञान तरी कसें बरें होईल ? कर्तृत्वसुद्धां बुद्धिलाच आहे, तेव्हां हाच आत्मा असावा.

गु०—आकाश, वायु, तेज, जळ, पृथ्वी हीं पंचमहाभूतें ईश्वरानें तप करून केलीं व तीं त्रिगुणात्मक असल्यामुळें प्रत्येकभूताच्या

रजोंशांनीं वेगळालीं वाचा, पाणी ( हात, ) पाद, गुंद[1], उंपस्थ[2], हीं पांच रजोगुणी कर्मेंद्रियें झालीं; व अवशिष्ट सर्व रजोगुणांश एकत्र होऊन प्राण झाला. तो प्राण, अपान, व्यान, उदान, समान अशा वृत्तिभेदानें पांच प्रकारचा झाला, व आकाशादि पंचभूतांच्या सत्वांशीं निरनिराळीं श्रोत्र[3], त्वचा[4], चक्षुं[5], जिव्हा, घ्राण[6] अशीं पांच ज्ञानेंद्रियें झालीं; व अवशिष्ट सर्व सत्वांश एकत्र होऊन अंतःकरण झालें. तें संकल्पात्मक मन व निश्चयात्मक बुद्धि अशा वृत्तिभेदानें दोन प्रकारचें जाणावें. जरी प्राधान्यानें बुद्धि सात्विक आहे तरी तिला अंगभूत रजोगुण तमोगुण आहेत म्हणून त्रिगुणात्मिका ही बुद्धि तीन अवस्थांला पावते.

**बुद्धेस्त्रिधा वृत्तिरपीह दृश्यते स्वप्नादिभेदेन गुणत्रयात्मनः ॥**

बुद्धीला स्वतंत्र कर्तृत्व मानलें तर बोद्धव्याकरितां दुसरी बुद्धि पहावी लागेल तर तसें नाहीं. अग्निसंयोगानें लोहाला जसें दाहकत्व येतें, तसें आत्मसान्निध्यानें बुद्धीला चेतनत्व भासतें. बुद्धि झोपेंत लीन होते व जागृतींत आपादतलमस्तक व्यापते, तेव्हां बुद्धीला आत्मा म्हटला तर काजव्याप्रमाणें आत्मस्वरूप ठरेल तर तें सदोदित आत्म्याला साजेल काय ? बुद्धीच पुण्यपाप करील तर स्वर्ग नरक बुद्धिलाच मिळेल. मग जीवाकडे काय संबंध राहिला ? एकानें करावें व दुसऱ्यानें भोगावें असें घडेल काय ? नाहीं नाहीं. तेव्हां यावत् बद्धदशा आहे तावत् जीवाला आध्यासिककर्तृत्वादिक शास्त्रानें

---

१ मलविसर्गद्वार. २ मूत्रद्वार. ३ कान. ४ कातडी. ५ नेत्र. ६ नासिक.

मानिलें आहे. पांच ज्ञानेंद्रियें व बुद्धि मिळून हा लिंगशरीरापैकीं एक विज्ञानमय कोश आहे. बौद्धांनीं हाच आत्मा असें म्हटलें तें अगदीं चुकीचें आहे; तेव्हां बुद्धीचा साक्षी बुद्धीहून पर असणारा जो तो आत्मा बोधृत्वसाक्षीत्व असूनही स्वयें निर्विकार आहे.

मु०—पूर्वीं अहंकार लीन झाला म्हणजे निद्रावस्था असें सांगितलेंत, व आतां तर बुद्धि लीन झाली म्हणजे निद्रा व आपादतलमस्तक बुद्धिव्याप्ती झाली म्हणजे जागृति असें सांगतां तर हें कसें?

गु०—कित्येक अंतःकरणाचे भेद मन, बुद्धि, चित्त, अहंकार असे चार मानितात; कित्येक दोन मानतात, तेव्हां मनामध्यें चित्ताचा, बुद्धीमध्यें अहंकाराचा अंतर्भाव मानितात म्हणून तसें म्हटलें तरी दोष नाहीं. चार्वाकादिक व पामरजन देहालाच अहंपणा देतात तर तो अहंपणा मिथ्या होय. मीमांसादिक जीवाला ( चिदाभासाला ) अहंपणा देतात, तर तो अहंपणा गौण होय. वेदांतसिद्धांती अकर्ता, अभोक्ता, गमनागमनादिरहित प्रत्यगात्म्याला अहंब्रह्म असें मुख्यत्वें लक्षणावृत्तीनें अहंकारलक्ष्यार्थ कूटस्थचैतन्याचें नित्य, शुद्ध, बुद्ध ब्रह्माशीं सामानाधिकरण्य करितात. तो अहंकारलक्ष्यार्थ मात्र आत्मा म्हटला जाईल. वाच्यार्थरूपी जड अहंकार तर बुद्धीप्रमाणें दृश्य आहे. हा अहंकार जोंपर्यंत गळला नाहीं तोंपर्यंत ब्रह्मदेवाजवळ जरी वास केला, तरीही पुनरावृत्ति चुकणार नाहीं.

## प्रकरण ३ रें

मु०—देहापासून अहंकारापर्यंत जें त्यांपैकीं एकालाहि आत्मा

म्हणतां येत नाहीं व यापुढें आणखी कांहीं नाहीं. अर्थात् बाकी शून्य राहिलें. हाच आत्मा काय ?

गु०—आत्मा तर परमानंदरूप आहे, तो शून्य होईल काय ?

मु०—जागृदावस्थेमध्यें घडलेले सर्व व्यापार स्वप्नावस्थेमध्यें संकोचित होतात, मात्र कित्येक दृष्टश्रुतादि व्यवहार मानसिक कांहीं वेळ भासतात ते सर्वहि निद्रेमध्यें अत्यंत लीन होतात. हें तर पूर्वींच आपण सांगितलें आहे. त्यावेळीं परमानंदही होतो; मग आनंदरूपी शून्यच आत्मा कां न म्हणावा ?

गु०—बुद्धीमध्यें चैतन्याचें प्रतिबिंब पडलें तोच जीव होय. ह्या जीवाला बुद्धिद्वारा स्थूलदेहाचें तादात्म्य घडतें तेव्हां प्राधान्यानें नेत्रांत स्थिति होऊन आपापल्या देवतांनीं अनुग्रह केलेल्या इंद्रियांनीं विषयांचें ग्रहण होतें. ही स्थूलभोगरूपी जागृदवस्था विश्वनामक जीव अनुभवितो, व तोच जीव इंद्रियें मनांत लीन झाल्यावर कंठस्थानीं लिंगदेहाशीं तादात्म्य पावून तोच विश्वनामक जीव तैजससंज्ञक होऊन जागृदवस्थेंत पाहिलेले, ऐकिलेले इत्यादिक जे विषय त्यांचा संस्काररूपी प्रविविक्त भोग अतःप्रज्ञेनें घेतो, व या नंतर नाडीमार्गानें हृदयवेष्टनरूपी पुरीतन्नामाचे पोकळींत येऊन प्राज्ञनामक होत्साता ब्रह्मरूपीशय्येवर निजून चेतोमुखानें परमानंद भोग घेतो. पण पाण्यांत पडलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें ब्रह्मस्वरूपीं मिसळून जात नाहीं. जसा पाण्यानें भरलेला शिसा तोंड घट्ट करून पाण्यांत ठेविला तरी तें पाणी जसें ठेविलेल्या पाण्यांत मिसळत नाहीं, व पुनः शिसा उचलला तर तेंच पाणी तसेंच

असतें; त्याचप्रमाणें अनिर्वचनीय अज्ञानानें आवरलेला जीव झोपे-मध्यें ब्रह्मस्वरूपीं मिळाला तरी आपलें प्रारब्ध भोगण्यासाठीं कांहीं निमित्तानें [ ईश्वरेच्छेनें ] तोच जीव त्याच स्वरूपानें पुन: जागा होऊन देहावर येतो व पूर्वीं केलेले व पुढें करण्याचे आपले सर्व उद्योग आठवितो; पण ब्रह्मज्ञानानेंच नष्ट होणारें उपाधिभूत अज्ञान नष्ट झाल्यावांचून निरुपाधिकपणें ब्रह्मस्वरूपांत अत्यंत लीन होणार नाहीं. हा जो अवस्थावान् जीव व ह्याचे अवस्थाव्यापार जाणणारा, त्या सर्वांहून विलक्षण असून सर्वसाक्षी आहे. तो शून्याहून निराळा, शून्याचाही साक्षी आहे. अन्यथा शून्य तरी कोणास कळलें? ज्याला शून्य कळों आलें तो तर शून्याहून निराळाच आहे.

मु०--एवढ्या गाढ झोपेंत तो साक्षी कसा असतो व जागेपणीं त्याची ओळख कशी पटावी?

गु०—ज्याप्रमाणें ग्रहण लागतें त्या वेळीं राहूनें ग्रासलेलें सूर्य-मंडळ किंवा चंद्रमंडळ पाहणाऱ्यास स्पष्ट दिसून आलें नाहीं तरी तेवढ्यानें तीं मंडळें नाहींतच अशीं होत नाहींत मात्र स्पष्ट भासत नाहींत; पण तसल्या त्या खग्रासाच्या वेळीं खग्रासातिरिक्तपणानें त्या मंडळांचा भास होतोच होतो. त्याप्रमाणें सर्वेंद्रियांत:करणोपरमरूपी निद्रेमध्यें शून्य साक्षीपणानें राहून जीवाला उठल्यावर स्मरण करून तोच देतो, इत्यादि प्रमाण आहे म्हणून झोंपेंतून उठलेला जीव मी इतका वेळ सुखानें निजलों होतों, मीं कांहीं जाणलें नाहीं असे उद्गार काढितो. पूर्वीं अनुभविल्यावांचून हें स्मरण तरी कसें व्हावें? तेव्हां त्या वेळींहि हा अनुभव आहे व दुसरें असें, हा जीव म्हणजे

ब्रह्मस्वरूपाहून निराळाच एक पदार्थ आहे असें नाहीं.

**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः**

असें प्रमाणहि आहे. जोंपर्यंत संघाताचा अभिमान धरून मी कर्ता, मी भोक्ता, मी सुखी, मी दुःखी इत्यादि रूपानें व्यवहार करतो तेव्हां जीव म्हटला जातो. हा जीव स्वतः सच्चिदानंदस्वरूपी असूनही देहादिकांचे ठायीं निमग्न होऊन मायेनें मोहित होत्साता सुखासाठीं तळमळ करून मनाला प्रिय वाटणारे बरेच संबंध करितो.

**यावतः कुरुते जंतुः संबंधान्मनसः प्रियान् ॥**
**तावंतोऽस्य निखन्यंते हृदये शोकशंकवः ॥**

पण त्यापासून सुख कोठून होईल ? होणारच नाहीं.

**सुखमस्यात्मनो रूपं ॥**

आपण सुखरूपी आहें असें खरोखर जोंपर्यंत कळलें नाहीं तोंपर्यंत देहाला, प्राणाला, मनाला, बुद्धीला किंवा अधिक पाहिलें तर शून्याला मी आत्मा म्हणून भ्रांतपणें वाद मात्र करण्याचा; पण ह्या शून्याचाहि साक्षी, व धर्माधर्मादिरहित, कार्यकारणभाववर्जित असून, भूतभविष्यवर्तमानकाळानें परिच्छिन्न होत नाहीं. अतएव षड्भावविकार ज्याला नाहींत असा, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त परमानंदाद्वितीयरूपी आत्मा कळण्याचा कठीण आहे. जागेपणीं ह्याची ओळख पटण्याला अवघड नाहींच नाहीं. सर्व विकल्प दूर करून स्वसंवेद्य आत्मस्वरूप आपणच ओळखावें. जसा वारा आंत घुसल्यानें पाण्यावर पाण्याचा तरंग निराळ्या स्वरूपासाचा भासतो, पण त्याच्या आंत पाणी, पूर्वेकडे व पश्चिमेकडेसही पाणी, व जिकडून

आला व जिकडे जातो तें सर्व पाणी, व वायु शांत झाल्यावर तरंग म्हणून कांहीं निराळा पदार्थ आहे काय? कांहीं नाहीं. त्याप्रमाणेंच भूतभौतिक देव, नर, नारी, पशू, पक्षी, कृमि, कीट, वृक्ष, वल्ली इत्यादि विविधरूप नामकर्मगुणभेदानें बाह्य दृष्टीनें जें जें भासतें, तें तें सर्व एक सच्चिदानंदात्मक स्वरूपच आहे. दुसरें कांहीं नाहीं. जें स्थावर जंगम अणुरेणूपर्यंत दिसतें त्याचें नामरूप सोडून एक सच्चिदानंददृष्टीनेंच सर्व पहावें. मग कोणाचा कोण प्रिय, अप्रिय, मित्र, शत्रु, द्वेष्टा, उदासीन, साधु, असाधु व कोणाचा वियोग, कोणाचा योग! ही सर्व व्यावहारिक एक काहाणी आहे.

मु०—तुम्हीं म्हणतां तें खरें, पण हें भिन्नपणानें नामरूप आकाराला पावलेलें जगत् ढळढळीत दिसत असतां त्याचा अपलाप करून हें एकच आहे असा निश्चय तरी कसा मनांत भरावा?

गु०—वर्षोपला यथाऽभिन्ना अपि भिन्ना इहांभसि ॥
ब्रह्मणीदं तथा विश्वं ब्रह्माभिन्नं विनिश्चिनु ॥

जशा जळरूपी गारा दगडासारख्या घट्टरूपाच्या जळावर पडल्या तरी जळाहून निराळ्याच दिसतात, पण विचक्षण लोक गार लागणाऱ्या गारा पाणीच आहे अशाच दृष्टीनें पाहातात व क्षणांतरीं त्याच गारा पाणी होतें; ह्या न्यायानें सर्व जगताचें नामरूप सोडून निरंतर सच्चिदानंददृष्टी मात्र विवेकानें ठेवावी हेंच विवेकाचें कार्य होय. दगड मारून घडा फोडल्याप्रमाणें अजिबात नामरूप नाहींसें करावें असें कर्तव्य नाहीं, तें जगत् विवेकानंतर दग्धपटन्यायानें बापुडें राहिना का? एक वेळ बाधित केल्यावर बाधितानुवृत्तीनें

राहिलें तरी त्यापासून मग काय बाधा आहे? कांहीं नाहीं. यावत् व्यवहारक्षयपर्यंत बापुडें खुशाल राहो. कारण कीं:-

**करें निर्मिलें तें मनें तोडवेना, मनें निर्मिलें तें करें मोडवेना**

**शु०**-आपण सांगतां पण अजून निश्चय होईना.

**गु०**-तुला संशय राहिला असेल तर अजून प्रश्न कर. मी निःसंशय करतों.

**शु०**-संशय तर नाहीं. तुम्हीं सांगतां तसा विचार करावा खरा; पण चित्ताची एकाग्रता होत नाहीं, यास काय करावें?

**गु०**-तर चिरकाल ध्यान करून सावधान हो.

**शु०**-हेंही खरें, पण गांवाची निष्कारण उठाठेव करण्यास वेळ मिळते, परंतु अद्वैत वासना होण्याची मुष्कील पडते.

**गु०**-ह्यावरून असा निश्चय होतो कीं, अद्यापि तुझ्यावर ईश्वराचा अनुग्रह झाला नाहीं, त्यावांचून श्रवण केलें तरी तें-

**नळी फुंकिली सोनारें। इकडून तिकडे गेलें वारें॥**

याप्रमाणें समजावें, किंवा कांहींसें समजलें तरी न उमजल्यामुळें लोकांमध्यें वटवट करण्यास मात्र मिळेल. काय त्याचा उपयोग?

**लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडा पाषाण॥**

**शु०**-तर असें श्रवण करूं नये काय?

**गु०**-बायांनो, तुम्हीं श्रवणास जातां म्हणून बिचाऱ्या पुराणिकबुवाला पोथी सोडण्याचा प्रसग तरी येतो, नाहीं तर मग 'रामकृष्णवासुदेव.' तुम्ही पुराण-कीर्तनास जाऊन इकडच्या तिकडच्या गोष्टी करा किंवा माळा फिरवा अथवा वाती पत्रावळी वगैरे

करा; पण रोज मूठमूठ धान्य आणि अखेरीस बिदायकी, एवढ्याला कांहीं वानवा नाहीं.

**मु०**—आमची ही मस्करी करतां ?

**गु०**—आम्ही स्वतःच मस्करी ( संन्यासी ) बनलों, दुसऱ्याची मस्करी करावयाची? एका मनानें दोन कामें होत नाहींत. आधीं श्रवणाला वेळ थोडाच वांटणीस येणार, तोही व्यर्थ गेला तर मनुष्यजन्माचा काय उपयोग ? ह्याचकरितां असें जाचून बोललेलें अंतःकरणास खोंचूनतरी लक्ष्यपूर्वक थोडें श्रवण घडूं द्या; तें व्यर्थ जाणार नाहीं.

**मु०**—हें तर पत्करलें; पण ज्या योगानें श्रवण केलेलें मनांत ठसून त्याचें मनन, निदिध्यासन ( ध्यान ) घडेल असा ईश्वरानुग्रह कसा व्हावा ?

**गु०**—सर्व प्राण्यांला आपल्याप्रमाणेंच देहादिक प्रिय आहेत व जसें आपणास दुःख होतें तसेंच इतरांसही होईल व ' देह हें देऊळ आहे व त्यामध्यें राहणारा जीव हा सदाशिव आहे, असा निश्चय करून अहिंसारूप पुष्प त्याला आवडतें तें देऊन निरंतर ' सोहं भावानें पूजा करावी.' हिंसा म्हणजे प्राणच घेणें असा अर्थ नव्हे, तर कायावाचामनें दुसऱ्यास पीडा न देणें हा अर्थ समजावा. अतएव निरर्थक कोणाचें मनसुद्धां दुखवूं नये व कायावाचामनानें केलेलें सर्व कर्म ईश्वरास समर्पण करावें; आपली बुद्धि स्वच्छ राखावी, सरळ वागावें, खोटें बोलूं नये, क्रोधरूपी मांगाचा स्पर्श करूं नये, झाला तर स्नानच करावें. कसें कोणीं बोलोत आपण

शांति धरावी, दुर्जनपण करूं नये, इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवावीं, प्रिय भाषण करावें, वाईट कर्माची लाज ठेवावी, हानि झाल्यास खचूं नये, इष्ट वियोग झाला तरी हळहळूं नये, मोठेपणा सोडून द्यावा, बाह्याभ्यंतर शौच ( शुद्धि ) करावें, संगती करणें तर सज्जनाचीच करावी, मिळेल त्यांत संतोष मानावा, घडेल तसतसें श्रवण आदरानें करावें, असें वागल्यास अवश्यमेव ईश्वरानुग्रह होईलच होईल.

मु०—सोहं भावानें पूजा करावी म्हणतां तो सोहंभाव कसा ?

गु०—सः म्हणजे तो परोक्ष दूर असणारा, अहं म्हणजे मी अपरोक्ष स्वयंप्रकाश, हे दोन पदार्थ आहेत. यांनाच जीव-शिव म्हणतात. सोहं हें वाक्य आहे व सः आणि अहं हीं दोन त्याचीं पदें होत. वाच्यार्थ, लक्ष्यार्थ असे दोन अर्थ प्रत्येक पदाचे आहेत. त्यांतून पांच भौतिक स्थूलदेह, हा पहिला; पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच प्राण, मन व बुद्धि मिळून एक लिंगदेह हा दुसरा; अज्ञानकारण देह हा तिसरा, मिळून देहत्रयवेष्टित जें चैतन्य अविद्याप्रतिबिंबित जीव, अविद्याधिष्ठान चैतन्य, हा अहं पदाचा वाच्यार्थ आहे व साक्षी, कूट, प्रत्यगात्मा हा अहंपदाचा लक्ष्यार्थ आहे. सप्तपाताळ लोक पायांपासून कंबरेपर्यंत ज्याचे, व भूरादिलोक नाभीपासून मस्तकापर्यंत ज्याचे, नक्षत्रें-दांत; माया-हास्य; रात्र-दिवस ज्याचे निमेषोन्मेष; सृष्टि-कटाक्ष; समुद्र-कुक्षी; नद्या-नाड्या; वृक्ष-केश; वृष्टि-रेत; अस्थि-पर्वत असा विराट देह ज्याचा स्थूल होय. दिशा-कर्ण, वायू-त्वचा, सूर्य-नेत्र, वरुण-जिव्हा, अश्विनी-

कुमार-नासिका, अग्नि-वाचा, इंद्र-हात, प्रजापति-लिंग, मृत्यु-गुद, मन-चंद्र, बुद्धि-बृहस्पति, चित्त-विष्णु, अहंकार-रुद्र असा हिरण्य-गर्भाख्य लिंगदेह ज्याचा व माया अव्याकृताख्यकारणदेह ज्याचा, ह्या देहत्रयानें वेष्टित जें ब्रह्म चैतन्य ( माया, मायाधिष्ठान, ब्रह्म-चैतन्य व मायाप्रतिबिंबित ईश्वर ) हा सः या पदाचा वाच्यार्थ होय. व सत्य ज्ञानानंतपरमानंद लक्ष्यार्थ होय. तेव्हां दोन्ही वाच्यार्थाला विरोध आला तरी वाच्यार्थ सोडून ( देहप्राणेंद्रियमनोबुद्धिअहंकारा-हून वेगळा; विश्व, तैजस, प्राज्ञ हे तीन देहाचे अभिमानी विकारी याहून निराळा; जाग्रत्स्वप्नसुषुप्तीचा साक्षी, अन्नमय, प्राण-मय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय ह्या कोशांहून व्यतिरिक्त जो मी कूटस्थ साक्षी प्रत्यगात्मा तोच हा विराटसूत्रात्मा; अव्याकृतमाया ह्या तीन देहांहून निराळा, व त्याचे अभिमानी वैश्वानर, हिरण्यगर्भ ईश्वर त्याहून वेगळा, व सृष्टिस्थितिप्रलय हे त्यांचे व्यापार जे, त्यांचा साक्षी, सत्य, ज्ञान, अनंत, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव पर-मात्मा आहे. ) असेंच दोन्ही लक्ष्यार्थांचें अखंड तैलधारेप्रमाणें निरंतर चिंतन करावें. हेंच निदिध्यासन [ ध्यान ] होय. जीवशिव एकच आहेत, असें वेदांत ऐकून निर्धार करणें तें श्रवण होय. श्रवणानें संशय नष्ट होतात. अविद्याउपाधीनें जीवाला किंचिज्ज्ञपणा आला व विद्या–( माया )–उपाधीनें शिवाला [ ईश्वराला ] सर्वज्ञपणा आला, हे दोन्ही उपाधी सोडल्यावर परस्परांचें एकत्व संभवतें, असें अनु-संधान श्रवणानुसारानें करणें तें मनन होय. मननानें असंभावना नष्ट होते. स्वप्नाप्रमाणें दिसणारें नामरूपात्मक जगत् मृगजळाप्रमाणें

किंवा दोरीच्या सर्पाप्रमाणें आहे, व श्रवण-मननानें निःसंशयपणें ठरलेलें जिवाशिवांचें एकत्व मात्र सत्य आहे असें धारणा लावून चित्तानें जीवशिवैक्यध्येयाचें निरंतर चिंतन करणें तें निदिध्यासन होय. ह्या ध्यानानें विपरीत भावना नष्ट होते. मग नामरूप कुल-जातिसंबंध सोडून देहाला मी म्हणतात त्याप्रमाणें शिव परमात्मा मी आहें असें दार्ढ्य होऊन झोंपेप्रमाणें सर्व विसरून जाणें ही उपरती [ निर्विकल्पसमाधि ] होय. ह्यानें कृतकृत्यता येते. पुनः जन्म होत नाहीं. ज्ञानसमकालच मुक्ती आहे तरी लोकदृष्टीनें यावत्प्रा-रब्ध देह राहो, एक वेळ आवरणभंग झाल्यावर पुनः देहादिकांचा तादात्म्याध्यास होत नाहीं, हेंच बोधाचें वैभव. अभ्यासानें बोध दृढ करून मनोभंग, वासनाक्षय ज्यांनीं केला त्यांला ही जीव-न्मुक्ती मिळते. विशेष काय सांगावें, एक वेळ आत्मसाक्षात्कार झाला म्हणजे मोह, शोक रागादि नष्ट होतात, संशय फिटतात, हृदयग्रंथी तुटतात, जन्ममरण देणारीं कर्में खुंटतात, सर्व पाश तुट-तात. मग तेथें कर्तृत्व, भोक्तृत्व, पापपुण्य पुढें कोठून येणार ? ह्याप्रमाणें ह्याच डोळ्यांनीं जीवन्मुक्तीचा हा सोहळा ज्यांनीं अनुभ-विला त्यांचें प्रारब्ध संपल्यावर पिकल्या पानाप्रमाणें देह कोठेंहि पडो, प्राणोत्क्रांती होणार नाहीं. तापलेल्या दगडावर टाकलेल्या पाण्याप्रमाणें सर्व कळा स्वरूपांत लीन होतांच पूर्वीं ब्रह्मच असून जीवपणा भ्रमानें आलेला तो ज्याचा गेला असा तो ब्रह्मच होतो. हें सारांशभूत वेदांत-तात्पर्य सांगितलें आहे. आतां ह्यापुढें सांगण्याचें व ऐकण्याचें राहिलें नाहीं. असें म्हणून गुरुजी स्तब्ध राहिले, तें

पाहून मुलगी चकित होऊन केलेल्या श्रवणाचें मनन व निदि-ध्यासन करून चिरकाल समाहित होऊन स्वानुभूतीनें गाते.

## पद

मी चमकुन गेल्यें होतां ज्ञान ॥ ध्रु० ॥ नरनारी नगर विचित्र। स्थावरजंगम जें सर्वत्र। पाहत होते ते हे नेत्र, गेले भुलोन ॥ १ ॥ अहो मी झाल्यें सैरावैरा। आतां कैची येराझारा ॥ अंजुळि दिधली म्यां संसारा, सार घेऊन ॥ २ ॥ देहीं असतां विदेहस्थितिनें। जितेपणीं मी मरून गुरुनें। कथित ज्ञानाग्निज्वाळेनें, मोह जाळून ॥ ३ ॥ पूर्वघराला टाळा खोविला। स्वानंदानें खोपा भरिला। अंजुळि दिधली कुळशीळाला, अजिचा सुदीन ॥ ४ ॥ आतां निःसंगचि होऊन। जनलज्जेलाही दवडून। परपुरुषाला आलिं-गोन, धिंगडा घालीन ॥ ५ ॥ कोणी म्हणोत मजला वेडी। परि मी आवृतिसाडी फेडी। भर लोकांमधिं नागडी उघडी, फुगडी घालीन ॥ ६ ॥ पूर्णानंदाची घागर। हातीं वेघोनी हुंकार। करि काढोनी उंच स्वर, फुगडी घालून ॥ ७ ॥ मीच जगाची उत्पादक। मी सर्वांच्या पूर्वील एक। मी अन्नचि मीं अन्न भक्षक, एक होऊन ॥ ८ ॥ इति स्त्रीशिक्षायां तृतीयं प्रकरणं समाप्तं ॥ ग्रंथ संख्या ६००॥

श्रीदत्तात्रयार्पणमस्तु ॥

## बायकांनीं म्हणावयाचें गीत

( चाल—रामाची सीता फलपुष्प )

**प्रश्नः**—अग तूं अससी कुणाचि कोण गे बोल जासि कुठें अबले। इथं आलिस कोठुनि भले ॥ मायबाप भादलें कोण तुझा

पति आपलें ॥ जात गोत्र तुवां जाणिलें असलें तरी तें बोले ॥ तुवां काय कृत्य योजिलें ॥ आजपावत काय काय केलें ॥ तुज असें पुसिलें ॥ उत्तरऽदे हें चांगलें ॥ नातरी पुढें चाले दत्तदास येथें बैसलें ॥

( चाल–माझे हातीची मुद्रिका )

**उपदेशः**–तुझें हित मीग बोलें ऐक । जेणें पावसि इहपर सुख । सत्यसत्यचि घेग भाक । न करीं बाहेर ठाकठीक ॥ १ ॥ रूप लावण्य सौंदर्य । असतां आंगि माधुर्य । देखे जातां नभिंहि सूर्य । होईल तो गतिवीर्य ॥ २ ॥ वृंदा निजधर्माहुनि मुकली । अहल्या साध्वी ही शिला झाली ॥ लंकाधीशें सीता नेली ॥ ब्राह्मी जनकें पळविली ॥ ३ ॥ तेव्हां बाहेर तूं होई । भूतराहीं अंतरीं ॥ साधन-युता तोषवि धर्मे तुं निजकांत ॥ तेणें तारील तुज दत्त ॥ ४ ॥

## पद

बाई सांभाळी आपुला हरी ॥ बाई सत्पदरज माखि आतां ॥ धृ० ॥ बाळपणी त्वां उपयम केला । परी शास्त्रा न तो मानला ॥ तरी त्यजीं महामोहभर्त्याला ॥ बाई० ॥ १ ॥ कंठी असुरभाव तंतु हा धरिला तो अशिवचि पहा टांकी तोडुनि न विचारी ॥ अहा बा० ॥ २ ॥ त्रिगुणात्मक गांठ पल्लविं कुणि बांधिलि सोडि ती हवी जरी पूर्णसुखाची पैरवी ॥ बाई० ॥ ३ ॥ आतां प्रवृत्ती कुंकुम फांस । धरी निवृत्ती तीलकाचि आस। लाधे तरीच तुज मुक्ती रपासा ॥ परपुरुष नवरा करीं । सुमन रोजीं रति घे बरी ॥ मग उन्मनी झोंप घे बुरी ॥ बा० ॥ ४ ॥ आपणा तूं म्हणवि न रजस्वला ॥ अथवा

तूं म्हणविग पांसुला । परी होसि प्रिय न हरिला ॥ बाई० ॥ ५ ॥

## साध्वीधर्म पद

( चाल–पार्वती पूसे महादेवासी )

आतां करुनि एकाग्रता परिसा साध्वी धर्मा । एका भावें तो आचरितां तुम्हां देईल शर्मा । नर्मा जोडुनि कर्मा उलंडुनि स्वरुपीं रहाल डसुनि ॥ ऐके हो साजणी ॥ धृ० ॥ १ ॥ दो नवऱ्या जी भजे नारी ती ह्या लोकीं असती । इह लोकीं ती घेई अकीर्ति मेल्या-वर दुर्गति । जे जे पहाती ते ते म्हणती छि थु मरो ही असती ॥ ऐका० ॥ २ ॥ मरतां असतीस बांधुनि नेती यमदूत देउनि मारा । मारा भजलि म्हणुनि न थारा कोण न देती पितरां । घेउनि संगे पूर्वाऽपरो नरकीं पडे अवधारा ॥ ऐका० ॥ ३ ॥ साधुगुरूची हो तूं कन्या मग तूं होसिल साध्वी । मृदू मनाची सिंधुदयेची होउनि वाणी माध्वी । बोल बाई मोल कांहीं तुझे मग नोहे साध्वी ॥ ऐका० ॥ ४ ॥ संसार सासुरा तुज नेदी थारा आतां वळ माघारा ! सद्विचार माहेरघरा भीडभाड सोडुनि परा । पुरुषासंगे धिंगडा घाली त्याहुनि नाणी मनि दुसरा ॥ ऐका०॥ ५ ॥ काया वाचा मनें करुनि पर-पुरुषा तूं भोगि । आठ प्रकारें संशय सोडुनि होशिल मग तूं वेगीं । धन्य जाण मान्य बाई जेवीं या जगीं योगी ॥ ऐका० ॥ ६ ॥ मायावरण लुगडीं फेडीं त्रिगुणवेणी सोडी । पापपुण्य सूत्र तोडी घे चवघांत उडी । कांतपदाची गोडी न दवडी आवडी आन बाई खंडी ॥ ऐका० ॥ ७ ॥ परावरतु देखसी जरी तरी हृदयग्रंथी तुटती ।

तेंव्हांच जे माये सकळहि संशयघट फुटती। ऐशा धर्मं लपतिल कर्मं दत्तोऽप्यभितस्ते ह्यटति ॥ ऐका० ॥ ८ ॥

## कामशमन

( चाल–उद्धवा शांत० )

बाई ठाकम ठिक्का मोठा। कां दाविसि थाटामाटा। आतां अमुचि न करीं थट्टा। आम्हीं धरील्या उपरतिवाटा ॥ चाल ॥ तांबुलें लालि आलि ओंठा। आंगि दाविसि यौवनताठा। कां मिरविशी शृंगार थाटा ॥ व्यर्थचि हा तव श्रम मोठा ॥ १ ॥ कां उगिच सरकविसी पदरा। कां करा करीसी न भारा। मिळे येथें क्षणभर थारा। चमकविसी व्यर्थचि हारा ॥ चाल ॥ रुप लावण्याचा भारा। तर्तरेचा अलंकारा। न भुलो या अयि निःसारा। संसार त्यजिला जो खोटा ॥ २ ॥ तूं म्हणसी असिं मीं न इच्छीं। परि करवी कुण बळें पच्ची। सुनो बात मायीं हैं सच्ची। तेरी परीग असमि तूं कच्ची ॥ चाल ॥ नेणसीग कामक्रोधाची। हे शक्ति तव मति आंचि। हे करील तुजला लुच्ची। साचि होईल दे खोटा ॥ अयि० ॥ ३ ॥ हा राजस खादड पापी। वैरी हा पहा बहुरुपी ॥ हा घालिल तुजला टोपी ॥ दुःपुरचि हा जग चेपी ॥ चाल ॥ हा विद्वद्धैर्या लोपी। हा तुमचीं पुण्यें कापी। हा तुमची थोरीव दडपी। कोपरुपी रोखी हा करटा ॥ अयि० ॥ ४ ॥ इंद्रिये आणि मन मति हे। तिनही किल्ले असतिग तूं हे। ठेवि स्वाधिन आन न पाहे। रंगरुपा भुलु नको मोहें ॥ चाल० ॥ दुजाशत्रू कमासमनोहे। हा तुजला

देईल पोहे ॥ तस्मात्त्वं जत्यबले हे । हरीभक्त्या हि बलिष्ठा ॥ ५ ॥ अयि कामचि करी तोटा । तुज दाविल जनिमृतिवाटा ॥ धृ० ॥

## प्रबोध

प्रबोध पहाट बाहेर जहाली उघडीं विवेकलोचना, उठीं उठीं सत्वर बाई सोडिं या मायाशयना, सरली अविधि निशा आतां गाढतमा उरविना, गुरुप्रसाद अरुणोदय हा सांवर साधनवसना ॥ १ ॥ उठी उठी सत्वरबाई सोडिं या मायाशयना, सृष्टिक्षणापासुनि येवढा काळ गेला तुज कळेना, येतों मीग काकुळती असमंजसहें पाहावेना, किती ढळवूं उठगे आतां उघडी विचारलोचना ॥ धृ० ॥ ठाई ठाई स्वानुभवज्योती पाजळील्या ब्राह्ममुहुर्ती, द्वैत चुळ भरुनि ओतीं भ्रांती जेणे मग नुरती, दृश्यभास तारापंक्ती जेथचा तेथचि लपती जीवचंद्राचीहि दिसी हळुहळु पाहें लपती ॥ २ ॥ उठी० ॥ भेद-कांडप कांडुनि बाई जन्ममूळ दळप दळी, सुटलीं मनवासुरें पळतील दूर तीं आकळीं, इंद्रियगाई निर्गुणवनी सोडूनि दे ह्या वेळीं, मग कामादिक चोरांची पर्वा न ये तुज बाळी ॥ ३ ॥ बाई विज्ञानार्क-उदेता देहधी धुकें लपति, वैराग्य किरणें पडतां विषय कुमुदें वाळती, आशा तृष्णादिक आलि त्या मधि आपोआपचि मग मरती, परी मूढ मृगां विषवमृगतृष्णा भ्रमवी ॥ ४ ॥ उठी० ॥ तेव्हां आतां सोडुनि भ्रांती सावधान चित्त करावें, वासना शेजारीण ईर्ष्या गृहा नच जावें, तत्त्वज्ञान निजगृहकृत्य स्वानुभवगेही करावें, मग मन भंगुनि तुवां लवकर दत्तमय व्हावें ॥ ५ ॥

## सोंवळें

( चाल--उद्धवा शांतवन० )

पडे सूत्रावरी जरी चरण। तरी तुज ये ओवळें पण। मग न्हासी भडाभड पण। तुज असतां सोंवळेंपण। जरी विरुद्ध बोले कोण। लागलाच तुज ये शीण। चडफडसी अग हे कोण। सोंवळें मानि पूर्ण ॥ चाल ॥ वासना हे चांभारीण। आशा तृष्णा म्हारीण जाण। ममता हे पाहे डोंबीण। रजकिण हे ऐशी अहंता ॥ असे० ॥ १ ॥ एकभुक्त नक्त करिशी। हरिवासर एकादशी। हविष्यान्नें चातुर्मास खाशि। सेविसि नित्य तुळसी। देह शोषुनि निर्मळ होसी। ब्राह्मणा वाण देसी। मनु जपसी तीर्थें न्हासी। परि शुद्धि नसे तुजपाशीं ॥ चाल ॥ कामक्रोधा धेंडा शिव होशी। दंभ लोभ मांग-मानसी। मदमत्सर ह्मारां धरिसी। ह्या संगें शुचि कशि होसी ॥ असे० ॥ २ ॥ कांती पाहुनि खवळे। काय करी भरजरी सोंवळें। मन विषयां पाहुनि पळे। काय करितां आचार बळें। अहंकार गौरविं उसळे। कशि येति हातीं फळें। ईषणीच चित्त वळे। स्वच्छता कशि मग मिळे ॥ चाल ॥ देह तापे संतत पोळे। शिण येतां जिव खंवदळे। नसतां सुख मुख वाळे। मग ढळे जनी मृती कैसी ॥ ३ ॥ बाई अससी अशी तूं द्वाड। हे सांड वाईट खोड। न करी तूं अशी बडबड। निगमान्त्रि धरी वरी भीड। बोलाचि मनि नाणी तीड। स्वहिताची तुज असो चाड। आतां ममता अहंता सोड। सदसद्वस्तु नाड ॥ चाल ॥ कामादिक अरि करीं आड। आतां सत्संगती सती जोड। हरी चरणीं धरी आवड। मग

तूं सोंवळी होसी ॥ ४ ॥ अत्यंत मळकट देह। पापपुण्याचें एक गेह। अस्थिमांसरुधिरसमूह। कफपित्तवातव्यूह। तूं न धरी यावरी मोह। येथें घे तूं ऐसा ऊह। अत्यंत निर्मळ देह। धरसी चित्सुख संदोह ॥ चाल ॥ महदंतरमनयोराह। वेदस्तज्ज्ञानेनेह। शोध्यं तेन शुचित्स्वं ह। दत्ताला प्रियतम होसी ॥ ५ ॥ असें कैसें सोंवळें करिसी दुजा शिवतां ओंवळी होसी० ॥

## सौभाग्यसुंदरी पद

( चाल—उद्धवा शांत० )

सौभाग्य सुंदरी गौरी। दौर्भाग्य माझें वारि ॥ धृ० ॥ जसि शंकर तुजवर प्रीती। ठेवितो संतत चित्तीं ॥ पती मजवरि प्रीती। तसि ठेवो संतत सुमती ॥ चाल ॥ सौभाग्य सुंदरी गौरी। गिरिधर शंकर नारी। परिहरीं दुःखें सारी। मज धरी स्वकरीं गौरी ॥ १ ॥ मम भर्ता वल्लभ होयी। ऐसा तूं मज वर देई। सौभाग्य अक्षय देईं। रूपही उत्तम देईं ॥ चाल ॥ यश देईं भाग्यहि देईं ॥ पुत्रपौत्र उत्तम देईं। धनधान्य अक्षय देईं। सर्वकाम दे ईश्वरी ॥ २ ॥ वदली अरुंधती ऐसी। ख्यात्याख्यभृगुपत्नीसी ॥ मग ख्याती प्रार्थी तीसी। फळ आलें यास्तव ऐसी ॥ चाल ॥ भाव ठेवुनि निजमानसी। जी नारी प्रार्थी-तीसी। सौभाग्य सुंदरी खुशी। होईल हे मनि निर्धारी ॥ ३ ॥

## प्रार्थनाश्लोक

सौभाग्यसुंदरीं वंदे गौरीं गिरिशवल्लभाम् ॥
सौभाग्यमक्षयं देहि भर्तुर्वल्लभतां मम ॥ १ ॥

रूपं देहि यशो देहि भगं भगवति देहि मे ॥
पुत्रान् देहि धनं देहि सर्वान्कामांश्च देहि मे ॥ २ ॥

## सासुरवास पद

( चाल–अहारे कृष्णा० )

अहा मायबापा लोटुनि देशी । मज दिन-निशीं सासुरवाशीं ॥ धृ० ॥ चिंतोबा मामाजी फजिती माजी । करिती प्रवृत्ती सासू मज भाजी । अहा० ॥ १ ॥ तृष्णा हे नणदूली लावालावी भली करी । लावी कली आपण हो भली ॥ अहा० ॥ २ ॥ चावट दीर हे काम क्रोध लोभ ॥ शांतीशेजे घरीं जातां देती क्षोभ ॥ अहा० ॥ ३ ॥ वन्सानी माझी पुरविली पाठ ॥ रति आकाबाई पाडिती फूट ॥ अहा० ॥ ४ ॥ किती करूं धंदा किती काढूं चेंदा ॥ माहेरीं एकदां ने मज गोविंदा ॥ अहा० ॥ ५ ॥ समाधान भोजन नच एक दीन ॥ न मिळे येथें दीन झालें निशिदीन ॥ अहा० ॥ ६ ॥ उपकार कोणा न येचि करुणा ॥ अहंकार टोणा पती मारी तरुणा ॥ अहा० ॥ ७ ॥ बाबा आतां होतें मी निःसंग ॥ पर पुरुषाचा करुनियां संग ॥ अहा० ॥ ८ ॥

( चाल–सिंदूर भरिला भांगीं कुंकु० )

दत्ता ये लवकरी ॥ वाट पाहें मंदिरीं ॥ धांव घे झडकरी ॥ मज धरिं पदरीं ॥ गांजिलें संसारीं । सुख नसे तिळभरी । अपराध बहु जरी । करिं परि अंतरीं ॥ न धरीं नरहरी । मजवरि कृपा करीं । प्रवृत्ति सासु मारी । कसि वांचु घाबरी । तृष्णा ही वन्सां भारी । जाचिते परोपरी । काम भावोजि हरी । गांजि निरंतरी ॥

मन मामजि दूरी। फिरवि क्षणभरी। विसांवा नेदि भारी। भ्यालें मीं अंतरीं ।। अशि कशी या घरीं। काळ कंठु यापरी ।। बोलाहो ह्या उपरी। राहति शरीरीं। प्राण केवि सुंदरी। मी विटें यापरी ।। समजुनि मनिं हरी। जाच हा त्वरा करीं। भेट देई नरहरी। गांठ पडे तुझि जरी ।। मग त्या अवसरी। हीं भिवुनी सारीं। माकडें कुठें तरी। लपतिल निर्धारी। मग तुझ्या जिवावरी। सुखि मि निरंतरी ।। १ ।।

( चाल–ऐका शोणितापूरीं बाणासूर० )

जया रूपीं ठकली वेदवाणी ।। तया दत्ता जोडितों दोन पाणी ।। धृ० ।। व्यर्थ माझे वाणीला दिधला शीण ।। जया रूपा नेणती वाणी निपुण ।। प्रजाकाम धन योगें या धरी कोण ।। प्राणा जिंकुनि ठकले परि ज्या नेणें कोणी ।। १ ।। आत्यंतिक सुखसच्चिद्रूप अभेद ।। हा वेदांत सिद्धांत निर्विवाद ।। हेचि स्मरतां भजतों सोडुनि खेद ।। बुद्धिग्राह्या अतींद्रिया ऐक्यपणीं ।। २ ।। तो हा दत्त मजहूनी दूर नसे ।। सर्वांनरीं साक्षित्वें एकचि विलसे ।। त्याहुनि कधिंही मीही भिन्न नसें ।। ऐसें वेदें ठरतां कैंची माय भेणी ।। ३ ।।

( चाल–आम्हां घरीं ग पाहुणे )

( समयाळु किति आला ग तुझा पती )

जरी यावे पाहुणे घरीं। प्रेमसडामार्जन करीं। मग येती नरहरी ।। १ ।। आण वेगें आवडी जळ। भक्तिभूषा सुविमळ। आणि सुमनाची हो माळ ।। २ ।। अहंकार धूपजाळ। उजाळीं सोहं दीप-माळ। खाद्य सर्वस्व रसाळ ।। ३ ।। नवविध भक्ति नवू। पक्वान्नें

करी मवू । दत्त हर्षे देखुनि बहू ॥ ४ ॥ सावध तूं आतां दळूं । आरंभींग हळू हळू । गाइं दत्ता जो दयाळू ॥ ५ ॥ श्रद्धाभक्ती जोडुनि पेडें । वैराग्य खुंटा दृढें । धरि साधन बळें ओढे ॥ ६ ॥ दळूंग बाई दळू । संचितक्रियमाण दळूं । प्रारब्ध शेष ते चाळूं ॥७॥ दळूंग बाई दळू । जन्म मरण हे दळूं । स्वाधिष्ठानीं तत्त्वें गाळूं ॥ ८ ॥ दळूग बाई दळूं । उपाधि सकळहि दळू । तीन्हीही गुण ते गाळूं ॥ ९ ॥ दळू ग बाई दळूं । निःशेष सकळहि दळूं । जेणें येथें पुन्हां न दळू ॥ १० ॥ कर्म भोगा दळतां हाता । खेदफोड उमटे मोठा । विवेकें जिरवी खोटा ॥ ११ ॥ ऐसे गातां दळतां दळतां । दत्ता किव आली मग जीवता । हरुनी दे सायुज्यता ॥ १२ ॥

( चाल—चल सखये पाहुं हरि तो गोकूळी काला झाला खेळता कृष्ण आला )

नर जन्मा येउनि पूर्वीं कर्मं केली न बरवीं । दणवीली भारें उर्वीं ॥ १ ॥ मातापीता इष्टभ्राता उपदेष्टा दाताभर्ता । भयहर्ता चुलता ज्ञाता ॥ २ ॥ सकळांयां द्वेषी निंदी वाग्बाणें हृदयें भेदी । विषयसुखीं सदां आनंदी ॥ ३ ॥ कुळाकूळ न विचारी । भक्ष्याभक्ष्य न निर्धारीं । असि विटें मी यापरी ॥ ४ ॥ कायीक अणि वाचीक । मानसिक सांसर्गिक । केले हो म्यां बहु पातक । स्पृष्टास्पृष्ट ज्ञाताज्ञात । भुक्ताभुक्त पीतापीत । करिं पापें मी सतत ॥ ६ ॥ सर्वपाप अति पाप । बहुपाप उपपाप । आचरीं मी पापरूप ॥ ७ ॥ अणि संकलीकरण करि मलिनीकरण जाण जातिभ्रंशकरण प्रकीर्ण ॥ ८ ॥ प्रमादेंहीं घडलीं कीती । बुद्धिपूर्वक अमित होती । अत्यं-

ताम्यासें कीती ।। ९ ।। ऐसिं पापें करिं मी परी। तिळभरी नभि अंतरीं। विषयसुखविरह न करीं ।। १० ।। मग भोगें उठले रोग ।। देह झाला कृश बेरंग। श्वासें कासें हाले आंग ।। ११ ।। माझे माझे ज्यां ज्यां म्हणे। टाकिले मज त्याणें त्याणें। यमदूतीं केलें पेणे ।। १२ ।। शतवृश्चिकदंशव्यथा। होयि जेवी तेविं सर्वथा। लिंग-देहा ओढिता व्यथा ।। १३ ।। यममार्गीं जी जाचणि। वैतरणी जी दे भेणी। कशी सांगावी ती कोणी ।। १४ ।। बहुपाशें बांधुनि नेती। तप्तधूळी पाया जाळिती। रविकिरणें खर पोळीती ।।१५।। शंकुतुल्य कंटक रुतती। क्षुरधारासम शिळापंथी। पाय फाळूनी टाकीती ।। १६ ।। शिलावृष्टी वज्रवृष्टी। ज्वलदंगाराची वृष्टी। पडे तप्तजलवृष्टी ।। १७ ।। काकगृध्र बहु डोचीती। सूचिमुख किडे डसती। अग्निसमा वायु जाळीती ।। १८ ।। कोठे खात कोठें गर्त। कोठें पीडे शीत ध्वांत। ऐसा कष्ट यमपंथ ।। १९ ।। रक्तपाणी वैतरणी। गर्जताती ऐकुनि प्राणी। हाहाकारें पिटिती धरणी ।। २० ।। द्विजां अंतीं कृष्णगोदान। न देति त्या गरि लावून। दून नेती जेवीं मीन ।। २१ ।। अस्थिमांसरक्तरूपीणी। घोरकाया वैतरणी। तरावी हे कैसी कोणी ।। २२ ।। यममार पुढें दारुण। सोसिल तो केविं कोण। दैवयोगें नये मरण ।। २३ ।। कर्वतीनें कातरती। तप्तभूमीवरी लोळवीती। कुऱ्हाडीनें बळें तोडीती ।। २४ ।। कढईंत घालुनि तळति। रगाड्यांत रगडीती। त्रिशुलानें हृदय भेदीती ।। २५ ।। तप्ततैल पिववीती। वृक्षावरी उलटा टांगिती। आतां बोल मार कीती ।। २६ ।। चवऱ्याऐंशींलक्ष नरक। त्यामध्यें

जें घडे दुःख। त्याचा कोण कसा करि लेख ॥ २७ ॥ ऐसि यातना भोगोनी। पापशेषें नानायोनी। भोगि पराधीनपणीं ॥ २८ ॥ थंडी ऊन पाउसपाणी। वारा बावटळ सोसूनी। घेण्यासाठीं तिर्यग्योनी ॥ २९ ॥ शुभाशुभ सम होतां। पापचिन्हें घेऊनि नरता। लाधली हे मजला आतां ॥ ३० ॥ मातापित्याच्या संयोगें। रक्तवीर्यें कर्मभोगे। उपजली प्राक्तनसंगें ॥ ३१ ॥ मातृगर्भीं मळमूत्रांत। लोळलीं जरापुवीत। जाळी जठराग्नि सतत ॥ ३२ ॥ ऐसे जातां मास सात। ज्ञानार्क झाला ऊदीत। मग सर्व झाले स्मृत ॥ ३३ ॥ तेव्हां निश्चय केला दत्ता। करि येथुनि मुक्ती आतां। मग सेवीं तुज मी कांता ॥ ३४ ॥ मग देवें मुक्ती केली। तेव्हां अकस्मात झाली। अविद्या रात्र भली ॥ ३५ ॥ मोहमयी मदिरा प्याली। मायाशय्येवर निजली। संसारस्वप्नें पाहिलीं। आज उदेलें प्राक्तनपुण्य। तुष्ट झाला दत्त शरण्य। दत्तदेव जो वरेण्य ॥ ३६ ॥ ज्ञानपहांट आतां झाली। निद्रा कांहीं कडसरली। मग दळूं आरंभली ॥ ३७ ॥ जन्ममूळ दळप दळूं। अणि मरण पुढें टाळूं। आत्मीं मी ह्या स्वरुपा पाळूं ॥ ३८ ॥ अहंकार दळप दळूं। मायावरण पीठ गाळूं। विक्षेप स्वरुपा घोळूं ॥ ३९ ॥ उपाधी दळपा दळूं। द्वैत पीठ मग तें तळूं। शुद्ध सत्त्व स्वरुपा पाळूं ॥ ४० ॥ ऐसे दळप बाईग दळूं। निःशेष सकळहि दळूं। सर्व ब्रह्म असें सांभाळूं ॥ ४१ ॥ असें दळतां अविद्या रात गेलि विज्ञानार्क उदेला। जीवचंद्र दडपला ॥ ४२ ॥

( चाल—पांच पोळिया तीन भाकरी० )

श्रुति सासु इशा सासुरा । सच्चिदात्मा तुझा नवरा । तूं आलीस या संसारा । स्वानुभवा घरि तुझा घरा । नव न जा अभिमान माहेरा ॥ १ ॥ साजणी उपदेश हा बरा ॥ धृ० ॥ देहात्मधी परदारा । सोडि झाडी अविचारकेरा । क्षमा सडा दे या घरा । भरुन्ठेवि अहिंसा निरा । लेईं देहिं भक्त्यलंकारा ॥ साजणी० ॥ २ ॥ श्रद्धा जळीं स्नान आचरा । न्हीवसना परिधान करा । सत्क्रिया रांधप करा । तेंचि वाढा परमेश्वरा । यांत कसोरी नच आचरा ॥ साजणी० ॥ ३ ॥ वैराग्य कुंचा धरा । तुम्ही झाडा इषणा केरा । ज्ञानदिवा उजळा बरा । आतां सुमनसे जप ससा । स्वात्मसुख दे मग नवरा ॥ ४ ॥

( चाल—मंडपी बैसले नवरीचे भाऊ० )

साजणी परिसें तूं सौख्य हेतू । दृढ राहे धर्म सेतू न घडेग मंतू । धर्म केतू भला हा ॥ १ ॥ आदि सोमा त्वां वरिला । मग गंधर्वाला तिजा अग्नि पति केला । मग मनुष्याला परि तुला न सूख ॥ २ ॥ दागिनेग सुरेख भोजन चोख चोळि लुग्डीं थळीक । धन-धान्य लेंक बहुपरि ऊणें सूख ॥ ३ ॥ चुकलें याचें मूळ ऐक पर-पुरुषा देख विद्यमान सुरेख हाचि नाथ एक संनिध नित्य असे ॥ ४ ॥ या देहीं विलसे सर्वदा भासे रत्यर्थ देतसे तो रमण तो दीसे । शोधितां कोश पांच ॥ ५ ॥ होतां याची भेट साच लाभे सर्व हाच चराचरनिच उंचग अन्य नच याहुनि सत्य जाण ॥ ६ ॥

श्रद्धाभक्तिज्ञानपूर्ण नसतां हा रमण न दिसेचिग म्हणोन साधी हे आण दत्तदेवाची तुज ॥ ७ ॥

( चाल—जयदेवी अन्नपूर्ण० )

लक्ष दे दत्तचरणीं सुविचार मनिं आणीं ।। परिसें साजणी उपदेश तुज कोणी ।। १ ।। केला कां तूं राणी होवुं पाहसीं झणीं । कशाला फणिवेणी व्यर्थ लुगडीं लेणीं ।। २ ।। यमपाश हा मणी तोडिल कि ऊन पाणी चुकविल मार भेणी बोल आतां रमणी ।।३।। टिळे उटि जाचणीं शमविति कीं अणि भुललिस चुडेकंकणी गौरव भरणीं ।। ४ ।। परतविन दूतां क्षणीं, भुलुं नको तूं झणीं, मायबाप भावभेणी । मुलेंसुना व्याहि वेणी ।। ५ ।। धणि तुझे नहे कोणी । जाचतिल खाणि पिणि। देहही पडे धरणी । एकलाचि मसणीं ।।६।। उघडे नाघडेपणीं शुभाशुभ करणि लागे मागे तूं पाणी जोडुनि गाऱ्हाणीं सांग गे दत्त चरणीं तोचि हरे भावभेणीं ।। ७ ।।

( चाल—पंचमी बुधवारी पुष्य नक्षत्र० )

बायि गायी बघ या पांच त्याची पाहे पांच पांच वासुरें वळखी साच ।। १ ।। एकाहून एक गूणी त्या प्रत्येक भिन्न वर्णी ओळखी धरुनी खूणीं ।। २ ।। पैलि निळी हं बीजपाळी दुजी धूम्रायं सांभाळी तिसरी रंबीजपाळी ।। ३ ।। वंबीजा टवळी चौथी पांचवी पिवळी लंवती ह्या पांचा वळखी चित्ति ।। ४ ।। प्रतिशब्द पहिली करी दुसरी सोंसों उच्चारी भूगूभूगू तिसरी करी ।। ५ ।। बुलूबुलू चवथी बोले पांचवि कडकडा बोले ह्या शब्दा धरि तूं बोले ॥ ६ ॥

वदे पहिली स्पर्श दूजी सर्वां दावी स्वरूप तीजी चवथी दे गोडी गाजी ।। ७ ।। पंचवी सुवासिक घ्यावि ह्या वळखुनि एकएक पावसी मग तूं सूख ।। ८ ।। सत्ता दूध काढुनि यांचें जरि तें हृदयीं तुझे साचें दर्शन होय तुज दत्ताचें ।। ९ ।।

---

स्त्रीशिक्षा समाप्त

॥ श्री ॥

# टेंभेस्वामीकृत

# प्राकृत मनन

---

## अध्याय पहिला

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसद्गुरुदत्तात्रेयाय नमः ॥ अथ मननसारग्रंथ-प्रारंभः ॥ कोणी एक ब्राह्मणकुलोत्पन्न अधिकारी सच्छिष्य सद्गुरूला शरण जाऊन प्रश्न करितो.

**शिष्यः**—श्रीसद्गुरो, मनुष्यजन्माला येऊन कोणता पुरुषार्थ करावा ?

**गुरुः**—धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ होत. यांतून शेवटला मोक्ष हा परम पुरुषार्थ होय. कारण तो नित्य आहे म्हणून तोच साधावा. ( तो पुनरावृत्तीला जात नाहीं ) अशी श्रुती आहे. आणि इतर जे तीन ( धर्म, अर्थ, काम ) यांना अनित्यत्व आहे. जशी येथें प्रासाद, घरें, वगैरे निर्माण केलेलीं कालांतरीं नष्ट होतात, तसें पुण्यानें संपादन केलेले स्वर्गादिलोकही क्षीण होतात अशी श्रुती आहे.

**शिष्यः**—तो मोक्ष कशानें मिळेल ?

**गुरुः**—ब्रह्मज्ञानानें त्या आत्मस्वरूपाला जाणतात ते मृत्यूचा अतिक्रम करून जातात. मोक्षप्राप्तीला ज्ञानावांचून दुसरा मार्गच

नाहीं. जो ज्ञानानें ब्रह्मस्वरूपाला जाणतो तो त्याच परब्रह्मरूपीं ऐक्यभावानें लीन होतो इत्यादि श्रुती बोलतात.

**शिष्य:**—तें ब्रह्म कसें जाणावें ?

**गुरु:**—अध्यारोपापवादानें सर्वसंग सोडून जाणावें. (अध्यारोपापवादानें ब्रह्म जाणिलें जातें) असें पूर्वाचार्यांचें वाक्य आहे. (कर्मानें, प्रजोत्पादनानें, किंवा धनानें मोक्ष होत नाहीं. कित्येक सर्वसंगपरित्यागपूर्वक ज्ञानानेंच मुक्त जाहले.) अशी श्रुती आहे. तेव्हां अध्यारोपापवाद अवश्य जाणावे.

**शिष्य:** —अध्यारोप म्हणजे काय ?

**गुरु:**—शिंपीवर रजत; रज्जूवर सर्प; दगडावर चोर जसा भ्रमानें भासतो, तद्वत् निष्प्रपंच ब्रह्मस्वरूपीं प्रपंच भासतो. तो अध्यारोप होय. त्यालाच अविद्या, तम, मूलप्रकृती, प्रधान, गुणसाम्य, अव्यक्त आणि माया असें म्हणतात. त्यांतून रक्त, शुभ्र, कृष्णवर्ण सुताच्या दोरीसारखी रजःसत्वतमोगुणरूपा मूलप्रकृती जाणावी; इलाच महासुषुप्ती आणि प्रलय म्हणतात. इचे ठायीं प्रलय कालीं स्वकर्मवासनारूपानें अनंत कोटि जीव लीन होतात. हा अनुभव निद्रेमध्यें प्रत्यहीं येतो. सृष्टीकालीं ती मूल-प्रकृती, जीवकर्में परिपक्व दशेला आल्यामुळें माया, अविद्या, तामसी अशा तीन रूपानें प्रगट होते. विशुद्धसत्वप्रधान माया तिचे ठायीं जें चैतन्य प्रतिबिंबित होतें तोच सृष्टीच्या पूर्वी ईश्वर होतो. त्याला अव्याकृत व अंतर्यामी म्हणतात. तोच जगत्स्रष्टा पूर्णब्रह्मचैतन्यरूपानें तामसीमध्यें प्रतिबिंबित होऊन पंचभूतरूपानें जगाला उपादान कारण

होतो. जसा कोळी तंतूला निमित्तोपादान होतो, तसा ईश्वर स्वप्राधान्यानें निमित्तकारण, आणि स्वोपाधीनें उपादानकारण होतो.

**शिष्य**:—हा ईश्वर सृष्टी कशी करितो ?

**गुरु**:—सत्व शुद्धितारतम्यानें अविद्या अनंत रूपिणी होते. तिचे ठिकाणीं प्रतिबिंबित जीवही अनंत होतात. ह्या जीवेश्वराची व्यष्टीरूप अविद्या समष्टीरूप मूल प्रकृती होय. हींच त्याचीं कारणशरीरें होत. हाच आनंदमय कोश जाणावा. या प्रकारें कारण सृष्टी जाण. आतां सूक्ष्मसृष्टी ऐक. मायायुक्त ईश्वराच्या ईक्षणानें महत्तत्व ( बुद्धी ) झालें. त्यापासून त्रिगुणात्मक अहंकार जाहला. त्यापासून सूक्ष्म आकाश, वायू, तेज, आप, पृथ्वी जाहलीं. याला तन्मात्रा किंवा अपंचीकृत भूतें म्हणतात. अनुक्रमें या भूतांच्या सात्विकांशानें श्रोत्र, त्वचा, जिव्हा, नेत्र, घ्राण हीं ज्ञानेंद्रियें झालीं. व सर्वांचे सात्विकांश एकत्र होऊन अन्तःकरण झालें. तें अन्तःकरण मन, बुद्धी, चित्त, अहंकार असें वृत्तिभेदानें भिन्न जाहलें. त्यांतून चित्ताचा मनामध्यें आणि अहंकाराचा बुद्धीमध्यें अंतर्भाव जाणावा. आणि क्रमानें आकाशादिकाच्या रजोगुणानें पृथक् वाचा, हस्त, पाद, गुद, उपस्थ हीं कर्मेंद्रियें जाहलीं; व आकाशादिकांचे रजोगुणांश एकत्र होऊन प्राण जाहला. तो प्राण, अपान, व्यान, उदान, समान असा वृत्तिभेदानें पांच प्रकारचा जाहला. एवं पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, पंचप्राण आणि मन, बुद्धी अशा १७ सत्रा अवयवांचें लिंगशरीर जाहलें. यालाच सूक्ष्मशरीर म्हणतात. हेंच सुख-दुःखादिभोगसाधन होय. या शरीरीं प्राणमय, मनोमय,

विज्ञानमय हे कोश राहतात; आणि स्वप्नावस्था येथेंच अनुभवली जाते. या प्रकारें ही सूक्ष्मसृष्टी जाण. आतां स्थूलसृष्टी ऐक. तमोगुणप्रधान अपंचीकृत आकाशादि पांच भूतें प्रत्येक अर्ध करून प्रत्येकांच्या एका एका अर्ध भागाचे ४ चार भाग करून आपआपल्या अर्ध भागीं न मिळवितां इतरांच्या अर्धभागीं प्रत्येकांचा एक एक अष्टमांश मिळवावा, म्हणजे पंचीकरण होतें. पृथ्वीपासून रोम, त्वचा, मांस, नाडी, अस्थी; आपापासून मूत्र, रेत, स्वेद, रक्त, लाला; तेजापासून क्षुधा, तृषा, निद्रा, तंद्रा, कांति; वायूपासून गमन, धावन, लंघन, आकुंचन, प्रसरण; आकाशापासून काम, क्रोध, लोभ, मोह आणि भय हे पंचवीस होतात. या पंचीकरणापासून ब्रह्मांड आणि त्यामध्यें १४ चवदा लोक व ४ चार जातीचे जीव आणि अनादि भोग्य पदार्थ जाहले. या पंचीकृतभूतजन्य देहाला स्थूलशरीर म्हणतात. हाच अन्नमय कोश होय. या प्रकारें व्यष्टी-समष्टी रूपानें सृष्टी जाहली.

**शिष्यः**—व्यष्टी समष्टी कशी ?

**गुरुः**— निरनिराळे पाहणें ती व्यष्टी, व एकरूपानें पाहणें ती समष्टी. जसें घर किंवा वृक्ष पाहणें ती व्यष्टी, आणि ग्राम किंवा वन पाहणें ती समष्टी. तसेंच एक एक शरीर ( पिंड ) ही व्यष्टी. सर्व शरीरें ( ब्रम्हांड ) ही समष्टी होय. व्यष्ट्युपाधी जीव, समष्ट्युपाधी ईश्वर ( शिव ); तथापि कारण व्यष्टीचा प्राज्ञ, कारण समष्टीचा ईश्वर, सूक्ष्म व्यष्टीचा तैजस, सूक्ष्म समष्टीचा हिरण्यगर्भ; स्थूल व्यष्टीचा विश्व; आणि स्थूल समष्टीचा विराट् हे अभिमानी होत.

हा ईश्वर सत्व, रज, तमोगुणानें अनुक्रमें विष्णु, रुद्र, ब्रम्हा या स्वरूपानें जगाचें पाळन, संहार, उत्पत्ति करितो. ब्रम्हदेवाचा विराट्रूपीं, विष्णूचा हिण्यगर्भरूपीं व रुद्राचा ईश्वररूपीं अंतर्भाव जाणावा अशी सृष्टी ईश्वर करिता जाहला. याला अध्यारोप म्हणतात. हें विक्षेपशक्तीचें कार्य जाणावें.

**शिष्य**:—आवरण शक्तीचें कार्य कोणतें ?

**गुरु**:—ईश्वर आणि ब्रम्हज्ञानी यांना सोडून सर्व जीवांचे पंचकोश आणि आत्मा यांचा परस्पर भेद असतांही तो भेद अंधकाराप्रमाणें जी आवरून ठेविते ती आवरण शक्ती. ही असत्वावरण आणि अभानावरण या दोन रूपानें कार्य करते. त्यांतून ब्रम्ह वस्तू मुळींच नाहीं, असा व्यवहार होतो तें असत्वावरण. आणि ब्रम्हवस्तू मला भासत नाहीं, असा व्यवहार होतो तें अभानावरण. हें आवरणशक्ति कार्यच संसाराला कारण होतें.

**शिष्य**—हें द्विविधावरण कशानें नष्ट होईल ?

**गुरु**:—परोक्ष आणि अपरोक्ष अशा दोन प्रकारचे तत्वज्ञानानें तें नष्ट होतें. गुरुमुखें वेदांतश्रवणानें होणारें तत्त्वज्ञान परोक्ष म्हटलें जातें; हेंच श्रवण होय. या श्रवणानें असत्वावरण दूर होऊन सद्वस्तु आहे, असा परोक्ष बोध होतो. श्रवणानें संशय जातो. मननानें असंभावना, व निदिध्यासनानें ( ध्यानानें ) विपरीत भावना जाऊन देहात्मवत् होणारें जें ब्रम्हात्मज्ञान तें अपरोक्ष ज्ञान ( अनुभव ) जाणावें. यानें आभानावरण नष्ट होऊन आनंदप्राप्तीरूप सातवी अवस्था होते.

**शिष्यः**—सात अवस्था कोणत्या?

**गुरुः**—अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्षज्ञान, अपरोक्षज्ञान, अनर्थ ( शोक ) निवृत्ती, निरतिशयानंदलाभ हा सर्व अध्यारोप होय.

**शिष्यः**—अपवाद कसा?

**गुरुः**—कारणावांचून कार्य होत नाहीं, या न्यायानें रज्जू-सर्पवत् ब्रम्हरूपीं मायेनें भासलेलें जग मुळींच नाहीं, हा निर्धार करणें तो अपवाद होय. ईश्वरोपाधी माया ( मिथ्या ) व जीवोपाधी अविद्या ( नसणारी ) या दोहोंपासून झालेला जगत्भ्रम सत्य कसा? असें विचारानें जाणून ब्रम्हावांचून कांहीं नाहीं व तें ब्रम्ह मी आहें, असें जो अनुबंधचतुष्टयज्ञ अनुभवानें जाणतो तो जीवन्मुक्त होतो.

पहिला अध्याय समाप्त.

---

## अध्याय दुसरा

**शिष्यः**—अनुबंधचतुष्टय कोणतें?

**गुरुः**—विषय, प्रयोजन, संबंध आणि अधिकारी हे अनुबंध चतुष्टय होत. वेदांतशास्त्राचा ब्रम्ह विषय, मोक्ष प्रयोजन, बोध्य-बोधकभावसंबंध, साधनचतुष्टयसंपन्न प्रमाता अधिकारी होय. ब्राम्हणानेंच बृहस्पतीसव, आणि क्षत्रियानेंच राजसूययज्ञ करावा. त्याप्रमाणेंच या अधिकाऱ्यानें वेदांत श्रवण करावा.

**शिष्यः**—चार साधनें कोणतीं?

**गुरु**:—नित्यानित्यवस्तुविवेक (विचार), इहामूत्रार्थभोग विराग (वैराग्य).—शमादिषट्क व मुमुक्षा (मोक्षाची इच्छा) हीं चार साधनें; त्यांतून ब्रम्ह सत्य, आणि जग अनित्य (मिथ्या) असा श्रवणानें होणारा विचार हें पहिलें साधन होय. या लोकांतील स्त्रीभोगादि व स्वर्गीं अमृतपानादि हीं सर्व अनित्य जाणून कुत्र्याच्या ओकीप्रमाणें त्या विषयांचा वीट मानणें हें दुसरें (वैराग्य) होय. १ शम, २ दम, ३ उपरति, ४ तितिक्षा, ५ श्रद्धा, ६ समाधान हें शमादिषट्क. विषयांकडून मनाला वळवून स्वरूपीं ठेवणें तो शम (शांति). बाह्येंद्रियांचा निग्रह करणें (स्वाधीन ठेवणें) तो दम. २ उपरति म्हणजे संन्यास तो न घडेल तर निष्कामकर्मानुष्ठान किंवा व्यवहारलोप करणें. ३ प्रारब्धानें प्राप्त झालेलें शीतोष्ण दुःखादि सहन करणें ती तितिक्षा. ४ गुरुवाक्यावर विश्वास ठेवणें ती श्रद्धा. ५ श्रवणादिक होत असतां मनाचें समाधान करणें हें समाधान. ६ हीं सहा मिळून शमादिषट्क होय. चोहों बाजूंनीं घर जळत असतां धन, धान्य, स्त्री, पुत्रादिकांला सोडून घरधनी स्वतापोपशांत्यर्थ आपणच बाहेर पडून तापशांतीची जशी इच्छा करितो, तशी संसारिक तापत्रय शमन करण्याची जी तीव्र इच्छा होणें ती मुमुक्षा होय.

**शिष्य**:—हीं चार्‍हीं साधनें पाहिजेत काय?

**गुरु**:—कित्येकाला नित्यानित्य विचार जाहला तरी विषयाभिलाष असतो तो ज्ञानाला प्रतिबंधक होतो. म्हणून वैराग्य पाहिजे व तें असतांही कित्येकाला कोपताप होतो, म्हणून शमादिक

पाहिजे व तेही असले तथापि सगुणोपासकाला मोक्षाची इच्छा होत नाहीं म्हणून मुमुक्षाही पाहिजे. अशा अधिकाऱ्यानें हातीं उपहार ( नजराणा ) घेऊन गुरूला शरण जाऊन प्रार्थना करावी कीं, हे भगवन् जीव कोण, ईश्वर कोण, जग कसें, हें त्रय कोठून उत्पन्न झालें व याचा उपरम कसा ( शांती ) होईल असा प्रश्न करावा. श्रुतिश्च ( लोकीं नाना योनी फिरतां फिरतां शेवट प्रारब्ध-वशें वैराग्य उत्पन्न होतें–त्यानें ज्ञानाकरितां श्रीगुरूला ( शाब्दज्ञान आणि ब्रह्मानुभव असणाऱ्या पुरुषाला ) हातीं समिधा घेऊन शरण जावें ) स्मृतिश्च ( तत्त्वदर्शी ज्ञानी जे, त्यांना नमून प्रश्न करून सेवेनें तें ज्ञान जाणावें तेच उपदेश करतील ) असा शिष्य शरण आल्यावर गुरु सत्व, रज, तमोगुणें, ईश्वर, जीव आणि जगदुद्भव प्रकार सांगून करतलामलकवत् आत्मबोध करतात. अशा अधिका-ऱ्याला अशीं साधनें व तो गुरु मिळणें हा ईश्वरानुग्रह आणि याला पूर्वपुण्योदयच पाहिजे. हें ज्ञान देणारा गुरु ईश्वरच जाणावा. त्याच्या प्रसादें जो जीवात्म्याचा आणि ब्रह्माचा भेद निरसून टाकितो तो मुक्त होतो.

दुसरा अध्याय समाप्त.

---

## अध्याय तिसरा

**शिष्यः**––हा प्रपंच किती प्रकारचा ?

**गुरुः**–––आत्मा आणि अनात्मा असा दोन प्रकारचा.

**शिष्यः**—प्रपंचातीत आत्म्याला प्रपंचांत कसा गणावा ?

**गुरुः**—चेतन, अचेतन असा दोन प्रकारचा प्रपंच होय. आत्मरूप चेतन जाणावें. त्यावांचून प्रपंच होणार नाहीं. म्हणून आत्म्याला प्रपंचांत गणावा.

**शिष्यः**—चेतन म्हणजे काय व अचेतन म्हणजे काय ?

**गुरुः**—ज्ञानशक्तिमत् जंगम ( प्राणी ) चेतन आणि स्थावर अचेतन.

**शिष्यः**—तर यांचे अनेक भेद असतां दोनच प्रकारचा प्रपंच कसा ?

**गुरुः**—अनात्मा ( मूळमाया ) एकच असून कार्यरूपानें अनेक रूप झाला; आत्मा ( ब्रह्म ) एक असून अनात्माकार्योपाधीनें अनेक जीव–अनेक ईश्वर असा भासतो.

**शिष्यः**—जीवाला अनेकत्व योग्य होईल, पण ईश्वराला अनेकत्व कसें ?

**गुरुः**—ग्रामोग्रामीं व पुण्यक्षेत्रीं, तीर्थी हरि, हर, गणेश, सूर्य, शक्त्यादिभेदानें.

**शिष्यः**—ग्रामादि क्षेत्रीं दिसणाऱ्या काष्ठपाषाणादिक मूर्ति त्याला ईश्वरत्व कसें ?

**गुरुः**—भावीक लोकांनीं शास्त्राधारें द्रव्य वेंचून प्रतिष्ठाभिषेक पूजादि केलें जातें म्हणून.

**शिष्यः**—म्लेंछादिक कुठें अशाला देंव मानितात ?

**गुरुः**—ज्याला शास्त्राधिकार नाहीं ते नास्तीक म्लेंच्छादिक मूर्तीच्या पूजेविषयीं उदाहरणीय कसे होतील? तर हा अधिकार भाविकालाच आहे. पहा. ते म्लेंछादिक हे (त्याज्य) अशा मल-मूत्रादिरूप देहींच आत्मबुद्धि ठेवितात. त्यापेक्षां अत्यत निर्मल पाषाणादि देव प्रतीमेचे ठिकाणीं आस्तिक्यानें ईश्वरबुद्धी ठेविली तर हानी होईल काय? तर नाहीं. उलटा लाभच होईल. तो अनादि कालापासून असलेली बहिर्मुखता उलट करण्याकरितां शास्त्रानें सांगितलेलें (कल्पिलेलें) ईश्वर प्रतिमेचें ध्यान केल्यानें चित्तस्थैर्य होऊन ईश्वरप्रसादही होतो. कारण ईश्वराची व्याप्ति सर्वत्र आहे व शास्त्र ही ईश्वराची आज्ञा होय.

**शिष्यः**—अनात्म्याच्या आणि आत्म्याच्या अनेकत्वाविषयीं दृष्टांत काय?

**गुरुः**—एकच पृथ्वी, मठघटादि भेदानें अनेकत्व पावते व एकच आकाश त्यामध्यें परिच्छिन्न होऊन घटाकाश, मठाकाशादि भेदें अनेकत्वाला पावतें. त्याप्रमाणें मूल प्रकृति अनात्मा एक असून कार्यरूपानें (नाना शरीरभेदें) अनेकरूपी जाहला. आत्मा स्वतः एक असोन त्या शरीरोपाधीनें त्या त्या शरीरीं प्रविष्ट जाहल्या-सारखा दिसून देव, मनुष्य, स्त्री, पुरुष, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, पशु, पक्षी, कृमी, कीटादि रूपानें भासतो. हा अवच्छिन्न पक्षी दृष्टांत; प्रतिबिंबपक्षीं तर एक जल असून समुद्र, नदी, तळें, घट-जल असें भासतें; व त्यांमध्यें प्रतिबिंबित होणारा सूर्य एकच असोन अनेक रूपानें प्रतीतीला येतो. त्याप्रमाणें आत्मा एकच

असोन अंतःकरणसहीत शरीराचे ठाईं प्रतिबिंबित होत्साता अनेक रूपानें भासतो, तत्रापि जसें जलधर्म चलनादिक बिंबभूत सूर्याला स्पर्श करीत नाहींत तसे चिदाभासावर (जीवावर) भासणारें कर्तृत्वभोक्तृत्वादिधर्म बिंबभूत आत्म्याला स्पर्श सुद्धां करीत नाहींत. तेव्हां घटाकाशच मठाकाश, तसा जीवात्माच परमात्मा जाणावा.

**शिष्यः**—जीवात्मा कल्पित आहे म्हणून तो मिथ्या जाणावयाचा तर मग त्याचा आत्म्याशीं अभेद कसा ?

**गुरुः**—पारमार्थिक, व्यावहारिक व प्रातिभासिक असे तीन प्रकारचे जीव होत. यांतून पहिला मुख्य आणि दुसरे दोन कल्पित. जसा जलावर तरंग कल्पित आणि तरंगावर फेन कल्पित आहे, तसा पारमार्थिकावर व्यावहारिक व त्यावर प्रातिभासिक कल्पित आहे. जलनिष्ठ माधुर्य, शैत्य, द्रवादि धर्म तरंगावर भासून तद्द्वारा फेनावरही भासतात जसे, तसें कूटस्थ पारमार्थिकावर असणारे सच्चिदानंद व्यावहारिकावर[1] भासून प्रातिभासिकावरही[2] भासतात. फेन तरंगावांचून नसतो व तरंग जलावाचून नसतो, जल पारमार्थिक होय जसें, तसा प्रातिभासिक व्यावहारिकावाचून नाहीं, व व्यावहारिक पारमार्थिकावांचून नाहीं. फेन जिरला म्हणजे ते धर्म तरंगावर येतात. तरंग जिरल्यावर जलावर पूर्ववत आहेतच. तसें प्रातिभासिक नष्ट होतां सच्चिदानंद व्यावहारिकावर, त्याचा नाश होतां ते पारमार्थिकावर राहतात त्या निर्विकल्प पारमार्थिकाचें परब्रह्माशीं ऐक्य होतें. एवं नेति नेति वाक्यानें देहादिप्रपंचाचा

१ जागृतींतील. २ स्वप्नांतील.

नाश करून त्या कूटस्थाचा साक्षात्कार करून मीं कूटस्थ तें परब्रह्मच आहें असें जो जाणतो तो मुक्त होतो. त्याला पापपुण्यादिकांचा स्पर्श होत नाहीं. कारण त्याची दुःखादि परंपरा नष्ट होते, असें श्रुति म्हणते.

तिसरा अध्याय समाप्त.

---

## अध्याय चवथा

**शिष्यः**—दुःखादिपरंपरा कोणती ? तें कृपा करून सांगावें.

**गुरुः**—जीवात्म्याला दुःख, जन्म, कर्म, रागद्वेषादि, अभिमान, अविवेक व अज्ञान ही परंपरा उत्तरोत्तर हेतुत्वें जाणावी.

**शिष्यः**—जीवात्म्याला हें दुःख स्वाभाविक आहे कीं आगंतुक आहे ?

**गुरुः**—स्वाभाविक म्हणावें तर दुःखनिवृत्ति कधीं होणार नाहीं. मग सुख कसें होईल ? आणि सुखप्राप्त्यर्थ कर्म तरी कां करावें ? व असें जाहल्यास सत्कर्म योगादिकही नकोत. एवढेंच नव्हे तर शास्त्रही व्यर्थ जाईल.

**शिष्य**—दुःख स्वाभाविक कां असेना तें प्रयत्नानें घालवावें.

**गुरुः**—जशी गोडी हें गुळाचें स्वरूप. ती नष्ट होतां गुळाचा नाश होईल. तसें दुःख हें स्वाभाविक मानलें तर त्याचा नाश जाहल्यास जीवात्म्याचा नाश होईल. स्वरूपनाशार्थ कोण प्रयत्न करील ? स्वरूपनाश जाहल्यास पुरुषार्थ कोण भोगील ? कारण

स्वभाव म्हणजे स्वरूप जाणावें व जीवात्मा (अविनाशी) नित्य षड्भावविकारवर्जित आहे असें श्रुति म्हणते.

**शिष्यः**—जशी अग्नीची उष्णता स्वाभाविक असोन ती मंत्रादिकांनीं जाऊन स्वरूपाचा नाश न होतां शीतळता येते, तसें जीवात्म्याचें दुःख स्वाभाविक कां असेना तें समाधियोगानें घालविलें तर दुःख नष्ट होऊन स्वरूपाचा नाश न होतां सुख कां न मिळावें?

**गुरुः**—कर्म नष्ट होतां कर्मजन्यही नष्ट होतें. अग्निस्तंभन नष्ट होतां पुन्हां स्वाभाविक उष्णत्व येतें. तसें योगानें दुःख दूर केलें तरी समाधी खुलतांच सुख जाऊन पूर्ववत दुःख येईल, तेव्हां तें आत्यंतिक मुक्तिवांचून कसें जाईल? व ती मुक्ति योगादिजन्य होईल तर, जें जन्य तें अनित्य या न्यायानें नष्ट होईल. (तो पुनरावृत्तीला येत नाहीं) या श्रुतीला बाध येईल आणि दुःख स्वाभाविक मानलें तर निद्रासमाधीमध्येंही तेंच असलें पाहिजे. पण तसें नाहीं. कारण निद्रासमाधींतून उठलेला पुरुष सुख सद्भावेंच[1] बोलतो, तेव्हां दुःख हें आगंतुक होय.

**शिष्यः**—हें कां आलें?

**गुरुः**—शरीर-परिग्रहामुळें.

**शिष्यः**—ज्याला शरीर-परिग्रह त्याला दुःख, अशी व्याप्ती जाहली तर मग राजाला कोठें दुःख आहे?

**गुरुः**—शत्रुपीडा, राज्यभार, धनक्षय, स्त्रीपुत्रादिमरण, स्वांगरोग इत्यादि राजालाही दुःखें आहेत.

---

१ असणेपणा.

**शिष्यः**—तर तो सुखी असें कसें म्हणतात ?

**गुरुः**—मोहानें.

**शिष्यः**—मोहानें दुःखाचें सुख कसें होतें ?

**गुरुः**—ओझें घेणारे शेतकरी वगैरे लोक लाभावर दृष्टी देऊन दुःखरूप स्वकर्माला सुखरूप मानून आनंदानें गाणीं गातात. तेव्हां मोहानें दुःखाचें सुख भासतें.

**शिष्यः**—तर विवेकी पुरुषाला शरीर-परिग्रह आहे. तेव्हां त्यालाही दुःख जाहलें पाहिजे.

**गुरुः**—क्षुधा, पिपासा, शीत, उष्ण, रोग इत्यादिकांपासून विवेकी पुरुषालाही दुःख आहे.

**शिष्यः**—मग विवेकी आणि अविवेकी यांमध्यें विशेष भेद काय ?

**गुरुः**—विवेकी महात्मा; दुःख हा अन्तःकरणाचा धर्म आहे. त्या अन्तःकरणाचा आत्म्याला अणुमात्र संबंध नाहीं असें, ( असंगच हा पुरुष आहे ) या श्रुतीनें व ( निरवयवत्वामुळें सत्यत्व आहे ) या युक्तीनें आणि समाधी तूष्णींभावाच्या[1] सुषुप्तीच्या अनुभवानें जाणून स्वस्थ राहतो. अविवेकी दुरात्मा तर आत्मस्वरूपाचा विचार न करितां देहादिकांला आत्मा मानून देहादिकांचे धर्म आत्म्यावर व आत्मधर्म देहादिकांवर असा अन्योन्याध्यास करून मी देव, मनुष्य, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र इत्यादिवर्णाश्रमाभिमानी होतो. एवढें नव्हें तर तो हा प्रपंच सत्य, सुखदुःखादि भोगही सत्य, असें

---

१ दमून स्वस्थपणें बसणें.

मानितो. विवेकी तर प्रपंच हा मिथ्या व सुख-दुःखादि प्रारब्ध-भोग स्वप्नवत मानितो. त्यामुळें खिन्न होत नाहीं एवढाच विशेष-पणा जाणावा.

**शिष्यः**––( वज्रहस्त पुरंदर ) इत्यादि वचनानें देवालाही शरीर-परिग्रह आहे. त्यानांही दुःख आहे काय ?

**गुरुः**––होय. असुरराक्षसोपद्रवानें, परस्पर वैरानें, पुण्य क्षीण जाहल्यानें, पुढें होणाऱ्या अधःपातभयानें देवालाही दुःख आहे.

**शिष्यः**––तर ते उपासकाना सुख कसे देतात ?

**गुरुः**––श्रीमंत लोक स्वतः रोगादिकानें दुःखित असले तर धनदानादिकानें स्वसेवकांना जसें सुख देणारे होतात तसेंच हें जाणावें.

**शिष्यः**––देवलोकीं देव आनंदरूपानें राहतात, ह्या श्रुतीचें तात्पर्य काय ?

**गुरुः**––दुःख हा अंतःकरणाचा धर्म आहे असा निर्धार करून स्वानुभवबळानें सुख मानितात. हें या श्रुतीचें तात्पर्य होय. त्यानांही दुःख आहे. असें ( त्या या उत्पन्न जाहलेल्या देवता क्षुत्पिपासादिदोषयुक्त मोठ्या भवसागरामध्यें पडल्या ) या श्रुतीं-वरून स्पष्ट होतें. त्यापेक्षां विदेहमुक्तीवांचून सुख होणार नाहीं.

**शिष्यः**––विदेहमुक्तीलाच मुक्ती मानावी तर नक्षत्ररूपानें स्वर्गावर दिसणारे देव मुक्त आहेत असें कसें म्हणतात ?

**गुरु**––सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता अशा चार प्रकारच्या मुक्ती आहेत. देवाला दासभावानें भजतात त्यांना

सलोकता मिळते. पूजा, जप करणाऱ्याला समीपता मिळते. यम नियमपूर्वक पद्मादि आसनावर बसून ईडेनें म्हणजे डाव्या नाकपुडीनें १६ अंकांनीं पूरक करून चार अंगुळांच्या अंतरानें हृदयप्रदेशीं हनु ठेवून ६४ अंकांनीं कुंभक करून पोटास पाखळ देऊन हळूंहळूं उजव्या नाकपुडीनें म्हणजे पिंगलेनें बत्तीस अंकांनीं रेचक करावा. तसाच पुन्हां पिंगलेनें घेऊन ईडेनें सोडावा. असें पुन्हां पुन्हां दररोज त्रिकाळीं दहा दहा कुंभक करावेत. असा तीन मास अभ्यास जाहल्यावर प्राणजय होऊन ब्रम्हांडी प्राण जातो. तो पांच विपळें दोन पळें तेथें ठरला म्हणजे प्राणायाम जाणावा. पंचवीस पळें ठरल्यानें प्रत्याहार ( इंद्रियवश्यता ) पांच घटकांनीं धारणा, साठ घटिकांनीं ध्यान, बारा दिवसांनीं समाधी, या अष्टांगयोगें सरूपता मिळतें. या तीन ( शरीर आहे म्हणून पुनरावृत्ती होते यास्तव ) मुख्य नव्हेत. समासनानें बसून भ्रूमध्य दृष्टी ठेवून, सो शब्दानें श्वास आंत घेऊन, हं शब्दानें पुन्हां पुन्हां बाहेर सोडून तो परमात्मा मी आहें, असें जहदजहल्लक्षणेनें विरुद्धांश ( वाच्यांश ) टाकून, अविरुद्धांश ( लक्ष्यांश ) घेऊन जीव-शिवाचें ऐक्य करणें हा ज्ञानयोग. यानें सायुज्यमुक्ती ( पुनरावृत्तीरहित विदेह मुक्ती ) मिळते ती मुख्य जाणावी.

**शिष्यः**—कधीं कोठेंही न दिसणें ही जर विदेहमुक्ती, तर शून्यपणा समजावा.

**गुरुः**—शरीराचा मात्र शून्यपणा, पण स्वरूपाचा शून्यपणा नाहीं. सुषुप्तीसुखवत् स्वरूपसुख असतें. मग शून्य कसें म्हणावें ?

**शिष्य**:—मुक्तीसमान सुषुप्ती आहे तर तीच मुक्ती कां न म्हणावी ?

**गुरु**:—सुखानुभव मात्र समान असला तरी झोंपेमध्यें अज्ञान व पुनरुत्थान हीं आहेत. हे, मुक्तीमध्यें दोन्हीं नाहींत. जागृत स्वप्नामध्यें शरीरपरिग्रह ( देहाभिमान ) असल्यामुळें सर्वांना दुःखानुभव येतो. तसा झोपेमध्यें शरीरपरिग्रह नसल्यामुळें दुःखनिवृत्ति होऊन गाढ झोंप असेपर्यंत सुखप्राप्ती होते. तसा देहाभिमान दृढज्ञानानें दूर जाहला तर दुःखनिवृत्ती होऊन निरतिशयानंदरूप मुक्ती मिळते. तेव्हां शरीरपरिग्रहानें सुखरूप आत्म्याला दुःख होतें, तें आगंतुक, स्वाभाविक नव्हे.

**शिष्य**—जीवात्म्याला देहप्राप्ती होण्याचें काय कारण ?

**गुरु**:—पूर्वकर्मसहित पंचभूतें कारणभूत आहेत. केवळ भूतें सदा सर्वत्र आहेत. त्यापासून देह उत्पन्न होईल असें मानूं नये.

**शिष्य**—रक्त, रेत रूपानें परिणाम पावलेल्या भूतांपासून देहोत्पत्ति मानिली ती कशी ?

**गुरु**:—शुक्र, शोणितयोगानेंच प्रजा होते. असें मानिलें तर, जगामध्यें वंध्या होणारच नाहींत. तेव्हां कर्मसहित भूतेंच कारण होत. जसें मृत्तिका सामान्य असून, कुलालव्यापारच घटादिवैचित्र्याला कारण होतें, तसें पंचभूतांना देशकालादि साधारण असतांही तत्‌ शरीरवैचित्र्याला (प्रत्येकांचीं निरनिराळीं विलक्षण शरीरें होण्याला) तीं तींच कर्में हेतुभूत होतात. घटाला कुलालव्यापार निमित्त आणि मृत्तिका उपादान कारण जसें, तसें शरीरोत्पत्तीला पंचभूतें

( रक्तरेतोभूत ) उपादान कारण आणि जन्मोपार्जित कर्म निमित्त-कारण होय. मृत्तिका असून कुलालव्यापार नसेल तर घटोत्पत्ती होत नाहीं. त्याप्रमाणें ईश्वरसृष्टच पंचभूतें असतांही विवेकी पुरुषानें कर्में ज्ञानानें बाधित केलीं असतां शरीरोत्पत्ती होत नाहीं. ज्याला ज्ञान जाहलें त्यालाच मात्र पुनर्जन्म नाहीं, असें जाणावें. नाहींतर एक मुक्त होतांच सर्वांस मुक्तीप्रसंग येईल.

शिष्य—केलेलें शुभाशुभ कर्म अवश्य भोगलें पाहिजे. तें भोगल्यावाचून कोटिशः कल्प गेले तरी सुटका नाहीं. हें कर्मशास्त्र व ज्ञानाग्नि सर्व कर्में जाळितो, हें मोक्षशास्त्र याच्या विरोधाची गती काय ?

गुरुः—जसें अहिंसा परमधर्म, हें शास्त्र दुर्बळ म्हणून यागामध्यें पशू मारावा, या प्रबळ शास्त्रानें बाधित होतें तसें ( केलेलें शुभाशुभ अवश्य भोगावें इत्यादि ) दुर्बळ कर्मशास्त्र ( ज्ञानाग्नि कर्में जाळितो ) या प्रबळ ज्ञानशास्त्रानें बाधित होतें. ज्ञानानें कर्म नष्ट जाहलें म्हणजे जन्म नाहीं. मग दुःख कोठून होईल ? आनंद-प्राप्तीच होईल.

चवथा अध्याय समाप्त.

---

## अध्याय पांचवा

शिष्यः—आत्म्याला जन्म कर्मानें मिळतो म्हटलें, तें कर्म किती प्रकारचें, व त्यानें जन्म कसकसे मिळतात ?

**गुरुः**——पुण्य, पाप आणि मिश्र असें तीन प्रकारचें कर्म आहे. त्यांतून पुण्यकर्मानें देवशरीर, पापानें तिर्यक् ( पश्वादि ) शरीर, आणि मिश्रानें मनुष्यशरीर प्राप्त होतें. तें उत्कृष्ट, मध्यम, सामान्य भेदानें प्रत्येक तीन प्रकारचें होतें. तें असें—उत्कृष्ट पुण्यानें ब्रह्मादि-शरीरें, मध्यम पुण्यानें यक्षादिशरीरें, सामान्य पुण्यानें राक्षस, भूतें, प्रेतादि शरीरें; उत्तम पापकर्मानें विषवृक्ष, कंटकादि वृक्ष, सर्प, वृश्चिक, व्याघ्रादि शरीरें; मध्यम पापानें पत्र, पुष्प, फलयुक्त लता; वृक्ष खरोष्ट्र महिषादि शरीरें. सामान्य पापें तुलसी, वट, अश्वत्थादि, गवाश्वादि शरीरें, आणि मिश्रोत्कृष्ट कर्में निष्कामकर्मानुष्ठान व ज्ञानयोग्य शरीरें, मध्यमानें काम्यकर्मयोग्य शरीरें, आणि सामा-न्यानें ( मिश्र कर्मानें ) किरात, म्लेंछादि शरीरें होतात. तेव्हां मनुष्यानें हें तारतम्य जाणून स्ववर्णाश्रमोचित कर्में ईश्वरोद्देशानें करून मिश्रोत्कृष्ट कर्मफल साधून घ्यावें.

**शिष्यः**——हीं कर्में कोणी केलीं जातात ?

**गुरुः**——त्रिविध करणांनीं. ( काया, वाचा, मनानें. )

**शिष्यः**——लोकांमध्यें अहंशब्दार्थ वाच्य आत्मा हें मी करितों, असा अभिमान घेतो. त्याला सोडून करणाला कर्तृत्व कां मानावें ?

**गुरुः**——तो आत्मा अविकारी, निष्क्रिय, कसा कर्ता होईल ?

**शिष्यः**——तर त्यावर कर्तृत्व कां भासतें ?

**गुरुः**——अध्यासानें. तें स्वाभाविक म्हणावें तर पूर्ववत् दोष येईल. कर्तृत्व कायम केलें तर गुरु-शिष्य परंपरा व जीवन्मुक्ती नष्ट

होईल. आणि ( निष्कल-शांत-साक्षी-चेता-केवल-निर्गुण ) ही श्रुती बाधित होईल. कर्तृत्व असतें तर झोपेमध्येंही दिसतें.

**शिष्यः**—जशी सुताराच्या अंगीं कारागिरी असोन भोजनादि समयीं ती दिसत नाहीं त्याप्रमाणें जीवाला कर्तृत्व असून करणांचा लय जाहल्यामुळें झोपेंत तें दिसत नाहीं.

**गुरुः**—तर तूष्णींभूतावस्थेमध्यें करणें असून कर्तृत्व कां दिसत नाहीं तेव्हां तो अध्यास जाणावा.

**शिष्यः**—अध्यास म्हणजे काय ?

**गुरुः**—अन्यनिष्ट कर्माचा अन्यत्र भ्रम जो, तो अध्यास होय. जसें नौकेंतून जाणाऱ्याचें चलन वृक्षावर व वृक्षाचें स्थिरत्व नौकेंतून जाणाऱ्यावर भासतें, तसें त्रिविधकरणकर्तृत्व आत्म्यावर व आत्म्याचें अकर्तृत्व करणावर भासतें हा अध्यास.

**शिष्यः**—करणें तर ( अचेतन ) जड त्याला कर्तृत्व कसें ? व कर्तृत्व मानलें तर अन्य करणेंही पाहिजेत.

**गुरुः**—वायु व जलप्रवाह जड असून करणांवांचून वृक्षादिकांला दूर टाकितात तसें हें समजावें.

**शिष्यः**—त्यांचीं कर्में कोणचीं ?

**गुरुः**—सगुणध्यान, परोपकारचिंता, भक्ती, ज्ञान, वैराग्य हीं मनाचीं पुण्यकर्में; विषयचिंता, परोकारचिंता, वेदशास्त्रप्रामाण्यचिंता, ( नास्तिकपणा ) हीं मनाचीं पापकर्में; आणि सगुणध्यानादिसमयीं विषयचिंता करणें हें मनाचें मिश्रकर्म. वेदशास्त्र, गीता, सहस्रनाम-पठन, मंत्र-जप, भगवत्कीर्तन, सत्यवार्ता, मृदु

भाषण हीं वाचिक पुण्यकर्मैं. वेदांत वेदशास्त्र दूषण, असत्य, पिशुन, पौरुष्य[1], वार्ता, थट्टा हीं वाचिक पापकर्में, व सत्कर्म करते-वेळीं थट्टा, लोकवार्ता, निंदादिक, वाचिक मिश्र कर्में. पुण्य तीर्थीं स्नान, गुरुसेवा, देवपूजा, प्रदक्षिणा, सज्जन-दर्शन, त्याग[2], लोकानुग्रह संचार, इत्यादिक हीं कायिक पुण्यकर्में जाणावींत. परहिंसा, परस्त्रीसंग, दुष्टसंग, चोरी, मारामारी इत्यादिक हीं कायिक पापकर्में; आणि ब्राह्मणभोजनार्थ लोकांला उपद्रव, देवाल्याकरितां परद्रव्यापहार, पाणपोय ठेवून चाकरास पगार न देणें इत्यादि कायिक मिश्रकर्में होत.

**शिष्यः**—या कर्मांचा विचार करून फळ काय ?

**गुरुः**—मुख्य आणि अवांतर अशीं दोन प्रकारचीं फळें आहेत. हीं कर्में काया, वाचा, मनानें घडतात. मी तर आत्मा परिपूर्ण चैतन्यरूपी असंग आहें म्हणून मला कर्मांचा स्पर्श सुद्धां होत नाहीं, असें दृढानुभवानें निःसंशय जाणणें हें मुख्य फल, व ज्ञानोत्तर हीं त्रिविध कर्में पुण्य कर्मीं ठेवणें हें अवांतर फल. केळ लावणाऱ्याला केळीं मिळणें हें मुख्य फल व पत्र पुष्पादि मिळणें हें अवांतर फल जसें; तसें हें समजावें.

**शिष्यः**—पद्मपत्राला उदकस्पर्श होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञान्याला कर्मलोप होत नाहीं अशी स्मृती आहे; तेव्हां हा नियम कां ?

---

१ निष्ठुर भाषण. २ दान.

**गुरुः**——ब्रह्मवित्, ब्रह्मविद्वर, ब्रह्मविद्वरीयान्, ब्रह्मविद्वरिष्ठ असे चार प्रकारचे ज्ञानी आहेत. त्यांतून शेवटला वृत्तिशून्य आहे म्हणून त्याला विधिनिषेध नाहीं. बाकी तिघांला वृत्ती आहेत म्हणून त्यांनीं लोकसंग्रहार्थ कर्मी लोकांमध्यें त्यांचा बुद्धिभेद न होऊं देतां अनासक्तीनें कर्में करावींत, व मुमुक्षु जनांला कर्मभरापासून हळूंहळूं सोडवून सत्कर्माचरणपूर्वक ज्ञानोपदेश करावा, असें श्रुती सांगते. हा नियम नव्हे.

**शिष्यः**——मी करवितों, मी करवीन इत्यादि लोकांमध्यें व्यवहार दिसतो, तेव्हां आत्मा करविता होत नाहीं काय ?

**गुरुः**——जसें आत्म्याला कर्तृत्व नाहीं म्हणून सांगितलें, त्याच न्यायानें कारयितृत्व नाहीं असें सिद्ध होतें.

**शिष्यः**——मग कारयितृत्व कसें भासतें ?

**गुरुः**——लोहनिष्ठ वर्तुलत्वादिक अग्नीवर व अग्निनिष्ठ उष्णत्व प्रकाशादि लोहावर जसें भासतें, तसें तादात्म्यानें रागादिनिष्ठ कारयितृत्व आत्म्यावर भासतें तें मिथ्या. कारण जर सत्य असतें तर निद्रासमाधिकालींही भासतें.

**शिष्यः**——एवढ्यानेंच नाहीं म्हणतां येत नाहीं; कारण अध्यापकाला ( गुरूला ) पढविण्याचें सामर्थ्य असलें तरी जवळ शिष्य नसतां तें अनुभवास येत नाहीं. त्याप्रमाणें करणें नसल्यामुळें झोपेंत आत्म्याचें कारयितृत्व दिसत नसेल.

**गुरुः**——उदासीन दशेमध्यें करणें असूनही कारयितृत्व कां दिसत नाहीं तर तेव्हां अन्वयव्यतिरेकानें ( रागादिक आहेत तर करणें

प्रवृत्त होतात, नाहीं तर होत नाहींत. या न्यायानें ) रागादिकांचेंच हें कारयितृत्व सिद्ध होतें. आत्मा तर ( अदृश्य, अव्यवहार्य, अग्राह्य, अचिंत्य, अव्यपदेश्य इत्यादि लक्षणांनीं ) श्रुतीसिद्ध अविकारी आहे.

**शिष्य**:—रागादिक जड, त्यांना हें सामर्थ्य कसें ?

**गुरु**:—जड अग्नि दारूगोळा भरलेल्या तोफेला झगडून, तो गोळा उडवून, चतुरंग सेनेला मारवितो व प्रेतक्रिया जड असून परलोकीं प्राण्याला जीवन देणारी होते. तसें, हें जड असलें तरी रागादिक योग्यतावशें करविणारे होतात.

**शिष्य**:—तर, आत्मा हृषीकेश या श्रुतीचें तात्पर्य काय ?

**गुरु**:—आदित्याच्या प्रकाशानें लोकांचीं शुभाशुभ कर्में घडतात, परंतु तें पापपुण्य आदित्याला लागत नाहीं जसें; तसें, आत्म्याच्या सांन्निध्यानें रागादिहेतुक इंद्रियवृत्ती होऊन पापपुण्यात्मक कर्म घडतें, त्याचा संपर्क आत्म्याला नाहीं. लोहचुंबकाप्रमाणें आत्मसांनिध्यानें इंद्रियें चलायमान होतात म्हणून हृषीकेश ( इंद्रियनियंता ) म्हणतात हें तात्पर्य.

**शिष्य**:—आत्म्याला कर्तृत्व, कारयितृत्व नाहीं हें श्रवण केलें तरी निश्चय कां होत नाहीं ? त्यास प्रतिबंध कोणते ? त्यांचीं लक्षणें काय ? व ते दूर कसे होतील ?

**गुरु**:—संशयभावना, असंभावना, विपरीतभावना हे तीन प्रतिबंध. ऋग्वेदादिकांनीं सांगितलेलीं कर्में, ( हौत्र, आध्वर्य व उद्गीथ ) निरनिराळीं जशीं, तशीं ऋग्वेदानें सांगितलेलें ( प्रज्ञान ब्रह्म ), यजुर्वेदानें सांगितलेलें ( मी ब्रह्म ), सामवेदानें सांगितलेलें

( तें तूं आहेस ) व अथर्वण वेदानें सांगितलेलें ( हा आत्मा ब्रह्म ) हीं ब्रह्में निरनिराळीं आहेत कीं एकत्र आहेत असा जो संशय ती संशयभावना. ही, सर्व वेदांचें तात्पर्य ब्रह्म एकच आहे अशा श्रवणानें दूर होते. खरोखर ईश्वर, जीव आणि जग, भिन्न नसून भिन्न आहे असें वाटतें, ती असंभावना. ही स्वप्नदृष्टांतरूप मननानें नष्ट होते. श्रवण, मनन केलें तरी जगाची स्थिति सत्यत्वानें प्रतीतीला येते ती विपरीत भावना. ही, निरंतर ब्रह्मैकाकारप्रत्ययरूप निदिध्यासानें ( ध्यानानें ) नष्ट होते. जसें, अग्नीचें स्तंभन केल्यावर तृण सुद्धां जळत नाहीं व तें दूर होतांच जळतें. तसें तें प्रतिबंधत्रय असेपर्यंत ज्ञानाग्नि कार्य करण्यास समर्थ होत नाहीं. ते प्रतिबंध दूर होतांच तत्काळ तो ( ज्ञानाग्नि ) अविद्या तत्कार्य ( मायेसहित प्रपंच ) जाळतो. म्हणून षट्विध लिंगानें तात्पर्यावधारण श्रवण करावें.

**शिष्यः**—सहा लिंगें कोणतीं ?

**गुरुः**—१ उपक्रमोपसंहार, २ अभ्यास, ३ अपूर्वता, ४ फल, ५ अर्थवाद, ६ उपपत्ती, हीं सहा लिंगें. सामवेदामध्यें सद्वस्तु प्रथम एकच होती असा उपक्रम करून एतद्रूप हें सर्व सत्य हाच आत्मा तूं आहेस असा उपसंहार केला म्हणजे आज हें दिसणारें जग पूर्वीं सत् ( असणारें ) होतें. हा वेदांनीं उपक्रम आरंभ करून त्या जगाचा उपसंहार ( लय ) त्याच ब्रह्मस्वरूपीं सांगितला. ते उपक्रमोपसंहाररूप पहिलें लिंग १ मी ब्रह्म अशी पर्यायानें पुनः पुनः आवृत्ती करणें. या अभ्यासाचे नऊ प्रकार, ते असे. पायास दोरी बांधून सोडलेला पक्षी कोणच्याही दिशेस उडाला तरी शेवट

बांधलेल्या खांबावर येतो, त्याप्रमाणें मन कोठेंही गेलें तरी प्राण-बंधन आहे म्हणून पुनः स्थितीवर येईल तें प्रयत्नानें आणावें. मग वाणी मनांत, मन प्राणांत, प्राण जीवत्वांत लीन होईल इत्यादि प्रथमाभ्यास. १ मक्षिकांनीं नानाप्रकारचे रस एकत्र केल्यावर हा अमुक वृक्षाचा रस असें भान रहात नाहीं, तशा सर्व वृत्ती लीन जाहल्यावर एकरस आनंद होतो, हा दुसरा अभ्यास. २ नद्या समुद्राला मिळाल्यावर त्यांचीं नामरूपें नष्ट होऊन एक समुद्रच होतो, हा तिसरा अभ्यास. ३ मूळ तुटल्यावर वृक्ष वाळतो, तसें जीवानें सोडलेलें शरीर मरतें, जीव मरत नाहीं. तो ब्रम्हांश आहे म्हणून. तत्त्वज्ञानानें उपाधि नष्ट होतांच ब्रह्माकार होतो हा चवथा अभ्यास. ४ वडाचें सूक्ष्म बीज फोडल्यावर जें दिसत सुद्धां नाहीं तेंच बीज हवा, पाणी, जमीन मिळतांच वृक्षरूप होतें. तद्वद्वासना-परिणाम भासतो हा पांचवा अभ्यास. ५ चोरांनीं डोळे बांधून देशांतरीं नेलेला पुरुष दुसऱ्यानें मार्ग दाखविल्यावर स्वस्थानीं येतो, तसा गुरुउपदेशानें मुमुक्षु स्वस्थानीं जातो, हा सहावा अभ्यास. ६ मीठ पाण्यांत टाकल्यावर त्याचें पाणीच होतें हा सातवा अभ्यास. ७ मरणोन्मुख जाहलेला पुरुष स्वजनांचें रडणें जाणत नाहीं, तसा वृत्तिनिरोध केलेला पुरुष इंद्रियांचे लालुचीला जाणत नाहीं, हा आठवा अभ्यास. ८ पाप न करणारा मनुष्य तापलेल्या लोखंडानें जळत नाहीं. ( हा एक दिव्य करण्याचा प्रकार आहे ) तसा अहं-कार सोडणारा कशानेंही लिप्त होत नाहीं, हा नववा अभ्यास. ९ या प्रमाणें करणें. हा अभ्यास. २ वेदांतानें ज्ञान होतें हें अपूर्व.

३ ज्ञान जाहल्यावर विदेहमुक्ती मिळते हें फल. ४ एक मातीचा घट जाणल्यावर सर्व मृद्विकार कळतात; तसें एक ब्रह्म जाणल्यावर सर्व कळतें. ही उपपत्ती पांच. ५ उत्पत्ति, स्थिति, लय, प्रवेश, नियमन, पदार्थशोधन फल हे सात अर्थवाद. ब्रह्मापासून जग उत्पन्न होतें, १ वाचतें २ व त्याच रूपीं लीन होतें. ३ बिंबप्रतिबिंबन्यायानें मस्तक भेदून जीवरूपानें ब्रम्ह शरीरीं प्रविष्ट होतें. ४ अंतर्यामी रूपानें ब्रह्म पृथिव्यादिकांचें नियमन करितें. ५ तत् पदाचें लक्ष्य सत्यज्ञानानंदरूप ब्रह्म व त्वं पदाचें लक्ष्य कूटस्थ साक्षी प्रत्यक् ब्रह्म इत्यादि पदार्थशोधन. ६ जीव हा स्वयें ब्रह्मरूप असोन ज्ञानानें ब्रह्म होतो हें फल. ७ असे सात अर्थवाद मिळून हीं सहा लिंगें, याहीकरून तात्पर्यावधारण करणें तें श्रवण होय. अस्तु. प्रधानानें पाठविलेल्या सैन्यानें जय मिळविला तो आपणच मिळविला असें जसें राजा म्हणतो, तसें रागादिकांनीं प्रेरित करणांनीं केलेलें कर्म, मूढ मीं केलें असें म्हणतो तें मिथ्या होय.

पांचवा अध्याय समाप्त.

---

## अध्याय सहावा

**शिष्यः**—रागादिवृत्ती किती? व त्यांचीं लक्षणें काय?

**गुरुः**—१ राग, २ द्वेष, ३ काम, ४ क्रोध, ५ लोभ, ६ मोह, ७ मद, ८ मत्सर, ९ ईर्ष्या, १० असूया, ११ दंभ, १२ दर्प, १३ अहंकार, १४ इच्छा, १५ भक्ती, १६ श्रद्धा, या सोळा

वृत्ती होत. त्यांचीं लक्षणें सांगतों. स्त्रियेविषयीं रतिसंभोगादिनिमित्तानें उठणारी वृत्ती, तिचें नांव राग. ( सुख, स्नेह, प्रीति, आसक्ती इत्यादि तिचे पोटभेद होत ) १ कोणीं आपलें विरुद्ध केलें तर त्याचें वाईट करण्याची इच्छा तो द्वेष, ( दुःख, भय, उद्वेग, शोक हे त्याचे पोटभेद. ) २ गृह, क्षेत्र, धन, धान्य, वस्त्रादि संपादन करण्याची इच्छा तो काम, ( प्रीति, अपेक्षा हे त्याचे भेद ) ३ इच्छेप्रमाणें करीत असलेल्या कृत्याला विघ्न करणारावर किंवा स्वमनोगताहून विरुद्ध करणारावर संतापणें तो क्रोध ( पश्चात्ताप हा त्याचा भेद ). ४ हातीं असलेलें खर्चूं नये हा लोभ. ( कार्पण्य हा त्याचा भेद ). ५ ऐश्वर्य, विद्या किंवा अधिकाराच्या जोरावर ताठा करणें व कृत्याकृत्याचा विचार न करणें, तो मोह. ६ मला लोकांची पुष्टी आहे किंवा संपत्ती आहे, तेव्हां कांहीं पाहिजे तें करीन असें मानणें तो मद. ७ विद्या, धनादिकानें स्वसमान पाहिल्यावर किंवा ऐकिल्यावर तें सहन न होणें तो मत्सर. ८ हें दुःख शत्रूला व्हावें तें मला कां झालें असें मानणें ती ईर्षा. ९ हें सुख माझा वांटा, तें दुसऱ्यांस कां गेलें, असें मानणें ती असूया[1]. १० कपटधर्मानें आपली प्रसिद्धी व्हावी असें मानणें हा दंभ. ११ दुसऱ्याचा पाडाव करून मी बरा म्हणणें, हा दर्प. १२ स्वमताग्रहण करणें हा अहंकार. १३ खाण्यापिण्याची, मलमूत्रोत्सर्गाची इच्छा करणें, ती इच्छा. १४ साधु, गुरुदेवाचे ठिकाणीं प्रीति ठेवणें ती भक्ति. १५ सत्कर्म, गुरु, वेदवाक्यावर विश्वास ठेवणें ती श्रद्धा. १६ या सोळा चित्तवृत्ती होत.

---

१ विनाकारण दोषारोप, स्पर्धा.

यांतून पहिल्या तेरा आपोआप उठतात, व त्या नरकामध्यें घालितात म्हणून त्या अशुद्ध. चवदावी वृत्ती इच्छा ही हटविली तर दुःखच होईल. तिचें योगानें स्वर्ग किंवा नर्क नाहीं. भक्ति आणि श्रद्धा या दोन वृत्ती शुद्ध, म्हणून याच्यावांचून इतर कामादि वृत्ती उठतांच ती ओळखून तिला रोधावी, व भक्ति, श्रद्धा वृत्तीचें अवलंबन करावें. जागृत्स्वप्नांमध्यें या वृत्ती असतात, म्हणून त्रिविध करणद्वारा कर्मं घडतात. निद्रासमाधीमध्यें वृत्ती नसतात, म्हणून कर्में घडत नाहींत.

**शिष्य**:——रागादिकांला कारण काय?

**गुरु**:——स्त्रियांना जोंपर्यंत मी स्त्री असा अभिमान आहे तोंपर्यंत भर्तृसेवा व पाकादि कर्में घडतात. तसेंच पुरुषाला मी पुरुष हा अभिमान आहे तोंपर्यंत स्त्रीपरिग्रह व संसारादि घडतात. एवंच सर्वांना वर्णाश्रमादिक अभिमानानेंच प्राप्त होतात. तो अभिमान ज्यांनीं टाकिला त्यांना रागादिक वृत्ती कशा उठतील?

**शिष्य**:——अभिमानाला विशेष अवयवादिकांची गरज लागते काय?

**गुरु**:——स्त्री-पुरुषाला सामान्यपणा असून प्रत्येक जातीमध्यें निरनिराळेपणानें अभिमान राहतो, तेव्हां त्यांस विशिष्ट अवयवादिकांची गरज नाहीं.

**शिष्य**:——विशिष्ट माता-पितृसंबंधानें अभिमान कां न यावा?

**गुरु**:——अभिमान यावा असें मानिलें तर ब्राह्मणादिकांपासून जारिणीचे ठिकाणीं उत्पन्न झालेल्यास सुद्धां ब्राह्मणत्वादिकांचा

अभिमान आला पाहिजे, पण तसें दिसत नाहीं. म्हणून लोकांमध्यें उत्सव, मंगल, सेना अनेक वस्तु समुदायानें गणतात. त्याप्रमाणें मायामय देहादि प्रपंचाचा अविवेकजन्य संस्कारें मी ब्राह्मण इत्यादि अभिमान दृढ होतो. हा वर्णाश्रमादि व्यवहार कालत्रयींही आत्म-रूपीं नाहीं. हा विचार न केल्यानेंच अभिमान चिकटतो.

**शिष्यः**—अविवेकाला कारण काय ?

**गुरुः**—अनादिकालापासून आलेलें अज्ञान हेंच कारण होय. त्याचे योगानें मी मला जाणत नाहीं असा व्यवहार होतो.

**शिष्यः**—मी मला जाणत नाहीं असें भ्रांतावांचून कोण म्हणेल ?

**गुरुः**—आपण देहाहून वेगळा असून मी ब्राह्मण इत्यादि अभिमान करणारे सर्व लोक भ्रांतच जाणावे.

**शिष्यः**—देहाहून आत्मा वेगळा आहे, व देह हा घटाप्रमाणें येथें नष्ट होणारा असें शास्त्री, पुराणिक हे जाणतात तेही भ्रांतच काय ?

**गुरुः**—ते कर्ता, भोक्ता, लोकांतरगामी चिदाभासरूपी जीवच आत्मा असें जाणतात. त्यावांचून अकर्ता, अभोक्ता, गमनादिशून्य व्यापक आत्मा जाणत नाहींत, म्हणून तेही भ्रांतच होत.

**शिष्यः**—तें असो, अज्ञानाला कारण काय ?

**गुरुः**—शास्त्रानें त्याला अनादि मानलें म्हणून याला कारण नाहीं.

**शिष्यः**—तर मग याचा अंतही नसेल; मग जिवाची मुक्तता कशी होईल ?

**गुरुः**—अज्ञान अनादि असलें तरी त्याचा अंत आहे. जसें प्राग-भावाला आदि नाहीं, पण अंत आहे. प्रध्वंसाला अंत नाहीं, पण आदि आहे. सारांश हा कीं, रोग कशानें केव्हां झाला असा निर्धार न झाला तरी वैद्यानें शास्त्रोक्त औषध देतांच नष्ट होतो. तसें, अज्ञानाचें कारण न मिळालें तरी तें वेदांतजन्य ज्ञानानें नष्ट होतें.

**शिष्यः**—अज्ञानाचें स्वरूप काय ?

**गुरुः**—अज्ञान ज्ञानानें नष्ट होतें म्हणून सत्य नव्हे. मी अज्ञानी असा लोकांना अनुभव आहे, म्हणून ( शशश्रृंगवत् ) असत्यही नव्हे. दोहोंचा एकत्र संभव होत नाहीं म्हणून सदसत्‌ही नव्हे. मुळीं आकाश सूक्ष्म ( निरवयव ), त्यांहून गुण, त्यांहूनही अज्ञान सूक्ष्म आहे, तेव्हां तें सावयव नव्हे, विश्वाकारानें परिणाम पावलें म्हणून निरवयवही नव्हे, उभय विरोधामुळें उभयात्मकही म्हणतां येत नाहीं. आत्मस्वरूपाहून भिन्न म्हणावें तर अद्वैतविरोध येतो. अभिन्न म्हणावें तर आत्म्याला जडत्वप्रसंग येतो, आत्मा तर सच्चिदानंदरूपी, आणि अज्ञान तर असज्जडदुःखरूपी, तेव्हां कांहीं म्हणतां येत नाहीं. तेव्हां अज्ञान हें अनिर्वाच्य होय. त्या अज्ञानापासून अविवेक, त्यांपासून अभिमान, त्यापासून रागादिक, त्यापासून कर्म, कर्मानें देह आणि देहामुळें दुःख होतें.

---

नाश.

**शिष्यः**—त्या दुःखाचा नाश कशानें होईल ?

**गुरुः**—देह नष्ट झाल्यानें दुःख नष्ट होतें, कर्म नष्ट झाल्यानें देहोत्पत्ती होत नाहीं. राग-द्वेष नष्ट झाल्यानें, कर्म नष्ट होतें. अभिमान नष्ट झाल्यानें रागद्वेषादि नष्ट होतात. अविवेक नष्ट झाल्यानें अभिमान नष्ट होतो, व अज्ञान नष्ट झाल्यानें अविवेक नष्ट होतो, आणि मी ब्रह्म आहें अशा महावाक्यजन्य अपरोक्ष ज्ञानानें अज्ञान नष्ट होतें. अज्ञान नष्ट झाल्यावर मग दुःखाला जागाच नाहीं.

**शिष्य**—प्रायश्चित्तरूप सत्कर्मानें ब्रह्महत्यादि पापें सुद्धां नष्ट होतात. तशा सत्कर्मानें अज्ञान कां न नष्ट व्हावें ?

**गुरुः**—कर्माचा अज्ञानाशीं विरोध नसल्यामुळें तें अज्ञानाचा नाश करूं शकत नाहीं. येवढेंच नव्हे तर तें अज्ञानाला वाढवितें. जसें, मेघ अमावास्यांधकाराला वाढवितात तसे.

**शिष्यः**—ज्ञान हें तरी मानसिक कर्म आहे. मग त्याचा अज्ञानाशीं विरोध कसा ?

**गुरुः**—ज्ञान दोन प्रकारचें, स्वरूपज्ञान आणि वृत्तिज्ञान. सुषुप्तीमध्यें अज्ञानाचा प्रकाश करितें तें स्वरूपज्ञान, आणि जागृत्-स्वप्नामध्यें विषयप्रकाश करितें, तें वृत्तिज्ञान. ज्याप्रमाणें सूर्यानें प्रकाशित केलेल्या भिंतीवर आदर्शांत प्रतिबिंबित झालेल्या अनेक सूर्यकिरणांचे अंतराअंतरानें विशेष प्रकाश दिसतात, त्याप्रमाणें जागृत्स्वप्नाचे ठायीं अनेक वृत्तिज्ञानें भासतात. सुषुप्तीमध्यें तर स्वरूपज्ञान मात्र असतें, तें जागृतस्वप्नामध्यें नाहीं, असें मात्र समजूं

नये. स्वरूपज्ञान नित्य असून सर्वत्र आहे. वृत्ति जागृत्स्वप्नामध्यें असतात. इतरत्र नाहींत. वृत्ति हा अंतःकरणधर्म होय; आणि ज्ञान हें आत्मस्वरूपच आहे. ते ज्या वेळीं मी ब्रह्म आहें अशा वृत्तिरूपानें परिणामाला पोचतें, तेंव्हां अज्ञानाचा नाश करितें; केवळ बुद्धिवृत्तीनेंच अज्ञान नष्ट होत नाहीं. जसें सत्कर्मानें पाप नष्ट होतें, तसें वृत्तिज्ञानानें अज्ञान नष्ट होतें. तें मनोवृत्तिरूप असलें, व प्रकाश करणारें रत्न पाषाणरूपीं असलें तरी त्याला रत्नदीप असें म्हणतात. तसें या वृत्तिमयाला ज्ञान म्हणतात. हा गौण व्यवहार होय.

**शिष्यः**—झोपेंत स्वरूप ज्ञान असतांही अज्ञानाशीं त्याचा विरोध दिसत नाहीं; तर तेंच वृत्तींत प्रविष्ट झालें, म्हणून अज्ञानाशीं विरोधा–विरोध कसा करील ?

**गुरुः**—सूर्यकिरणामध्यें कापूस धरला असतां दग्ध होत नाहीं, पण सूर्यकांत उपाधी मिळतां तेंच किरण कापूस जाळतें. तसें, सामान्य ज्ञानाचें वैर नसलें तरी विशेष ज्ञानाचें ( वृत्तिज्ञानाचें ) त्या अज्ञानाशीं वैर आहे.

**शिष्यः**—त्या वृत्तिज्ञानानें अज्ञान, व तत्कार्यप्रपंचनाश केला तरी वृत्तिज्ञान व स्वरूपज्ञान हीं दोन असतां अद्वैतसिद्धी कशी ?

**गुरुः**—कतक ( निवळीची बी ) रजोन्यायानें वृत्तिज्ञान, अज्ञान तत्कार्यं नाश करून स्वयें स्वरूपज्ञानामध्यें लीन होतें, तेंव्हां अद्वैत स्वरूप ज्ञानच राहतें. ज्ञान हें वस्तुतंत्र आहे. म्हणून तें ( कर्तुं

अकर्तुं अन्यथा कर्तुं ) अशक्य होय. उपासनायोग क्रियारूप आहेत म्हणून ते पुरुषतंत्र होते. ते ज्ञानवत् जाणूं नयेत. ज्याप्रमाणें लक्षणानें शालिग्रामघर्षण व तापानें सुवर्ण आणि परीक्षेनें रत्न कळतें त्याप्रमाणें वाक्यविचारजन्य वृत्तिज्ञानानेंच आत्मा कळतो; उपासनायोगकर्मादिकानें कळत नाहीं; म्हणून आत्मानात्मविचार करावा.

सहावा अध्याय समाप्त.

---

## अध्याय सातवा

**शिष्यः**—आत्मानात्मविचार तो कसा ?

**गुरुः**—आत्मा तीन देहांहून वेगळा, तीन अवस्थांचा साक्षी व पंचकोशांहून निराळा, सच्चिदानंदरूप आहे. अनात्मा, तीन शरीरें असज्जड, दुःखरूप असून व्यष्टि-समष्टिभेदानें सहा प्रकारचा होतो. ( आभासानें जीवेश्वरांना उत्पन्न करणारी अविद्या माया आपण होतो ) अशी श्रुति आहे. तेव्हा आत्म्याला मायोपाधीनें समष्टिरूप ईश्वरत्व आणि अविद्योपाधीनें व्यष्टिरूप जीवत्व हें वास्तविक नव्हे.

**शिष्यः**—जीवेश्वरांचीं सहा प्रकारचीं शरीरें व नांवें सांगावींत.

**गुरुः**—समष्टि, कारण, शरीराभिमानी, अंतर्यामी, अव्याकृत व ईश्वर म्हणतात. त्याला शरीराभिमान नाहीं. कारण, महासुषुप्तीमध्यें अहंकार लीन होतो. त्याची उपासना न घडल्यास समष्टि-

सूक्ष्मशरीराभिमानी, सूत्रात्मा, महाप्राण, हिरण्यगर्भ जो त्याची उपासना श्रुति सांगते. त्याला स्वप्नावस्था आहे म्हणून अभिमान नाहीं. त्याची उपासना न घडल्यास समष्टिस्थूलशरीराभिमानी जो वैराज, वैश्वानर, विराट् याची उपासना श्रुति सांगते. मीपणा करण्यास, प्रतियोगी ( दुसरा बरोबरीचा ) नाहीं म्हणून त्यालाही अभिमान नाहीं. त्याची उपासना न घडेल तर ईश्वरानें सृष्टिस्थितिसंहारार्थ स्वीकारलेल्या ब्रह्मा, विष्णु, शिवप्रतिमेची किंवा मत्स्यादि अवतारप्रतिमेची उपासना श्रुति सांगते.

**शिष्यः**––त्या अवतारादि मूर्तींचा ईश्वराला अभिमान आहे काय ?

**गुरुः**––होय आहे. नसेल तर कार्य कसें घडेल ?

**शिष्यः**––तर मग जीवाहून ईश्वराचें विशेषत्व काय ?

**गुरुः**––नटाप्रमाणें भक्तानुग्रहार्थ ईश्वर, कार्यापुरता अभिमान कल्पितो. जीव तर सदोदित अभिमानी असतो, हा विशेष होय. अस्तु. याप्रमाणें श्रुतीनें ईश्वराचा भेद कल्पिला. त्याचा भावार्थ न जाणून शैव, वैष्णवादि मताभिमानी परस्पर व्यर्थ कलह करितात.

**शिष्य**––श्रुतीनें भेद कां सांगितला ?

**गुरुः**––अनादिकालापासून आलेल्या प्रवृत्तीला अनुसरून अंतर्मुखता होण्याकरितां अधिकारानुसारें लोकांला, श्रुति भेद सांगते, तो वास्तविक नव्हे. हें असो. आतां व्यष्टि एक, कारण. व्यष्टिशरीरोपाधिक जीवाला प्राज्ञ, पारमार्थिक, अविद्यावच्छिन्न म्हणतात. व्यष्टिसूक्ष्मोपाधिकाला तैजस, स्वप्नकल्पित, प्रातिभासिक म्हण-

तात. व्यष्टिस्थूलोपाधिकाला विश्व, व्यावहारिक, चिदाभास म्हणतात.

**शिष्य**:—जीवाला तीन शरीरांची आवश्यकता आहे काय ?

**गुरु**:—होय. अंत:करणावांचून प्रतिबिंबित ( जीवत्व ) होत नाहीं, म्हणून लिंगशरीर पाहिजे. व तें स्थूलावांचून कार्ययोग्य होणार नाहीं, म्हणून स्थूलशरीर पाहिजे. हीं दोन्हीं कार्यशरीरें कारणावांचून राहणार नाहींत म्हणून कारणशरीर अवश्य पाहिजे.

**शिष्य**:—जीवाला तिन्ही शरीरांचा अभिमान आहे काय ?

**गुरु**:—होय. अभिमान नसेल तर कर्म घडणार नाहीं व कर्म न घडेल तर शरीर कोठून होईल ? मग जीवपणाही राहणार नाहीं. तस्मात् जीवाला अभिमान आहे.

**शिष्य**:—एकालाच उपाधीमुळें अनेकत्व येतें, याविषयीं दृष्टांत काय ?

**गुरु**:—एका देवदत्ताला पुत्रोपाधीनें पितृत्व, पौत्रोपाधीनें पितामहत्व जसें येतें, तसें आत्म्याला व्यष्टि-समष्ट्युपाधीनें जीवेश्वरत्व आलें.

**शिष्य**:—उपाधीनें देवदत्ताचें नाम मात्र बदललें; परंतु किंचिज्ज्ञत्व, सर्वज्ञत्व भेदवत् स्वरूपभिन्नपणा कोठें बदलला ?

**गुरु**:—जसें माधुर्य द्रव शैत्यरूपानें एकच असून ग्रामसंरक्षण महाशक्तीनें तडाग-जल, व एकगृहसंरक्षणाल्पशक्तीनें घटजल, जसें भिन्न होतें; किंवा उष्णरक्तप्रकाशरूप अग्नि मोठ्या उपाधीमुळें दिवा, दिवटी अशा भेदानें भिन्न दिसतो, तसें मायोपाधीनें

सर्वज्ञ ईश्वरत्व आणि अविद्योपाधीनें किंचिज्ज्ञ जीवत्व भासलें, तरी त्याचें एकत्व अखंडार्थसंबंधानें जाणावें.

**शिष्यः**—अखंडार्थसंबंध कसा ?

**गुरुः**—'तें तूं आहेस,' या वाक्याच्या पहिल्या दोन पदांचा सामानाधिकरण्य संबंध १. पदांच्या, अर्थाचा, विशेषणविशेष्य-भाव संबंध २. पदार्थांशीं आत्म्याचा लक्ष्य-लक्षणभाव संबंध ३. जसें 'तो हा देवदत्त', ह्या ठिकाणीं तो आणि हा, या दोन पदांचें एका देवदत्तावरच सामानाधिकरण्य होतें; तसें, (तें तूं) या दोन पदांचें सामानाधिकरण्य एका चैतन्यावरच जाणावें. त्या कालाचा किंवा देशाचा वाचक तो शब्दार्थ, ह्या कालाचा किंवा देशाचा वाचक शब्दार्थ, या दोहोंचा परस्पर भेद घालवून परस्पर विशेषणविशेष्य-भावसंबंध जसा होतो; तसा सर्वज्ञत्व-परोक्षत्व-विशिष्ट चैतन्य-वाचक 'तें' ह्या पदार्थाचा, व किंचिज्ज्ञत्वापरोक्षत्वादिविशिष्ट चैतन्य-वाचक 'तू' ह्या पदार्थाचा परस्पर भेद दूर करणारा, विशेषण-विशेष्य-भावसंबंध जाणावा. (तो हा) ह्या पदार्थांचे विरुद्धांश वाच्यार्थ सोडून अविरुद्धांश चैतन्यमात्र लक्ष्यार्थ घेण्याचा तो लक्ष्यलक्षणभाव-संबंध जाणावा. कारण, वाक्यार्थग्रहणाविषयीं मुख्या, गौणी, लक्षणा अशी तीन प्रकारची वृत्ति होते. जसें, राजा जातो, ही मुख्य वृत्ति. नीलोत्पल किंवा सिंह-देवदत्त ही गुणवृत्ति. जह-ल्लक्षणा, अजहल्लक्षणा, जहदजहल्लक्षणा (भागत्याग लक्षणा), अशा भेदानें लक्षणा तीन प्रकारची. (गंगायां घोषः) गंगेवर गौळ्याचा वाडा. ही सर्वथा स्वार्थत्याग करून संबंधी तीरावर

केलेली जहल्लक्षणा. लक्ष्यांश एक असल्यामुळें सांप्रत ती अनुपयुक्त. कावळ्यापासून दहीं राखावें ही स्वार्थांश न सोडतां काकोपलक्षणानें दध्युपघातकाची ग्रहण करणारी अजहल्लक्षणा. ही वाच्यार्थविरुद्ध आहे, म्हणून तीही तूर्त उपयोगी नाहीं. तस्मात् (तो हा देवदत्त) याप्रमाणें विरुद्धांश वाच्यार्थ सोडून अविरुद्धांश लक्ष्यार्थ (अखंडैकरसत्वें) ग्रहण करणारी जहदजहल्लक्षणा प्रस्तुत उपयोगी आहे.

**शिष्य**:—वाच्यार्थ व लक्ष्यार्थ कोणते ?

**गुरु**:—माया, मायाप्रतिबिंबित (ईश) व मायाधिष्ठान ब्रह्म हें तत् पदाचें वाच्यार्थ, ब्रह्मचैतन्य लक्ष्यार्थ. अविद्या, अविद्याप्रतिबिंब (जीव) व अविद्याधिष्ठान साक्षि चैतन्य हें त्वं पदाचें वाच्यार्थ, कूटस्थ चैतन्य लक्ष्यार्थ. तेव्हां वाच्यार्थ सोडून लक्ष्यार्थ ब्रह्मचैतन्य, कूटस्थ चैतन्य यांचें ऐक्य झालें. म्हणजे जसें पुत्रपौत्रोपाधि जातां पितृपितामहत्व जाऊन देवदत्त मात्र राहतो; किंवा दिवा, दिवटी सोडल्यावर लोहितोष्णप्रकाश अग्नीच राहतो; किंवा तळें, घडा सोडल्यावर माधुर्य, द्रव, शैत्यजल मात्र राहतें; तसें माया व अविद्या या उपाधि जातां ईश्वर-जीव-भाव जाऊन ब्रह्म एकच राहतें.

सातवा अध्याय समाप्त.

---

## अध्याय आठवा

**शिष्यः**—तें ब्रह्म कसें जाणावें ?

**गुरुः**—तीन देहांहून वेगळें, तिन्ही अवस्थांचें साक्षि, ( जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति या तीन अवस्था ) पंचकोशांहून निराळें सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप जाणावें. यांतून शरीरत्रयविलक्षणत्व व पंचकोशव्यतिरिक्तत्व हें ‘ अतद्व्यावृत्तिलक्षण[1] ’, अवस्थासाक्षित्व तटस्थ, व सच्चिदानंदत्व हें स्वरूपलक्षण त्वंपदार्थाचें. पृथिव्यादिकांचा निषेध करून अवशिष्ट राहातें तें अतद्व्यावृत्तिलक्षण. प्रपंचाला आधिष्ठानभूत असतें तें तटस्थ लक्षण. सत्यज्ञानानंद हें स्वरूपलक्षण तत् पदार्थाचें. या दोहोंचें ऐक्य तें अद्वितीय परब्रह्म जाणावें.

**शिष्यः**—तीन शरीरें कशीं जाणावीं ?

**गुरुः**—मातापितृभुक्तान्नपरिणत शुक्रशोणितापासून उपजून अन्नानें वाढतें, अन्न न मिळतां किंवा रोगानें मरतें, तें अन्नमय स्थूल शरीर ( शीर्यते ) नष्ट होतें म्हणून शरीर म्हणावें. सत्रा अवयवांचें लिंगशरीर. रागद्वेषादि वृत्ति वाढल्या म्हणजे याची वृद्धि व मी साक्षी अशा अध्यात्म विचारानें विवेकी जनांचे ठिकाणीं याचा लय होतो म्हणून शरीर. अज्ञान हें कारणशरीर. हें ‘ मी जीव ’ या अभिमानानें वाढतें व ‘ मी ब्रह्म ’ या स्वानुभवानें नष्ट होतें म्हणून शरीर. देह ( दह्यते ) जाळला जातो म्हणून देहही म्हणतात. स्थूलदेह अग्नीनें जळतो. डोळ्यानें दिसतो तो स्थूल देह. न दिसतां विचारानें

---

१ जडपदार्थनिषेधलक्षण.

कळतो तो सूक्ष्म देह. या दोहोंना कारणभूत जें अज्ञान तो कारण-देह होय.

**शिष्यः**—पूर्वीं पंचभूतांपासून दोन्ही देह जाहले म्हटलें आणि आतां अज्ञानापासून होतात म्हणतां; तर पूर्वापरविरोधाची वाट काय ?

**गुरुः**—अध्यारोपसृष्टि म्हणजे एकापुढें एक क्रमानें होणें. पहिल्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें पंचभूतांपासून दोन देह होतात, हें खरें. पण वास्तविक युगपत्[1] सृष्टीचा विचार केला तर केवळ अज्ञान सर्वांला कारण आहे, म्हणणें योग्य आहे. वेदांमध्यें केव्हां केव्हां युगपत्सृष्टि (एकदम अज्ञानानें सर्व प्रपंचविलास दिसणें) मानली आहे. केव्हां तरी स्वप्नामध्यें एकदम सर्व थाट दिसतो. केव्हां एकापुढें एक क्रम दिसतो, तद्वत् सृष्टीही जाणावी. अध्यारोपसृष्टीमध्यें पंचभूतें दोन्ही शरीरांना कारण, व युगपत्-सृष्टीमध्यें केवळ अज्ञानच कारण मानलें. कशीही सृष्टि होवो मिथ्यात्व समानच आहे. त्याच्या मिथ्यात्वाचें विवेचन मुमुक्षूंनीं करावें. स्थूलशरीर उघड आहे. सूक्ष्मशरीर सत्रा अवयवांचें. यावांचून स्थूलदेह कार्य करूं शकत नाहीं.

**शिष्यः**—दोन्ही मिळून कार्य करितात काय ?

**गुरुः**—अग्निसंयोगें काष्ठ दाहपाकादि करितें तथापि तें कार्य अग्नीचेंच जसें, तसें स्थूलदेहाश्रयें घडलेलें दर्शनगमनादि कार्य सूक्ष्म शरीराचें होय.

---

१ एकदम.

**शिष्यः**---सत्रा अवयव कोणते ?

**गुरुः**---ज्ञानेंद्रियें पांच ५, कर्मेंद्रियें पांच ५, प्राण पांच ५, मन १, बुद्धि १ मिळून सत्रा १७. लोकांमध्यें कांहीं जाणणार तर उद्देश, लक्षण, परीक्षा हे तीन उपाय आहेत. उद्देश म्हणजे वस्तु-नामसंग्रहण, लक्षण म्हणजे वस्तुस्वरूपग्रहण, परीक्षा म्हणजे वस्तु-स्वरूपविचार. सत्रा अवयवाचें नाम घेणें हा उद्देश. अव्याप्ति-अति-व्याप्ति-असंभव दोपरहित असाधारण धर्म हें लक्षण. लक्ष्यैकदेशीं लक्षण पाहाणें ती अव्याप्ति. जशी कपिला गाई. अलक्ष्यावर लक्षण-वृत्ति ती अतिव्याप्ति. जशी चतुष्पदा गाय. लक्ष्यमात्रावर अलक्षण तो असंभव. जशी एकखुराची गाय. हे तिन्ही दोप नसोन सास्ना[1]-दियुक्त जसें गाईचें लक्षण तसें इतरत्र घेणें. ते असें. दिग्देवतांनीं प्रेरणा केल्यावर कानाच्या छिद्रांत राहून जें नाना शब्द, भापा जाणतें, तें श्रोत्रेंद्रिय हें लक्षण. कर्णछिद्रच जाणतें म्हणावें तर निद्रेमध्यें तें असून शब्दज्ञान होत नाहीं. तेव्हां तें श्रोत्र निराळेंच ही परीक्षा. याप्रमाणेंच सर्वत्र जाणावें. वायुदेवतायोगें त्वचेला व्यापून शीतोष्ण, मृदु, कठिण, स्पर्श जाणतें तें त्वगिंद्रिय. सूर्यप्रेरित चक्षु इंद्रिय डोळ्यांचे बुबुळावर राहून जें लहान, मोठें, आंखुड, लांब, निळें, पिवळें, पांढरें, तांबडें रूप जाणतें तें चक्षु. वरुणानें प्रेरित जिव्हाग्रावर राहून जी तिखट, अंबट, खारट, तुरट, कडु, गोड, रस जाणते ती जिव्हा. अश्विनीकुमारप्रेरित नासाग्रस्थ जें वास, घाण, गंध घेतें तें घ्राण. अग्निप्रेरित कंठ, ओठ, तालु, शिर, ऊर,

---

१ गलकबल.

दांत, नासा, जिव्हाश्रयानें स्वरवर्णोच्चार करतें तें वागिंद्रिय. जें इंद्रानें प्रेरित करतलाश्रयें देतें घेतें तें पाणींद्रिय. विष्णुप्रेरित पाद-तलाश्रयें चालतें तें पादेंद्रिय. मृत्युप्रेरित गुदाश्रयें मलोत्सर्ग करितें तें गुद. प्रजापतिप्रेरित लिंगाश्रयें रतिसुख करितें तें उपस्थ. कंठीं राहून चंद्रप्रेरणेनें संकल्प विकल्प करितें तें मन. मुखीं राहून बृहस्पतीच्या प्रेरणेनें निश्चय करिते ती बुद्धि. हृदयीं राहून रुद्राच्या प्रेरणेनें अभिमान करितो तो अहंकार. नाभिस्थानीं राहून क्षेत्रज्ञ-प्रेरणेनें आठवण करितें तें चित. विशिष्टाचे प्रेरणेनें हृदयीं राहून श्वासोच्छ्वास करितो तो प्राण. विश्वसृष्टाचे प्रेरणेनें गुदस्थानीं राहून मलमूत्रोत्सर्ग करितो तो अपान. विश्वयोनीच्या प्रेरणेनें आंत बाहेर देह व्यापून इंद्रियांना बल देतो तो व्यान. अजाच्या प्रेरणेनें कंठीं राहून निद्राकाळीं इंद्रियांना गोळा करतो व जागेपणीं इंद्रियाना जागोजाग घोळवितो तो उदान. जयाचे प्रेरणेनें नाभिदेशीं राहून अन्न-पाण्याचें समीकरण करितो तो समान. यांचे पोटभेद पांच उपवायू, ते हे. नाग उद्गार[1] करतो. कूर्म उन्मीलनादि करितो. कृकल शिंक करितो. देवदत्त जांभई देतो. धनंजय देहाला उबारा करितो. हे सर्व मिळोन एक लिंगशरीर. अज्ञान हेंच कारणशरीर. ( अज्ञानं कारणं ) अशी श्रुति आहे. स्थूल, सूक्ष्म देहरूप कार्यानें कारणाचा तर्क होतो ही युक्ति. मी अज्ञ हा अनुभव.

**शिष्यः**—या तिन्ही देहांहून सच्चिदानंदाचा वेगळेपणा कसा?

---

१ ढेकर.

**गुरु:**—बाधरहित सत्, स्वप्रकाश चित्, स्वानुभव आनंद. जसें पुरुषलक्षण स्त्रियांना नाहीं, व स्त्रीलक्षण पुरुषाला नाहीं, तसें सल्लक्षण अनृताला नाहीं, व अनृतलक्षण सताला नाहीं, व प्रकाश-लक्षण अंधकाराला नाहीं, आणि अंधकारलक्षण प्रकाशाला नाहीं. तसें, चिल्लक्षण जडाला नाहीं, व जडलक्षण चिताला नाहीं. चांदण्याचें लक्षण उन्हाला नाहीं, व उन्हाचें लक्षण चांदण्याला नाहीं. तसें, आनंदलक्षण दुःखाला नाहीं, व दुःखलक्षण आनंदाला नाहीं. कालत्रयीं यथार्थ असणारें सत्. कालत्रयीं नसून खऱ्यासारखें भासतें व विचारानें नष्ट होतें तें असत्. मंदांधकारीं पडलेला रज्जु आपल्यावर आरोपित सर्पादि भ्रांतीचे वेळीं पूर्वीं व पश्चात् एकरूपीच असतो व भ्रमानें भासलेले सर्पादिक विकार विचारानें नाहींसे होतात. या दोहोंचे परस्पर शब्दानें, विषयानें, लक्षणानें, प्रतीतीनें, व्यवहारानें, वैलक्षण्य आहे. तसें सल्लक्षण असतावर ( देहादिकांवर ) व असल्लक्षण सतावर नसून यांचें परस्पर वैलक्षण्य आहे. सूर्यादि प्रकाशाची गरज न ठेवितां स्वयें प्रकाशरूप असून देहादि जड पदार्थांना प्रकाश करतें तें चित्; स्वयें अप्रकाशरूप असून अन्याला प्रकाशित करीत नाहीं तें जड. ज्याप्रमाणें सूर्य स्वयं प्रकाशमान असून इतरांची गरज न ठेवितां घटादिकांना प्रकाशित करतो; घटादिक तर स्वयें अप्रकाशित असून इतरांना प्रकाशित करीत नाहींत; त्याप्रमाणें पूर्वोक्त पंचप्रकारांनीं चिज्जडवैलक्षण्य जाणावें.

**शिष्य:**—हें जाणल्याचें फल काय ?

**गुरु:**——प्रकाश्यधर्म प्रकाशकाला लागत नाहींत. जसें, सूर्यानें प्रकाशित केलेल्या घटादिकांचे बरे-वाईटपणाचे धर्म, व शुद्धाशुद्धता यांचा संबंध सुद्धां सूर्याला नाहीं, तसें देहादिकांचे धर्म आत्म्याला स्पर्श करीत नाहींत. असें जाणून मुमुक्षूनें देहादिनिष्ठ, नामरूप, जाति, वर्णाश्रम, प्रवृत्ति, निवृत्ति, विधिनिषेध, षड्भावविकार, षडूर्मी, आंध्य, मांद्य, पटुत्वादिक धर्म मला स्पर्श करीत नाहींत, असें जाणलें म्हणजे बंध होत नाहीं. हें फल.

**शिष्य:**——आनंदलक्षण काय?

**गुरु:**——नित्य निरुपाधिक निरतिशय जें सुख तो आनंद. प्रतिकूल द्वेषविषय दु:ख. तें त्रिविध. देवांनीं दिलेलें अनावृष्ट्यादि आधिदैविक, भूतभौतिकापासून जाहलेलें आधिभौतिक, प्रारब्धानें देहादिकांचे ठाईं रोगानें घडलेलें आध्यात्मिक. अमृत सुखरूप असून, जीवाला आनंदित करितें. कालकूट स्वयें तापरूपी असून, जीवाला ताप देतें. यांचें परस्पर असें वैलक्षण्य आहे. रज्जुवत् सद्रूप, आदित्य-वत् चिद्रूप, अमृतवत् आनंदरूप आत्मा व सर्पवत् मिथ्या, घटवत् जड, विषवत् दु:खरूपी देहादि प्रपंच जो त्याहून वेगळा, तो मी असंग आत्मा असें जाणतो तो मुक्त होतो.

आठवा अध्याय समाप्त.

---

## अध्याय नववा

**शिष्यः**—आत्मा अवस्थासाक्षी कसा जाणावा ?

**गुरुः**—तमोगुण स्थूल, रजोगुण चंचल व सत्त्वगुण सूक्ष्म. तेव्हां धूमप्रवेशयोग्य छिद्रामध्यें स्तंभ जात नाहीं, चंचल दिव्याकडे बारीक लिपी वाचली जात नाहीं, तसा आत्मा राजस, तामस मनानें जाणला जात नाहीं. तर सात्त्विक मनानेंच जाणावा. तो असा. इंद्रियांनीं बाह्य विषय घेणें, ती जाग्रदवस्था. जाग्रत्वासनेनें अन्तःकरणाचा दृष्टश्रुताविषयीं भोक्तृभोग्यरूप परिणाम होतो, तें स्वप्न. सर्वोपसंहार होऊन कारणरूपानें बुद्धि राहिली असतां अज्ञानसाक्षीपणा होतो, ती निद्रा अवस्था. आपण निर्विकार साक्षात् पाहणें, तें साक्षित्व. जसें एक संन्यासी स्वस्थ बसला असतां तेथें दोन पुरुष आले व भांडून परस्परास मारूं लागले; तें सन्याश्यानें पाहिलें, म्हणून तो साक्षी. तसा आत्मा, जीव आणि जीवांचे अवस्थाव्यापार साक्षात् जाणतो, म्हणून तो (आत्मा) साक्षी होय.

**शिष्यः**—यास दृष्टांत सांगावा.

**गुरुः**—मोठ्या नगरासारखी जाग्रदवस्था, राजवाड्यासारखी स्वप्नावस्था, अंत.पुरासारखी निद्रावस्था. तेथें राजासारखा अभिमानी जीव. जसा राजा चतुरंग सेनेसहित मोठ्या नगरामध्यें फिरून शुभाशुभ अनुभवून त्या सैन्यास सोडून राजवाड्यांत येतो; व शुभाशुभाचा विचार करून, सर्वांचें निवारण करून, अन्तःपुरांत

जाऊन, सर्व व्यापार सोडून, आनंदानें स्त्रीशीं रति घेतो; तसा जीवात्मा स्थूलशरीराभिमानी विश्व होऊन, जाग्रदवस्था भोगून ( अनुभवून ), नंतर सूक्ष्मशरीराभिमानी तैजस होऊन, स्वप्नावस्था अनुभवून, नंतर कारणशरीराभिमानी प्राज्ञ होऊन सर्व व्यापार सोडून, बुद्धीला घेऊन, स्वरूपानंदाचा अनुभव घेतो ( निजतो ). ह्या जीवाच्या तीन्ही अवस्था पहाणारा कूटस्थ आत्मा तर प्रत्यक् स्वरूपानें आकाशवत् असंग आहे. याविषयीं ( साक्षी चेता केवल निर्गुण ) ही श्रुति, आकाशदृष्टांत ही युक्ति, गेलेल्या अवस्था स्मरतात हा अनुभव.

**शिष्य**:—जीवच अवस्थासाक्षी मानला तर निराळा कूटस्थ साक्षी कां घ्यावा ?

**गुरु**:—अंतःकरणप्रतिबिंबित जीव, तो झोपेंत लीन होतो. तो तीन्ही अवस्थांचा साक्षी कसा होईल ? होणार नाहीं. तेव्हां बिंबभूत आत्मा साक्षी जाणावा. कारण, त्याला अवस्था नाहींत. म्हणून तो अविकारी नित्य आहे. जीव तर अंतःकरणतादात्म्यानें मी सुखी, मी दुःखी असा विकारी होतो.

**शिष्य**—जीवाशिवाय दुसरा आत्मा कोण ? त्याचें लक्षण काय ? तो आहे म्हणण्यास प्रमाण काय ? व तो कसा कळावा ?

**गुरु**:—निर्विकार कूटस्थ आत्मा आकाशवत् सर्व व्यापक आहे. त्याचें अंतःकरणांत प्रतिबिंब पडलें तोच ( प्रतिबिंब ) संसारी जीव होय. याविषयीं श्रुतिप्रमाण आहे. तो सच्चिदानंद आत्मा ( बिंबभूत ) या वेळीं जीव जागतो, स्वप्न पहातो, या वेळीं अज्ञा-

नानें मोहित होऊन गाढ झोप घेतो, या वेळीं उदासीन, सुखी, दुःखी आहे, इत्यादि जाणतो. तो सर्व अवस्थांचा साक्षी. स्वमुख-सौंदर्य पहाणें असेल तर जसें आरशांत पहातां येतें, तसें या आत्म्याला जाणणार तर अंतःकरणप्रतिबिंबानें जाणतां येतें. स्वमुख पहाणारा हा आरसा, हें मुखाचें प्रतिबिंब व त्यानें कळलेलें हें ग्रीवास्थमुख असें स्पष्ट जाणतो; तसें विचारानें हें अंतःकरण, हा अंतःकरणप्रतिबिंबित जीव आणि हा निर्विकार साक्षी कूटस्थ आत्मा, असे तो आपणच आपणाला जाणील. कारण, तो द्रष्टा आहे. कधींही कोणाला दृश्य होत नाहीं. जसा दृश्य घट द्रष्ट्याला जाणीत नाहीं. द्रष्टा तर आपल्यासह घटालाही जाणतो. तसें स्वयंप्रकाश आत्म्याला, इंद्रियें, प्राण, अंतःकरण हीं जाणत नाहींत. स्वयंप्रकाश आत्मा तर आपणांसहित सर्वांना जाणतो. हें प्रमाणानें कळतें.

**शिष्यः**—प्रमाणें कितीं व त्यांचीं लक्षणें काय ?

**गुरुः**—१ प्रत्यक्ष २ अनुमान ३ उपमान ४ शब्द हीं चार प्रमाणें. शिवाय १ अर्थापत्ति २ अनुपलब्धि ३ ऐतिह्य ४ असंभव हे चार त्याचेंच पोटभेद आहेत. इंद्रियसन्निकर्षानें होणारें तें प्रत्यक्ष प्रमाण. पण आत्मा अतींद्रिय आहे म्हणून तें उपयोगी नाहीं. धूमादि लिंगानें होणारें तें अनुमान. आत्मा निरंश आहे म्हणून हें उपयोगी नाहीं. सादृश्यानें होणारें तें उपमान. आत्मा अद्वितीय आहे म्हणून हेंही अनुपयुक्त. बाकी शब्दप्रमाण हें आत्मज्ञानाला उपयुक्त आहे. आप्ताचें ( ईश्वराचें ) वाक्य ( वेद ) हें शब्दप्रमाण.

त्यानें मी अविकारी, अवस्थासाक्षी, पंचकोशांहून वेगळा असें जाणतो तो मुक्त होतो.

नववा अध्याय समाप्त.

---

## अध्याय दहावा

**शिष्यः**——पंचकोश कोणते व त्यांचीं लक्षणें कशीं ?

**गुरुः**——१ अन्नमय २ प्राणमय ३ मनोमय ४ विज्ञानमय आणि ५ आनंदमय हे पांच कोश. अन्नविकार जें शुक्रशोणित, यानें जाहलेला व अन्नानें वाढलेला, षट्भावविकारी स्थूलदेह हा अन्नमय कोश १. कर्मेंद्रियें ५ पांच आणि प्राण ५ पांच, मिळून प्राणमय कोश २. ज्ञानेंद्रियांसहित मन ( बहिर्वृत्तिक ) हा मनोमय कोश ३. ज्ञानेंद्रियांसहित बुद्धि ( अंतर्वृत्तिक ) हा विज्ञानमय कोश ४. प्रिय इष्टवस्तुदर्शनानें मोद[1] ( त्याच्या लाभानें होणारा आनंद ), प्रमोद ( त्याचा अनुभव किंवा भोगानें होणारा आनंद ) यांसह कारणशरीरस्थ सत्त्व हा आनंदमय कोश ५. याप्रमाणें हे पांच कोश होत. खड्गाला कोश, शिवलिंगाला संपुष्ट, अंब्याला साल, व पुरुषाला अंगरखा आच्छादून ठेवितो त्याप्रमाणें हे कोश आत्म्याला आच्छादून ठेवितात.

**शिष्यः**——खड्गादिक निराळे व त्याचे कोशादिक निराळे असून आच्छादक होतात हें उघड कळतें. पण आत्मसंबंधानें जाहलेले पांच कोश आत्म्याला कसे झांकतात ?

---

१ होणारा आनंद.

**गुरु**:——सूर्यसत्तेनें दिसणारे व सूर्यकिरणांपासून जाहलेले मेघ किंवा अग्निसत्तेनें असणारा धूम, हे जसे बालदृष्टया आच्छादक होतात, तसेच कोश आत्म्याला आच्छादक होतात. जसे खड्गादिकाहून कोशादिक निराळे, तसे आत्म्याहून पंचकोशही निराळेच आहेत.

**शिष्य**:——कोशाचा व आत्म्याचा संबंध कसा?

**गुरु**:——१ समवाय २ संयोग आणि ३ अध्यास असा तीन प्रकारचा संबंध. एकतराध्यास[1] आणि अन्योन्याध्यास[2] असे दोन प्रकारचे अध्यास. अवयव, अवयवी; गुण, गुणी; क्रिया, क्रियावान्; जाति, व्यक्ति; विशेष, नित्यद्रव्य; यांचा समवायसंबंध. आत्म्याची अवयवादिकांत गणना नाहीं म्हणून हा समवायसंबंध त्याला नाहीं. भेरीदंडादिवत् संयोगसंबंध. आत्म्याची द्रव्यांत गणना नाहीं, म्हणून हाही संबंध त्याला लागत नाहीं. रज्जुसर्पवत्, अध्याससंबंध. हा आत्मा आणि कोश यांना लागतो. कोशाचें आणि आत्म्याचें एकप्रत्ययविषयत्व होतें, म्हणून अन्योन्याध्यास जाणावा. जेव्हां अन्नमयाचा अध्यास होतो तेव्हां मी देव, मनुष्य, स्त्री, पुरुष; मी जाहलों, आहें, मी वाढतों, माझा वाईट परिणाम जाहला, मी क्षीण जाहलों, मी मरेन; मी बाल, तरुण, वृद्ध; मी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र; मी ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी; मी दीक्षित इत्यादि अन्नमय कोशाचे विकारधर्म आपल्यावर व आपले सच्चि-

[1] दोहोंपैकीं एकावर होणारा अध्यास. [2] परस्परें एकमेकावर होणारा अध्यास.

दानंद धर्म अन्नमयावर आरोपित करितो. प्राणमयाशीं तादात्म्य जाहल्यावर मी भुकेलों, तान्हेलों, मी बलवान्, बोलका, गंता[1], दाता, विसर्ग करणारा, मूक, पंगू षंढ इत्यादि प्राणमयाचे धर्म आपल्यावर व आपले प्राणमयावर आरोपित करितो. मनोमय-तादात्म्यानें मी संकल्पविकल्पवान्, शोकमोहवान्, कामी, लोभी, श्रोता, स्प्रष्टा[2], रस घेणारा, हुंगणारा, बहिरा, अंधळा इत्यादि मनो-मयधर्म आपल्यावर व आपले सच्चिदानंद मनोमयावर अरोपित करितो. विज्ञानमयतादात्म्यानें मी कर्ता, बुद्धिमान्, ऊहापोह-कुशल, अवधानी, रोगी, द्वेषी, श्रोत्रिय, पंडित, विरक्त, भक्तिमान्, उपासक, ज्ञानी इत्यादि विज्ञानमयधर्म आपल्यावर व आपले विज्ञानमयावर लोटतो. आनंदमयाशीं तादात्म्य होतां मी भोक्ता, सुखी, संतुष्ट, सात्त्विक, राजस, तामस, मूढ, दुष्ट, शून्य, मोहित, अविवेकी, भ्रांत इत्यादि आनंदमयाचे धर्म आपणावर .व आपले आनंदमयावर आरोपित करितो.

**शिष्यः**——हा अध्यास कां जाहला ?

**गुरुः**——मी, आत्मा निराळा व हे पंचकोश माझ्याहून निराळे, असा विचार न केल्यामुळें जाहला.

**शिष्यः**——कोश निराळे कसे ओळखावेत ?

**गुरुः**—— जसें, हा पुत्र, ही स्त्री, हा पशु इत्यादि निराळे पहातात, त्याप्रमाणें हा देह, हा प्राण, हें मन, ही बुद्धि, हा

---

१ गमन करणारा. २ स्पर्श करणारा.

आनंद; मी तर ( अशरीरं या श्रुतीनें ) देहरहित आहें. पुत्रादिकांचे विकार आपल्याला लागत नाहींत, असा निर्धार करावा.

**शिष्यः**——पुत्रादिक बाह्य दृष्टीनें दिसतात. कोश कसे दिसतील ?

**गुरुः**——बाह्यदृष्टि नेत्र, आंतर्दृष्टि बुद्धि. बाह्य दृष्टीनें न दिसणारे वीणास्वरादिक बुद्धीनें कळतात. एकत्र असलेलें दूध-पाणी इतरांना पृथक् न करतां आलें तरी तें हंस करितो. तसें आंतर कोश नेत्राला न दिसले तरी बुद्धीनें उघड कळतील. तेव्हां बुद्धीनें विचार करून पाहिल्यावर रज्जुसर्पवत् हे पंचकोश आत्म्यावर आरोपित आहेत. आरोपित जें, तें मिथ्या.

**शिष्यः**——दोरीवर भासलेला सर्प दिवा घेऊन पाहिल्यावर नाहींसा होतो; आणि हे पंचकोश ज्ञानोत्तरही असतात. मग ते असत्य कसे ?

**गुरुः**——प्रातिभासिक सत्य, व्यावहारिक सत्य, आणि पारमार्थिक सत्य असें त्रिविध सत्य. जीवसृष्टि आणि ईशसृष्टि अशी दोन प्रकारची सृष्टि. रज्जुसर्पादि जीवसृष्टि, हें प्रातिभासिक सत्य. जीवसृष्ट्यधिष्ठान पंचभूतादि ईशसृष्टि, हें व्यावहारिक सत्य आणि याचें अधिष्ठान ब्रह्म, हें पारमार्थिक सत्य. सत्य, निर्बाध ज्ञानानें प्रातिभासिक नष्ट होतें. व्यवहार संपेपर्यंत व्यावहारिक राहतें. प्रातिभासिक आणि व्यावहारिक अध्यासानें समान आहे. पण सत्तेनें समान नाहीं. रज्जुसर्पवत् व्यावहारिक नष्ट होईल, तर गुरुशिष्य-परंपरा व ज्ञानी लोकांचा व्यवहारही लोपेल, तर असें नाहीं. मृत्तिकेवर आरोपित घटाचें नामरूप बाधित केल्यावर मृत्तिका मात्र

राहते. तसे पंचकोश ज्ञानानें बाधित केल्यावर केवळ सच्चिदानंद आत्मा अवशिष्ट राहतो.

अध्याय दहावा समाप्त.

---

## अध्याय अकरावा

**शिष्यः**—आत्मा सच्चिदानंदरूपी कसा ओळखावा ?

**गुरुः**—कालत्रयीं निर्बाध, तें सत्. ( सृष्टीच्या पूर्वीं अद्वितीय एक सत् होतें. ) हें श्रुतिप्रमाण आहे. आढ्य, दरिद्री, कर्मी, भक्त, मुमुक्षु यांचा अनुभव आहे, तो असा. मीं पूर्वीं सत्पात्रीं धर्म केला म्हणून या जन्मीं धनी[1] जाहलों; आतांही धर्म करीन तर पुढें ऐश्वर्य भोगीन, हा आढ्याचा अनुभव. पूर्वीं धर्म केला नाहीं म्हणून दरिद्री जाहलों; आतांही मी दान न देईन तर पुढें हीच गती होईल, हा दरिद्री याचा अनुभव. पूर्वीं सत्कर्मे केलीं, त्या योगें ही कर्मनिष्ठा जडली; आतांही तशीच केली तर स्वर्ग मिळेल, हा कर्मनिष्ठाचा अनुभव. पूर्वीं ईश्वराराधन केलें त्या योगें ही भक्ति जडली; आतांही तसेंच घडेल तर सरूपता मिळेल, हा भक्तानुभव. एवं, दर जन्मीं अध्यस्त देहाचा मात्र नाश होतो. पण कालत्रयीं मी आहें हें तर सर्व लोकांच्या अनुभवानें सिद्ध होतें. पुन्हां असें पहा कीं, मी येथें आहें हा सशरीर तर, हें शरीर कशानें आलें ? कर्मानें आलें. तें कर्म माझें, कीं अन्याचें ? अन्याचें कर्म, अन्याला

---

१ धनिक.

फल देणार नाहीं. ज्याचें त्यालाच फल देईल. तेव्हां तें माझेंच कर्म; तर तें, या जन्मीं केलेलें कीं पूर्वजन्मीं? या जन्मीं केल्यानें हा देह कसा होईल? तेव्हां तें कर्म पूर्वजन्माचेंच असलें पाहिजे. पूर्वजन्मीं कर्म कर्ते वेळीं मी सशरीरी होतों कीं अशरीरी? शरीर नसतां कर्म घडणार नाहीं. तेव्हां सशरीर होतों. तर तें शरीर कशानें आलें? त्याचे पूर्वजन्मीच्या कर्मानें. एवं पुनः पुनः विचार केला तर पूर्वकालीं कर्म व देहप्रवाह यांचा अंत नाहीं. त्यापेक्षां त्या दोहोंना अनुभवणारा आत्मा सद्रूप सिद्ध जाहला. पूर्वीं श्रवणादि न केलें म्हणून हें जन्म झालें. आतांही न करीन तर पुढें क्रियमाणानें पुनः जन्म होईल, व याप्रमाणें कितीही कल्प लोटले तरी पुनः पुनः जन्ममरण चुकणार नाहीं. ज्ञानानें मात्र कर्मक्षय जाहला तर पुढें जन्म होणार नाहीं. तोंपर्यंत आत्मा सृष्टि-प्रलय अनुभवून पापानें तिर्यग्लोक, पुण्यानें देवलोक अनुभवून राहील, नष्ट होणार नाहीं, हा भविष्य कालानुभव. तेव्हां ज्ञान न होतां किती कल्प लोटले तरी जन्ममरण चुकणार नाहीं. याप्रमाणें कालत्रयीं आत्म्याला अबाधितत्व आहे. म्हणून त्याचे ठिकाणीं सद्रूपत्व सिद्ध जहालें. सृष्टिप्रलय देहाला घडतात. आत्मा तर अज, अविनाशी आहे, हें सद्रूप. स्वयंप्रकाश तेंच चिद्रूप. आत्मा गाढांधकारामध्यें सूर्यादिकांची गरज न ठेवितां स्वयं प्रकाशमान असून स्वारोपित देहाद्यवस्था स्वयमेव जाणतो म्हणून सर्वज्ञत्वामुळें चिद्रूप जाणावा.

**शिष्यः**—आम्हाला सर्व ज्ञान कोठें आहे?

**गुरु**:—बाह्य, आंतर असा हा दोन प्रकारचा प्रपंच आम्ही अनेक प्रमाणानें जाणतों तो असा. हीं पंचभूतें, हीं पंचीकृत भूतें, हे विषय, हीं चतुर्विध शरीरें, हें ब्रह्मांड इत्यादि विविध नामरूप-गुणकर्मशक्त्याश्रय हा बाह्यप्रपंच प्रत्यक्ष प्रमाणानें आम्ही जाणतों, पण तो आम्हांस जाणत नाहीं. हीं तीन शरीरें, हे पांच कोश, तीन करणें, या षडूर्मी, हे रागादि, हीं प्राणेंद्रियान्तःकरणें, हे तीन अभिमानी, हे गुण, हें सुखदुःख इत्यादि हा आंतर प्रपंच आम्ही जाणतों, पण तो आम्हांस जाणत नाहीं. कारण, आत्मा चिद्रूप आहे. याला कोण जाणील ?

**शिष्य**:—मन जाणणार नाहीं काय ?

**गुरु**:—उत्पत्ति, विनाश, संकल्प, विकल्प, स्मृति, विस्मृति-युक्त हें मन घटासारखें जड आहे; तें आत्म्याला कसें जाणेल ?

**शिष्य**:—तर ( मनानें जाणावें ) या श्रुतीचें तात्पर्य काय ?

**गुरु**:—अग्नीची आंच दिली असतां मलिन सोन्यावर प्रकाश येतो तो सोन्याच्या अंगचाच होता. पण ज्या मलानें झांकला होता, तो मळ जातांच दिसूं लागतो. अग्नीनें संपादन केला असें नाहीं. अग्नीनें संपादन केला म्हणावें तर घटावर सुद्धां अग्नीनें सोन्याप्रमाणें प्रकाश आणावा, पण तसें होत नाहीं; म्हणून या उदाहरणानें असें जाणावें कीं, आत्मप्रतिबिंबसहित आत्माकार परिणत जाहलेलें मन आत्मस्वरूपावरचें मिथ्या ज्ञान दूर करतें. मग आत्मा स्वयमेव भासतो असें जाणावें. नाहींतर ( चक्षु, वाक्, मन हीं आत्म-स्वरूपीं जात नाहींत. ) या श्रुतीला बाध येईल. समई, वात, तेल

आणि व्यापक कारणाग्नि अंधकार नाश करण्यास समर्थ होत नाहींत. तोच वर्तिसंबंधी अग्नि, दीपनामक पेटला म्हणजे स्वयें प्रकाशमान असून अंधकार दूर करितो व समई, तेल, वात वगैरे पदार्थांना दाखवितो. तसा समईरूप देहामध्यें श्रवणादि कर्मरूप तेलानें भिजलेल्या मनोरूप वातीला लागलेला आत्मरूप अग्नि ज्ञान-दीप नामक होत्साता, आवरक अज्ञानांधकार दूर करून आंत-बाहेर प्रकाश करितो. जसा दिवा स्वयें प्रकाशमान तसा चिद्रूप आत्मा आहे; म्हणून तो चिद्रूप जाणावा. निरुपाधिक, निरतिशय, असून नित्य असणारें जें सुख तो आनंद हें आत्मस्वरूप होय. स्रक्, चंदन आणि स्त्रीविषयादि भोगांपासून होणारें सोपाधिक साति-शयसुख अनित्य जाणावें. नित्यसुखानुभव सर्वांना झोपेंत येतो.

**शिष्य**:—झोपेंत दुःखनिवृत्ति मात्र भासते. तेथें सुखानुभव कोठें आहे ?

**गुरु**:—निजून उठलेला पुरुष मी एवढा वेळ सुखी होतों, असा अनुभव बोलतो, तेव्हां तेथें सुखच आहे. स्त्री, स्रक्, चंदनादि विषय उपाधि होत. यांपासून होणारें सुख तें सोपाधिक होय. झोपेंत तर यांपैकीं कांहींच उपाधि नाहीं; म्हणून तें सुख निरुपा-धिक जाणावें. मनुष्य, गंधर्व, पितर, कर्मदेव, देव इंद्र, बृहस्पति, ब्रह्मा व ब्रह्म यांचा उत्तरोत्तर आनंद शतपट आहे. तो ब्रह्मावांचून सातिशय. सर्वोत्तर ब्रह्मानंद मात्र. निरतिशयत्वाचें लक्षण निद्रा-नंदाला आहे. हा शय्यादिसाधन असो वा नसो, निजणाऱ्याला सर्व सुख सोडून निद्रानंद घेत असतां रूपवती स्त्री येऊन ढकलीत

असतांही तो निद्रानंद घेतो. भोजनादिकाकरितां बळेंच उठविल्यावरही नेत्र झांकून पुन्हां तो आनंद घेण्यास पहातो; तो आनंद निरतिशय होय. जाग्रत्स्वप्नांमध्यें तोच आनंद अनेक वृत्तींनीं फांकतो, म्हणून अनित्य भासतो. वृत्तींनीं आवरला जातो, म्हणून सोपाधिक, सातिशय, जाणावा.

**शिष्य**:—कारणरूप आनंदाला कार्यरूप वृत्ति कशा आवरतात ?

**गुरु**:—कार्यरूप मेघ कारणरूप सूर्याला झांकतो तशा वृत्ति मूढदृष्टीनें आनंदाला झांकतात, असें वाटतें. ज्ञानी तर सर्वत्र ब्रह्मानंदानुभवच घेतो, म्हणून त्या आनंदाला नित्यत्व आहे. एवं निरतिशय, नित्य, निरुपाधिक, आनंदरूप ब्रह्म होय. याप्रमाणें मी सच्चिदानंदरूपी आत्मा आहें असा श्रवण, मनन, निदिध्यासनानें अखंडैकरस, अपरोक्षानुभव घेतो तो जीवन्मुक्त जाणावा.

अकरावा अध्याय समाप्त.

---

## अध्याय बारावा

**शिष्य**:—सत्, चित्, आनंद हीं पदें भिन्नार्थ असून अखंडार्थ कसा ?

**गुरु**:—देशकालवस्तुपरिच्छेदरहित, तो अखंडार्थ. आकाशाला व्यापकत्व आहे म्हणून त्याला देशपरिच्छेद नाहीं. यासाठीं त्यावर ब्रह्मत्व येईल, तें वारण्यासाठीं कालपरिच्छेद सांगितला. आकाशाला उत्पत्ति, नाश आहे म्हणून त्याला कालपरिच्छेद आहे.

कालाला देशपरिच्छेद नाहीं व ( आपल्यानें आपलाच परिच्छेद नाहीं म्हणून ) कालपरिच्छेद नाहीं. तेव्हां त्यावर ब्रह्मत्व येईल, यासाठीं वस्तुपरिच्छेद सांगितला. कालाचीही प्रपंचांत गणना आहे. त्याहून वेगळें आत्मवस्तु त्रिविधपरिच्छेदरहित आहे.

**शिष्यः**—मी गुजराथेंत आहें, कोंकणांत नाहीं, हा देशपरिच्छेद जाहला. मी आनंदसंवत्सरांत जाहलों, शार्वरीसंवत्सरांत मरेन, हा कालपरिच्छेद. मी ब्राह्मण, स्वामी आहें, क्षत्रिय नव्हे, हा वस्तुपरिच्छेद जाहला. मग त्रिविध परिच्छेदराहित्य कसें ?

**गुरुः**—अरे मूढा, भलतीच शंका करतोस ? तर तूं शिष्य आहेस कीं प्रतिवादी ? जर शिष्य असशील तर दयेनें पुनः अनुग्रह करूं. प्रतिवादी असशील तर क्षमेनें उगाच राहूं किंवा शाप देऊं. शापानें काय होईल म्हणशील तर शिष्यावर अनुग्रह केलेला सफल होतो, तर मग वादिनिग्रहार्थ शाप निष्फल होईल काय ? निग्रहानुग्रहसमर्थ ज्ञानी ईश्वराभिन्न आहे.

**शिष्यः**—क्षमा असावी. मी कृपा-पात्र आपला शिष्य आहें.

**गुरुः**—तर ऐक. हे तीन परिच्छेद देहाला आहेत. आत्मा तर देहाहून निराळा, सद्रूपी, व्यापक आहे तो असा. घटः सन् ( घट आहे ) पटः सन् ( पट आहे ) इत्यादि सर्व भूत, भौतिक पदार्थांना सत्ता आहे म्हणून आत्मा सर्वदेशी व्यापक जाहला. त्याला देशपरिच्छेद नाहीं. पूर्वोक्त प्रकारानें कालत्रयींही अबाधित आहे म्हणून कालपरिच्छेद नाहीं. सजातीय, विजातीय, स्वगतभेदभिन्न तीन वस्तु. वृक्षाहून अन्य वृक्ष हा सजातीय भेद. वृक्ष आणि पाषाण हा

विजातीय भेद. वृक्षाला पत्र, पुष्प, फलादि हा स्वगत भेद. हे तिन्ही भेद आत्मरूपीं नाहींत. म्हणून आत्मवस्तु परिच्छेदरहित. याप्रमाणें आत्मा त्रिविधपरिच्छेदरहित सिद्ध जाहला.

**शिष्यः**—ब्रह्मचैतन्य, ईश्वरचैतन्य, कूटस्थचैतन्य, जीवचैतन्य असे चार भेद दिसतात; हा सजातीय भेद १ आत्मा (ब्रह्म), अनात्मा (प्रपंच), हा विजातीयभेद २ ब्रह्माला सच्चिदानंदत्व आहे, हा स्वगतभेद ३. असे तीन भेद असतां त्रिविध परिच्छेद-रहित आत्मा कसा ?

**गुरुः**—जलाकाश, महाकाश, घटाकाश, अभ्राकाश असे एकाच आकाशाचे उपाधीनें भेद दिसतात; तसे मायोपाधीनें ब्रह्म, ईश्वर; अविद्योपाधीनें कूटस्थ, जीव; हे भेद दिसतात. ते वास्तविक नव्हेत. म्हणून सजातीय भेद नाहींत. जसा रज्जूवांचून सर्प नाहीं तसा ब्रह्मावांचून प्रपंच नाहीं. जें अध्यस्त[1] तें मिथ्या, म्हणून विजातीयभेद नाहीं. आत्मा, साक्षी, कूटस्थ, हे जसे पर्याय तसेच सत्, चित्, आनंद हे निरंश आत्म्याचे पर्याय होत. म्हणून स्वगतभेद नाहीं.

**शिष्यः**—सत्, चित्, आनंद, एकार्थ आहेत, तर कर, पाणि हस्तवत् पुनरुक्तिदोष होय. आणि भिन्नार्थ आहेत तर भेद कां नसावा ?

---

१ आरोपित.

**गुरु:**—जसा वृक्ष एकदेशीं पत्ररूपी, एकदेशीं पुष्परूपी, एकदेशीं फलरूपी असतो, तसा आत्मा नाहीं. रक्तोष्णप्रकाश दीपवत् सर्वांशीं अखंडार्थत्वें सच्चिदानंदरूपच आहे. दुसरें असें, आत्मनिष्ठ सत्त्व अनित्य जगावर, चित्त्व जड बुद्धीवर, आनंदत्व दुःखरूपी भार्यादिकांवर आरोपून त्यावरचे असज्जडदुःखित्व आपल्यावर घेऊन जग सत्य आहे, बुद्धींद्रियें चेतन आहेत, भार्यादि आनंददायक आहेत असें कित्येक मानितात. त्यांचा भ्रम दूर होण्याकरितां श्रुति म्हणते कीं हे जीवहो, आत्मा सद्रूप आहे, अनृतरूप नव्हे; चिद्रूप आहे, जडरूप नव्हे; आनंदरूप आहे, दुःखरूप नव्हे. याप्रमाणें भ्रांति जाण्याकरितां तीन पदांनीं बोध करिते व कित्येक वादी सत्त्व हा आत्म्याचा धर्म, चिदानंदत्व हा गुण मानून आत्मा द्रव्य आहे, असें म्हणतात. तन्निवारणार्थ ( निराकरणार्थ ) सच्चिदानंदपदानें श्रुति अखंडार्थ प्रतिपादितात. कारण, सर्व श्रुतींचे उपक्रमादिलिंगांनीं अखंडार्थी तात्पर्य आहे. युक्तीनें पाहिलें तर सत् स्वतः प्रकाशित होतें कीं अन्यानें प्रकाशित होतें? स्वतः प्रकाशित होतें म्हटलें तर, सत् चित् जाहलें. अन्यानें प्रकाशित होतें म्हणावें तर, सताहून दुसरें सत् अन्य, कीं असत् अन्य? असत् अन्य मानावें तर, तें शशशृंगाप्रमाणें नसणारें असत् कसें प्रकाशित करील? दुसरें सत् मानलें तर तें तरी कशानें प्रकाशित होतें? असा पुनः पुनः विचार केला तर आत्माश्रय, अन्योन्याश्रय, अनवस्था व चक्रिका[1]पत्ति, असे दोष येतील. तेव्हां

---

[1] एकतरेन्ही फिरणारा दोष.

अद्वितीय सत् स्वयमेव प्रकाशित होतें, अतएव तेंच चित् होय. हें सत्, व्यापकत्वानें सर्वत्र पूर्ण आहे, म्हणून तोच आनंद होय. कारण, आनंद हा भूम ( परिपूर्ण ) रूपींच राहतो. याप्रमाणें श्रुति, युक्तीवरून अखंडार्थ सिद्ध आहे. अनुभव पाहणें असेल तर निद्रानंद घेऊन उठलेला पुरुष मीं एवढा वेळ आनंद अनुभवला असें स्मरतो. तर अनुभवावांचून स्मरण होणार नाहीं. निद्रेमध्यें इंद्रियादिक लीन जाहल्यामुळें त्यावेळीं जरी आनंदसाक्षात्कार दिसला नाहीं तरी तो अनुभव स्मरणानें अनुमान करण्यायोग्य आहे.

**शिष्य**:——निद्रेमध्यें अज्ञान व आनंद दोन्ही असतात. यांतून स्वयंप्रकाश कोण ?

**गुरु**:——अज्ञानाला आवरण रूप आहे. तें कसा प्रकाश करील? तेव्हां आनंद स्वयंप्रकाश असून अज्ञानाला दाखवितो, म्हणून तोही चिद्रूप आहे; व चिताला सत्त्व आहे हें तर पूर्वींच प्रतिपादन केलें; तेव्हां श्रुति, युक्ति अनुभवेंकरून सजातीय, विजातीय, स्वगतभेदरहित असून देशकाल-वस्तु-परिच्छेदहीन सच्चिदानंदरूप आत्मा अखंड आहे हें सिद्ध जाहलें. त्या आत्म्याला येणारें दुःख अगांतुक व त्याला जन्मकर्मादि कारणें चवथ्या अध्यायांत सांगितलीं व त्यांचा नाशही सहाव्या अध्यायांत सांगितला. या प्रमाणें श्रवणानें, मी देहेंद्रियांहून वेगळा आत्मा आहें, असें जें ईश्वरोपासनेनें व श्रीगुरूच्या उपासनेनें अनुग्रहानें होणारें ज्ञान, तें परोक्ष ज्ञान जाणावें. पुढें त्याचेंच मनन, निदिध्यासन होतां होतां साक्षात्कार होतो तें अपरोक्ष ज्ञान होय. हें ज्याला जाहलें तो कृतकृत्य होऊन नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सत्य,

परमानंदाद्वयरूप जाहला असें जाणावें. हें ज्ञान ज्याला प्राप्त जाहलें तो चांडाळ असो अथवा द्विज असो ( सःगुरुरित्येषा मनीषा मम ) याप्रमाणें भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्यवचनानें कुटीचक, बहूदक, हंस, परमहंस, संन्याश्याहून तो अधिक पूज्य आहे. त्याचे योगानें कुल पावन होतें, कृतार्थ होतें. विशेष काय सांगावें? पृथ्वी सुद्धां त्याचे चरणस्पर्शानें पवित्र होते. त्याचा वारा लागेल तोही कृतार्थ होईल. मग दर्शनादिकांचें फल काय वर्णन करावें? हा ज्ञानसमकाल मुक्तच जाहला. सर्पकंचुकवत् देहाचा प्रतिभास प्रारब्धक्षय करितो. तो देह काशींत पडो किंवा चांडाळवाड्यांत पडो, पुनः बद्धता नाहीं. तेव्हां शिष्या, तूं श्रवणादि करून या गतीला जा. यापुढें आणखी उपदेश राहिला नाहीं. हें ऐकून शिष्य गुरुचरणीं लीन जाहला.

बारावा अध्याय समाप्त.

प्राकृत मनन समाप्त



श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः ।

# आत्मचिन्तन.

हा स्थूल देह अन्नमय कोश आहे, कारण अन्नापासून झालेलें मातेचें रक्त व पित्याचें रेत यापासून विटाळांत उपजला आणि मळमूत्रादि विटाळानें भरला. याला नाना विकार आहेत म्हणून हा आत्मा नव्हे. यामुळेंच अविचारानें मीपणा व ममता होते ती सर्व खोटी. त्याप्रमाणेंच देह रोडला म्हणजे मी रोडलों इत्यादिक व्यवहारही खोटा. पायास कांटा लागला, थंड, ऊन कळतें तें देहचैतन्य नव्हे. देहाला ज्ञान असतें तर, मेलेला देह हायहुय करीत असता. तर तो जळाला असतांही, हालचाल करीत नाहीं. जिवंतपणीं कळतें तें या देहाच्या आंत असणारा लिंगदेह जो, त्यांतील अहंकार आहे. त्याचें व जीवात्म्याचें तादात्म्य म्हणजे एकरूप झालेल्या अहंकारानें देहाला व्यापिलें म्हणजे देह जड असतांही चेतनासारखा भासतो. त्यामुळें देहाला समजल्यासारखा भ्रम होतो. जसें नौकेंत बसून आपण जात असतां तीरावरचीं झाडें जातात असा भ्रम होतो तें सर्व खोटें, त्याप्रमाणें देहेंद्रियें, प्राण, मन, बुद्धि, चित्त, अहंकार हे चेतनसे वाटतात तो सर्व भ्रम खोटा, असा निश्चय झाला म्हणजे मी अमक्याचा व हें माझें इत्यादिक हें सर्व खोटें ठरतें व मी सर्वांचा साक्षी व सर्वांहून वेगळा आहें असा निश्चय होतो. मग हा पिंडस्थूलदेह व येथें होणारी जाग्रत् अवस्था व याचा अभिमानी विश्वसंज्ञक आणि ब्रह्मांडदेह विराट् व याचा

अभिमानी वैश्वानर हे सर्व नश्वर आणि मी साक्षिभूत आत्मा अविनाशी असा निर्धार करावा.

जसा हा तमोगुणाच्या द्रव्यशक्तीपासून स्थूलप्रपंच झाला तसा क्रियाशक्ति रजोगुणापासून पांच प्राण व पांच कर्मेंद्रियें आणि ज्ञानशक्ति सत्त्वगुणापासून पांच ज्ञानेंद्रियें व मन, बुद्धि, चित्त, अहंकार झाले. यापासून सूक्ष्मभूतरचित स्थूलदेहाचे आंत असणारा सूक्ष्मदेह म्हणजे लिंगदेह आहे; येथें स्वप्नावस्था आहे. याचा अभिमानी तैजस. यामध्यें तीन कोश आहेत. ते हे कीं—पांच प्राण व पांच कर्मेंद्रियें मिळून प्राणमय कोश होतो. भूक, तहान, बळ, देणें, घेणें, चालणें, बोलणें, रति, मलमूत्रोत्सर्ग हे सर्व धर्म प्राणाचेच आहेत. हे क्षुधापिपासादि धर्म आत्म्याचे मुळींच नव्हेत. तसेंच पांच ज्ञानेंद्रियें व मन मिळून मनोमय कोश होतो. संकल्प, विकल्प, काम, संशय, विपर्यय, दुःख, शोकादिक हे सर्व मनोमय कोशाचेच धर्म आहेत. या धर्मांचा आत्म्याला मुळींच स्पर्शसुद्धां होत नाहीं. तसेंच पांच ज्ञानेंद्रियें व बुद्धि मिळून विज्ञानमयकोश होतो. यामुळेंच कर्तृत्व, ऊहापोहादिक घडतें. हे धर्म विज्ञानमय कोशाचेच आहेत. आत्म्याचे नव्हेत. स्थूलदेह अधिष्ठान, अहंकार कर्ता, ज्ञानेंद्रियें पांच व कर्मेंद्रियें पांच व अंतःकरण हीं कर्मसाधनभूत करणें. पांच प्राणांच्या चेष्टा आणि नेत्रादि इंद्रियादिकांच्या सूर्यादि देवता या पाचांच्या योगानें कायिक, वाचिक, मानसिक अशीं तीन प्रकारचीं कर्में होतात. तीं पापपुण्यरूपी कर्में हीं मीं केलीं असें, आपण अकर्ता असतांही जीवात्मा आपल्यावर कर्तृत्व घेऊन बद्ध

होतो आणि जन्ममरणाच्या फेरींत पडून सुखदुःख भोगितो. या लिंगदेहाभिमानी जीवाचें नाम तैजस. लिंगदेहाचा वियोग होणें हेंच मरण जाणावें. लिंगदेहतादात्म्यानें, जीव स्वर्गवास, नरकवास, गर्भवास, बाल्यादि अवस्थांनीं होणारें दुःख भोगितो.

स्थूल आणि सूक्ष्म हे दोनही देह कार्यभूत आहेत. यांचें कारण अनिर्वचनीय अविद्या म्हणजे अज्ञान आहे. हाच कारणदेह. येथें निद्रावस्था. याचा अभिमानी प्राज्ञ नांवानें जीव जाणावा. या तीन देहांहून वेगळा जो त्याला प्रत्यगात्मा, साक्षी, कूटस्थ, असंग, पुरुष, त्वंपदलक्ष्य असें म्हणतात.

मुमुक्षूनें एकांतीं बसून, एकाग्र मन करून असें चिंतन करावें कीं–स्थूल, सूक्ष्म, कारण हे तीन देह व येथें होणाऱ्या जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति; यांचें कारण सत्त्व, रज, तमोगुण; व विश्व, तैजस, प्राज्ञ हे तीन देहाचे अभिमानी या सर्वांचा द्रष्टा, साक्षी, कूटस्थ, निर्विकार, प्रत्यगात्मा मी एकच आहें. हे सर्व गुणविकार मला लागत नाहींत. म्हणून मी असंग, अज, अजित, अविकारी, अजर, अमर, अनादि, अनंत, परिपूर्ण परब्रह्मरूपी, अकर्ता, अभोक्ता, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सत्यस्वभावाचा असून अत्यंत निर्मल आहें. मी निरामय आहें. मी अक्रिय आहें. मी सदैव मुक्त आहें. मी इंद्रियांच्या व मनाच्या गतीपलीकडचा आहें. माझा अंतपार नाहीं. मला भूतभौतिक संबंध नाहीं. असा मी एकच अद्वितीय आहें. याप्रमाणें निरंतर अशा शब्दानें निश्चय करणें हा शब्दानुविद्ध सविकल्प समाधि जाणावा. अंतःकरणांत ज्या ज्या कामक्रोधादि वृत्ति

उठतात त्या त्या वृत्तींचा द्रष्टा, साक्षी मीच आहें. जसा पाण्यावर वाऱ्यानें तरंग जिकडून उठतो तिकडे पाणी व जिकडे जातो तिकडे पाणी. तरंगांत व त्याच्या दोन्ही बाजूंस पाणीच असतें व वारा शांत झाल्यावर केवळ एकच पाणी असतें त्याप्रमाणें मायामय-वासनेनें ज्या ज्या वृत्ति उठतात त्यांच्या आंत, बाहेर, साक्षिभूत आत्माच आहे व वृत्ति शांत झाल्यावर केवळ एकच प्रत्यगात्मा असतो तोच मी. जाग्रत्स्वप्नांमध्यें जें द्वैत असतें तें ज्यावेळीं या साक्षीपणाच्या अभ्यासानें नष्ट होतें व निद्राही येत नाहीं त्या वेळीं जें सुख भासतें तोच आत्मानंद होय. त्याचा निरंतर अभ्यास ठेवावा; म्हणजे क्रमानें निर्विकल्पसमाधिसिद्धि होईल. समाधींतून उठल्यावरसुद्धां बाहेर जें जें मायिक नामरूपात्मक भूतभौतिक जड जग दिसतें त्याचें नामरूप टाकून सच्चिदानंदरूप तत्पदलक्ष्य ब्रह्म आहे तेंच मी व मी प्रत्यगभिन्न परमात्मा आहें, असें निरंतर चिंतन करावें. म्हणजे जन्ममरणादि अनर्थ निवारण करणारा प्रबोध होतो.

इति आत्मचिंतन समाप्त.

---

# नवीन मिळालेलीं कांहीं स्तोत्रें

## १ अथ मानसपूजा

ध्यायेत् सद्गुरुमासनं मणिमयं पाद्यं सुतीर्थोदकं ।
अर्घ्यं गंधसुमाल्यमाचमनकं गंगाजलैरर्पितं ॥
स्नानं पौरुषसूक्तरुद्रसलिलैः श्वेतांबरं भूषणं ।
मुक्ताशुक्तिसुवर्णचंदनमिदं श्वेतं सुपुष्पं वरं ॥ १ ॥
धूपं दीपकमाज्यवर्तिसहितं नैवेद्यकं सुंदरं ।
भक्ष्यं पंचविधं फलं बहुविधं तांबूलकं दक्षिणां ॥
कर्पूरं सुमनांजलिं भ्रमणकं पादांबुजे वंदनं ।
भक्त्या गायननृत्यनादरुचिरं राजोपचारादिकं ॥ २ ॥
सर्वं मानसकल्पितं सुखनिधे स्वीकृत्य सर्वेश्वर ।
मच्छोकं जहि बालके कुरु दयां मामुद्धराज्ञानतः ॥
माता त्वं च पिता सखा सुहृदपि स्वामी च त्वं मे गुरो ॥
क्षंतव्याः सकलापराधनिवहाः पूजानभिज्ञस्य मे ॥ ३ ॥
इति श्री प. प. वासुदेवानंदसरस्वतीविरचितं मानसपूजास्तोत्रं ॥

## २ अथ दत्तस्तोत्रम्

दुःस्वप्नदुःशकुनदुर्गतिदौर्मनस्य-
दुर्भिक्ष्यदुर्व्यसनदुस्सहदुर्यशांसि ॥

उत्पाततापविषभीतिमसद्ग्रहार्ति–
व्याधींश्च नाशयतु मे जगतामधीशः ।। १ ।।
यस्यास्ति माहुरे निद्रा निवासः सिंहपर्वते ।
भागीरथ्यां सदा स्नानं ध्यानं गंधर्वपत्तने ।। २ ।।
कुरुक्षेत्रे चाचमनं धूतपापेश्वरे तथा ।
विभूतिधारणं संध्या करहाटे श्रियः पुरे ।। ३ ।।
भिक्षा विठ्ठलपुर्यस्य सुगंधिद्रव्यधारणं ।
भुक्तिः सारपुरे सायं संध्या पश्चिमसागरे ।। ४ ।।
स एष भगवान् दत्तः सदा वसतु मे हृदि ।। ५ ।।

## ३ श्रीनवार्णमंत्रस्तोत्रम्

ऐंद्र्यादिशक्तिसहिता याजयन्महिषासुरं ।
ऱ्हींबीजजापिपुष्टां तां महाशक्तिं नमाम्यहं ।। १ ।।
क्लींबीजरुपिणीं देवीममरारिविनाशिनीं ।
चामुंडां मुंडदमनीं तुळजापुरवासिनीं ।। २ ।।
मुंडमालालसद्देहां मोहांधतमसापहां ।
डाकिन्यादिकृताभिघ्नीं प्रणमामि महामतिं ।। ३ ।।
यैर्यन्नाम सकृद्गीतं ते सर्वार्थयुजोभवन् ।
विच्च नित्यं विरागश्च यत आशु लभेन्नृणां ।। ४ ।।
चेतनारूपतो याऽऽस्ते सर्वभूतेषु तां भजे ।
प्रसीद देवि सततमपराधान् क्षमस्व मे ।। ५ ।।

---

१ सकृद् + गीतं.

## ४ श्रीअन्नपूर्णास्तोत्रम्

सर्वमंगलमांगल्ये सर्वमंगलरूपिणि ।
सर्वैश्वर्यप्रदे देवि अन्नपूर्णे नमोस्तु ते ॥ १ ॥
कराभ्यां या समादाय दर्वीं देवर्षिसंस्तुता ।
या स्थिता निजरक्षार्थमन्नपूर्णां नमामि तां ॥ २ ॥
सिद्धयो निधयश्चापि सर्वदा यद्वशे स्थिताः ॥
तां शंकरप्रियां देवीं सर्वकामदुधां भजे ॥ ३ ॥
अन्नपूर्णे सदापूर्णे शंकरप्राणवल्लभे ।
प्रसीद देवि कल्याणि मम कामान् प्रपूरय ॥ ४ ॥

## ५ अथ रेणुकास्तोत्रम्

वर्णा यस्यां प्रकाशंते वर्णेष्वेकैव या स्थिता ।
त्रिपुरा वर्णरूपा सा रेणुकैकैव नापरा ॥ १ ॥
सवर्णा वेदमाता सा सावित्री ब्रम्हरूपिणी ।
एकैव चित्कला देवी जगद्धात्री न चापरा ॥ २ ॥
एकमात्रैकवीरेशा साष्टपर्यायवाचका ।
ओंकारैकस्वरा ज्ञेया रेणुका ब्रम्हरूपिणी ॥ ३ ॥

## ६ अथ रेणुकास्तोत्रम्

या वन्हिकुंडाददितिर्निरेयाद्गंगा महासिद्धसुरर्षिपूज्या ।
या राममाताखिलविश्ववंद्या नमामि त्वां तामहमेकवीरां ॥ १ ॥
या देवमाता त्रिपदा पवित्रा या ब्रम्हविद्या हरिगर्भदेहा ।
वेदैरवेद्या सकलाघहंत्री तामेकवीरां शिरसा नमामि ॥ २ ॥

## ७ अथ देव्यपराधक्षमापनस्तोत्रम्

नमोस्तु ते देवि जगन्निवासे। सच्चिद्विलासे सुमनोज्ञहासे।
या सेवकाची परिसे विनंति। धरोनि कारुण्यलवासि चित्तीं ॥ १ ॥

ब्रम्हांड हे निर्मिसी तूं महेशी। चित्शक्ति तूं हेतु न केवि होशी।
उत्पत्तिरक्षाप्रलयादिहेतु। ती तूं करी हा मम पूर्ण हेतु ॥ २ ॥

उपासना नित्य तुझी घडावी। त्वत्पादभक्ति हृदयीं जडावी।
मुखीं तुझें नाम वसो सदैव। जे शीघ्र वारी भजतां कुदैव ॥ ३ ॥

मी पापि आहें जरि कां कुबुद्धि। तरी मला देउनी तूं सुबुद्धि।
बुद्धिप्रकाशे मज तारि ईशे। धीशे शिरीं हस्त धरीं त्र्यधीशे ॥ ४ ॥

पापत्रया तूं निववी भवानि। तापत्रया तूं शमवी मृडानि।
शर्वाणि शर्वार्ति हरी सदैव। रुद्राणि माझें शमवी कुदैव ॥ ५ ॥

रुद्राणि हृद्रोग हरी अशेष। शर्वाणि आपत्ति हरी अशेष।
दारिद्र्यदु:खौघ भया निवारी। अरिष्ट वारोनि अमित्र मारी ॥ ६ ॥

वारी उमे दुर्व्यसना सनातनि। तारी भवाब्धीतुनी तूं चिरंतनी।
कुसंग वारी मज देई सन्मति। सुसंगयोगें मज देइ सद्गति ॥ ७ ॥

न लाभ मागे न विजया मी मागे। न उत्कर्ष मागे न सुकीर्ति मागे।
मागे तुझें पाद हृदयीं असावे। त्वत्पादिं मच्चित्त सदा वसावे ॥ ८ ॥

कृपाकटाक्षें पाहतां न तोटा। तुझा मला होइल लाभ मोठा।
तेव्हां कृपादृष्टिलवे शिवे तूं। मला निरीक्षी हरी जन्महेतु ॥ ९ ॥

## श्री हनूमदष्टोत्तरशतनामस्तोत्रम्

हनुमानंजनीसूनुर्वायुपुत्रो महाबलः ।
महापराक्रमो वीरः शूरो राक्षसनाशनः ॥ १ ॥
भीमनेत्रो भीमदंष्ट्रो भीमगात्रो भयांतकः ।
रामप्रियो रामदासो रामेष्टो रामसंमतः ॥ २ ॥
रामकार्यदृढोद्योगी रामध्यानपरायणः ।
रामश्लिष्टो रामरतो रामाहीनो रमाप्रियः ॥ ३ ॥
जानकीशोकशमन उदधिक्रमणो बली ।
सिंहिकाप्राणहृत् जेता सुदृढांगो मनोजवः ॥ ४ ॥
सुरसावंचको बुद्धो मैनाकनगमानदः ।
कलविंकप्रमाणांगो रक्तास्यः कनकद्युतिः ॥ ५ ॥
वज्रगात्रो दीर्घहनुर्दीर्घपुच्छः सुदीर्घदृक् ।
सीताल्हादप्रदो धीमान् रावणोद्यानभंजकः ॥ ६ ॥
अक्षघ्नो राक्षसघ्नोऽरिबलहा वज्रविग्रहः ।
ब्रम्हास्त्रमानदो ब्रम्हगुप्तो ब्राम्हणवल्लभः ॥ ७ ॥
दशास्यबोधको दक्षो धीरो लंकाविदाहकः ।
दक्षिणो दक्षिणाशास्यः सीतावार्ताहरः सुधीः ॥ ८ ॥
पर्वतोत्पाटनपटुः पर्वताब्जो विशोधिजित् ।
दशास्यगर्वहृद् दाता द्रोणाचलशिरा वरः ॥ ९ ॥
ब्रम्हचारी ब्रम्हवादी ब्राम्हणेष्टो दिगंबरः ।
स्मर्तृगामी जितक्रोधी जितचित्तो जितेंद्रियः ॥ १० ॥

क्षिप्रप्रसादकृद् योगी योगमार्गप्रवर्तकः ।
योगिवंद्यो योगिगम्यः कपिः कपिकुलर्षभः ॥११॥
वनवासी वनिप्रेष्ठो वंद्यो वनचरप्रियः ।
फलभक्षः पत्रभक्षो निराशीर्निष्प्रतिग्रहः ॥१२॥
निस्त्रपो निश्चलमना निश्चितो निर्विकल्पकः ।
रामदूतो रामसखो महारुद्रो महाजवः ॥१३॥
स्वच्छंदविग्रहः स्वच्छः स्वराट् स्वजनवल्लभः ।
नित्यतृप्तो विशोको, ज्ञो, ज्ञानदो ज्ञानिसेवितः ॥१४॥
कीशाधीशश्चिरंजीवी लक्ष्मणत्राणकारणः ।
श्वेतवाहस्यंदनाग्रध्वजस्तंभकृतासनः ॥१५॥
इति श्रीमारुतेर्नाम्नां दिव्यमष्टोत्तरं शतं ॥
यः पठेत् प्रयतस्तस्मै कपिर्दास्यत्यभीप्सितम् ॥१६॥

---

# श्री प. प. नृसिंहसरस्वतीदीक्षितस्वामीमहाराज कृतस्तोत्रादिसंग्रहः

---

## १ अथ अमरापुरस्थं श्रीअमरेश्वदेवतादिध्यानम्

वन्दे परब्रम्हलिङ्गममरेशं दिगम्बरम् ।
दत्तात्रेयं गणेशं चान्नपूर्णां योगिनीयुताम् ॥ १ ॥
श्रीपादश्रीवल्लभं श्रीनरसिंहसरस्वतीम् ।
श्रीगुरुं वासुदेवं च पादुकारूपिणं सदा ॥ २ ॥
नारदादियोगिवृन्दसुरर्ष्यादिनमस्कृतम् ।
सनकादिसुनंदादिब्रम्हविष्णुसमन्वितम् ॥ ३ ॥
नन्दीभृङ्गीरिटिगणपार्षदैः परिवेष्टितम् ।
सोमं सस्कन्दगाणेशं गङ्गाचन्द्रार्धशेखरम् ॥ ४ ॥
सिद्धसाध्यादिगन्धर्वाप्सरोभिरुरगैर्वृतम् ।
एवं ध्यात्वामरेशं च पूजयेच्छान्तविग्रहम् ॥ ५ ॥

इति ध्यानम् । ततः पूजा कार्या ।

त्रिकालेऽप्येवम् ।

## २ ध्यानं द्वितीयम्

वन्दे परब्रम्हलिङ्गमन्नपूर्णामरेश्वरम् ।
षड्वक्त्रगजवक्त्रांकयोगिनीनन्दिसेवितम् ॥ १ ॥

पञ्चवक्त्रं दशभुजं भुजगाभरणं हरम् ।
प्रसन्नं भक्तवरदं सर्वदेवर्षिपूजितम् ॥ २ ॥
पूर्णानन्दवराभीतिकरं भूतिविभूषणम् ।
कर्पूराभं दयापूर्णं भालाक्षं सर्वहृत्स्थितम् ॥ ३ ॥
गङ्गाधरं शशिधरं हिमाद्रिवसतिस्थलम् ।
ध्यायेन्नित्यं महेशानमुमादेहार्धधारिणम् ॥ ४ ॥
वन्दे विष्णुं तथा शम्भुं वन्दे लोकपितामहम् ।
शुक्लेश्वरं चामरेशं वन्दे श्रीसङ्गमेश्वरम् ॥ ५ ॥
सर्वेशं विश्वनाथं च वन्दे विघ्नेश्वरं तथा ।
वन्देहं जगदम्बान्नपूर्णां श्रीयोगिनीस्तथा ॥ ६ ॥
वन्दे श्रीरेणुकालक्ष्मीकृष्णावेणीसरिद्वराम् ।
गङ्गां च पञ्चगङ्गां च श्रीगुरुं यतिरूपिणम् ॥ ७ ॥
श्रीपादश्रीवल्लभं श्रीनरसिंहसरस्वतीम् ।
दत्तात्रेयं सदा वन्दे पादुकात्रयरूपिणम् ॥ ८ ॥
इन्द्रादिसर्वदेवानां वरदं स्वपदार्थिनाम् ।
योगीन्द्रनारदादीनां भक्तिज्ञानप्रदं गुरुम् ।
शरण्यं करुणापूर्णं प्रसन्नममरेश्वरम् ॥ ९ ॥

## ३ अथ श्रीगुरुपरम्परा

श्रीगुरुं वासुदेवं च नारायणगुरुं परम् ।
परमेष्ठ्यनिरुद्धं परात्परं गुरुमच्युतम् ॥ १ ॥

## ४ श्रीदत्तश्रीपादश्रीनृसिंहसरस्वतीस्तोत्रम्

अनसूयात्रिराजासुमत्यम्बामाधवात्मजः ।
श्रीदत्तात्रेयः श्रीपादश्रीनृसिंहसरस्वती ॥ १ ॥
मार्गे पूर्णायां च भाद्रे चतुर्थ्यां मासि पौषके ।
द्वितीयायां शुक्लपक्षे मध्यान्हे प्रदोषे बुधवासरे ॥ २ ॥

श्रीदत्तगुरुभ्यो नमः

## ५ प्रातःस्मरणं

उत्तिष्ठोत्तिष्ठ देवेश उत्तिष्ठ गरुडध्वज ।
उत्तिष्ठ कमलाकान्त त्रैलोक्यं मङ्गलं कुरु ॥ १ ॥
ब्राम्हे मुहूर्ते चोत्थाय चिन्तयेदात्मनो हितम् ।
स्मरणं वासुदेवस्य कुर्यात् कलिमलापहम् ॥ २ ॥
सुप्तः प्रबोधितो विष्णो हृषीकेशेन यत्त्वया ।
यद्यत्कारयसे कर्म तत्करोमि तवाज्ञया ॥ ३ ॥

जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः
जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः ।
केनापि देवेन हृदि स्थितेन
यथा नियुक्तोस्मि तथा करोमि ॥ ४ ॥

समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डले ।
विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ॥ ५ ॥

इति प्रातःस्मरणम्

## ६ अथ मानसिकस्नानम्

इडा भगवती गङ्गा पिङ्गला यमुनानदी ।
तयोर्मध्यगता नाडी सुषुम्नाख्या सरस्वती ॥ १ ॥

ध्यानप्रदे ज्ञानजलरागद्वेषमलापहे ।
यः स्नाति मानसे तीर्थे स वै मुक्तो न संशयः ॥ २ ॥

## ७ श्रीगुरुदत्तात्रेयस्तोत्रम्

वन्दे श्रीसद्गुरुं दत्तं माधीशं साक्षिणं शिवम् ।
स्मर्तृगामिदयासिन्धुं भक्ताभीष्टवरप्रदम् ॥ १ ॥

दत्तात्रेयं देवदेवं देवर्षिगणसंस्तुतम् ।
वेदवेदशिरोगम्यं भक्तिगम्यं नमामि तम् ॥ २ ॥

इन्द्रादिदेवसङ्घैश्च स्वपदप्राप्तये सदा ।
बहुकालं सेवितं यत्पदं दत्तं नमामि तम् ॥ ३ ॥

यत्पादसेवया लब्धमैश्वर्यमतुलं बलम् ।
कृपादृष्ट्या ज्ञानयोगं दत्तं दत्तं नमामि तम् ॥ ४ ॥

यदर्थमवतारोभून्नारसिंहः स्वयं हरिः ।
प्रल्हादभक्तप्रवरविद्दं दत्तं नमामि तम् ॥ ५ ॥

मदालसागर्भरत्नालर्कं वन्दनमात्रतः ।
ज्ञानं विज्ञानसहितं दत्तं दत्तं नमामि तम् ॥ ६ ॥

यस्य वंशे वेदवेदोपनिषत्संस्तुतं पदम् ।
कृष्णं तं यदुं दत्तबोधं दत्तं नमामि तम् ॥ ७ ॥

सोमकान्तायुसाध्येभ्यः सत्कर्मतत्रसाधनम् ।
विष्णुदत्ताय मंत्रांश्च दत्तं दत्तं नमामि तम् ।। ८ ।।
श्रीशकला सकलाम्बा जगदम्बारेणुकासुतो रामः ।
कश्यपदत्तरसेन स्तुतनुतगुरुदत्तपादुकां वन्दे ।। ९ ।।
नवयोगीन्द्रनाथान्तं योगं ज्ञानं ससाधनम् ।
कृपादृष्टयार्पयत्तं गुरुदत्तं नमामि वै ।।१०।।
मुक्तानिवृत्तिज्ञानेशसोपानगुरुसद्गुरुम् ।
श्रीमद्दत्तं चादिनाथं ( मन्नाथं ) बोधदं तत्पदं नुमः।।११।।
प्रल्हादो दत्तभक्तस्तूद्धवो जातो हरेर्मुखात् ।
श्रुत्वा चावधूतगुरोः कथां तद्भक्तिमानभूत् ।।१२।।
कलौ सोऽवातरन्नामदेवः प्रेष्ठतमो हरेः ।
प्रतिज्ञाभंगपूर्णार्थं तुकारामः सतां पतिः ।।१३।।
धर्मसेतुं दृढीकर्तुं भक्तिसन्मार्गबोधदम् ।
योगीशं राममाश्रित्य रामदासोऽभवद्धरिः ।।१४।।
नवभक्तिरसं दासबोधदासं नमाम्यहम् ।
श्रीदत्तशिष्यसद्रामदासपंचक ते नमः ।।१५।।
जयरामानंद रामदास रंगेश केशव ।
रामनारायणेट् गोविंदेश देशिक ते नमः ।।१६।।
रामनारायणेट् गोविंदेश गोपाल ते नमः ।
मौनीब्रम्हान्नपूर्णायुक्कृष्णापंचयुतीट् नमः ।।१७।।
स्वारिनिर्जितदेवेन्द्रामरवृन्दसुसेवितम् ।
चतुःषष्टियोगिनीयुक् चामरेश्वर ते नमः ।।१८।।

## ८ श्रीनृसिंहवाटिकावर्णनम्

श्रीरामचन्द्रयोगीशो नारायणयतीश्वरः ।
गोविन्दयतिधीदीपः काशीगोपालरक्षकः ॥ १ ॥
गरुडध्वजलक्ष्मीशो भामाविठ्ठलरुक्मिणी ।
मौनीब्रम्हानन्दयतिराजो दत्तगुरो सदा ॥ २ ॥
देवभक्तवृन्दयुक्तोऽमरपुर्यमरेश्वरः ।
क्रीडत्यत्रस्थतीर्थेषु द्वादशेषु च सर्वदा ॥ ३ ॥
किं वर्ण्यतेत्र महिमा मनोवाचामगोचरः ।
श्रीसद्गुरुर्दत्तदेवः स्वयं जानाति नेतरः ॥ ४ ॥

## ९ श्रीनामदेवस्तोत्रम्

अयोनिसम्भवो नामदेवो देवप्रियोत्तमः ।
यद्भक्तिप्रीतिवशगो वैकुण्ठाधीशविठ्ठलः ॥ १ ॥
यच्छुक्तिजन्म मुक्तानां स्वातिरिक्तं न चान्यथा ।
तथैव मुक्तभक्तानां स्वातिरिक्तं न चान्यथा ॥ २ ॥
नामदेवस्य संप्रीत्यै वापी पूर्णोदका कृता ।
पीतं येन पयः साक्षाद् भक्तभक्तिप्रियं नुमः ॥ ३ ॥
सन्मुक्ताः श्रीमतां गेहे गृहिणीतनुसंस्थिताः ।
मुक्तभक्तास्तु भगवत्पादाब्जे हृत्तनुस्थिताः ॥ ४ ॥
मुक्ताः श्रीमभ्दूषणं हि भक्ता हृभ्दूषणं हरेः ।
मुक्ताः समुद्रसंजाताः भक्ताः समुद्रसंगताः ॥ ५ ॥

को वदेद्भक्तमुक्तानां सारूप्यसमता तथा ।
भगवद्भूषणाढ्या ये तेभ्यो नित्यं नमो नमः ॥ ६ ॥
नामदेवो नामदेवो देवो नाम सनातनः ।
जीवन्मुक्तो मुक्तसङ्गो नामदेवं नमामि तम् ॥ ७ ॥

स्वात्मस्वरूपं हि गुरोः प्रसादात्
सन्दृश्यते सर्वगुहास्थितं स्वयम् ।
इत्थं जनान् बोधयितुं स्वयं हरिः
श्रीनामदेवो वृतवान् स्वतो गुरुम् ॥ १ ॥

## १० अथामरेश्वरदत्तगुरुस्तोत्रम्

देवेन्द्रः सामरगुरुः कृष्णावेणीसरित्तटे ।
स्वपदप्राप्तये लिङ्गममरेश्वरसंज्ञकम् ॥ १ ॥
पूजयामास तत्तीर्थे स्नात्वाब्दं भक्तिसंयुतः ।
अमरेश्वरप्रसादेन प्राप्तमैन्द्रपदं पुनः ॥ २ ॥
चतुःषष्टियोगिनीभिः सेवितं सततं पदम् ।
नमामि तं चामरेशं श्रीदत्तेन सुपूजितम् ॥ ३ ॥
यं दत्तं योगिनीवृन्दः श्रीगुरुं ह्यमरापुरम् ।
नीत्वा राजोपचारैः संपूज्य भिक्षां ददौ मुदा ॥ ४ ॥
गोतीर्थं शम्भुतीर्थं च पितृतीर्थं च गोपुरे ।
शुक्लं चामरतीर्थं च पापनाशं च काम्यके ॥ ५ ॥
सिद्धं वरदं तीर्थं कोटितीर्थं च शक्तिकम् ।
सङ्गमाग्र्यप्रयागं च षट्कूले सर्वतीर्थकम् ॥ ६ ॥

द्वादशैतानि तीर्थानि स्नात्वा भक्त्या सुभाविकः ।
अमरेश्वरं च संपूज्य देवत्वं प्राप्यतेऽब्दतः ॥ ७ ॥
अतः सर्वर्षिदेवर्षिदेववृन्दसुसेवितम् ।
अमरेश्वरं नमाम्याशु भक्तिदं मुक्तिदं मुदम् ॥ ८ ॥
दत्त वाङ्मनसातीत परब्रम्हस्वलिङ्गधृक् ।
सर्वदेवाधिदेवेश भोऽमरेश्वर ते नमः ॥ ९ ॥
अर्कतीर्थवरस्तोत्रममरेश्वरतोषकृत् ।
यः पठेद्धीमान् श्रीमान् नित्यं दत्तप्रियो भवेत् ॥१०॥

## ११ अथ विठ्ठलस्तोत्रम्

वन्दे श्रीरुक्मिणीकान्तं विठ्ठलं भक्तवत्सलम् ।
पुण्डलीकं सुवरदं तममुं सततं भजे ॥ १ ॥
नामदेवसुहृत्प्राणं वैकुण्ठाधीशविठ्ठलम् ।
ज्ञानदेवादिसत्पूज्यं तममुं सततं भजे ॥ २ ॥
नागभीट् प्राणदाता च पाण्डवानामभीष्टकृत् ।
तन्नामकं सुकमलं सरःकृद्विठ्ठलं नुमः ॥ ३ ॥
देवप्रीत्यै देवसरो निर्मितं सर्वपापहृत् ।
तममुं देवदेवेशं नागेशं विठ्ठलं नुमः ॥ ४ ॥
स स्वात्मजब्रम्हसुहृत्तमोग्रन्थिविभेदकृत् ।
विदा ज्ञानेन ठानज्ञान् लाति गृण्हाति तं नुमः ॥ ५ ॥
नागाः सर्पाः पर्वताश्च तेषां भीर्गरुडेन्द्रतः ।
तत्स्वामी भगवान् विष्णुर्विठ्ठलस्तं नमाम्यहम् ॥ ६ ॥

नागा निरपराधाश्च तद्भीहृत् ज्ञानदेश्वरः ।
तं नागभीड्वासुदेवं विठ्ठलं सततं नुमः ॥ ७ ॥
नागः शेषः पर्वतश्च गोवर्धनगिरिः प्रियौ ।
अतस्तौ भीषदौ यस्माद्विठ्ठलं तं नमाम्याहम् ॥ ८ ॥

इति श्रीविठ्ठलस्तोत्रं संपूर्णम्.

## १२ सर्वतीर्थस्तोत्रम्

वन्देहं सर्वतीर्थेशं सर्वदेवेशसेवितम् ।
श्रीकृष्णव्यासदुर्वासआचार्यादिसुसेवितम् ॥ १ ॥
श्रीदत्तनवयोगीन्द्रनाथेशगुरुसेवितम् ।
इन्द्रादिदेवैः सगणैः गणेशगुहसेवितम् ॥ २ ॥
श्रीगङ्गा यमुनायुक्ता गुप्ता यत्र सरस्वती ।
त्रिवेणीत्रिकुण्डात्मसर्वतीर्थं नमामि तत् ॥ ३ ॥
यन्नगाग्रे ज्ञानवापी चाम्बा निम्बातिसौख्यदा ।
यज्जीवनं सर्वरोगहरं तीर्थं नमामि तत् ॥ ४ ॥
पाण्डवैः स्वीकृतं यच्च यच्च पापाद्रिनाशनम् ।
सर्वानन्दप्रदं सिद्धसर्वतीर्थं नमामि तत् ॥ ५ ॥
साधुसिद्धमुनिश्रेष्ठाः सर्वतीर्थे वसन्ति हि ।
स्नानदानादिजं पुण्यं सदानन्त्याय कल्पते ॥ ६ ॥
आनन्दवाटिका सा कवडशीत्युच्यते जनैः ।
मार्गे मार्गे च सम्प्राप्तं सर्वतीर्थं नमाम्यहम् ॥ ७ ॥

वातात्मजं वानरयूथपाधिपम्
विश्वेश्वरं देवगणार्चितांघ्रिम् ।
गणेश्वरं विघ्नविनायकेशम्
नमामि भक्तप्रियविठ्ठलं हरिम् ॥ ८ ॥

## १३ नवयोगीन्द्रनाथस्तोत्रम्

वन्दे श्रीभगवद्रूपं कविं योगीन्द्रसंज्ञकम् ।
मच्छेन्द्रनाथं श्रीदत्तशिष्येन्द्रनवनाथकम् ॥ १ ॥
वन्देहं भगवद्रूपं हरिं गोरक्षसंज्ञकम् ।
नाथं द्वितीयं मच्छेन्द्रशिष्येन्द्रं द्वैतवर्जितम् ॥ २ ॥
वन्दे जालन्धरं नाथं योगीन्द्रं चान्तरिक्षकम् ।
तच्छिष्यं कानिफं वन्दे प्रबुद्धं बुद्धिनायकम ॥ ३ ॥
वन्देहं चर्पटीनाथं पिप्पलायनसंज्ञकम् ।
आविर्होत्रं च योगीन्द्रनागनाथं नमाम्यहम् ॥ ४ ॥
नमो भर्तरीनाथाय योगीन्द्रद्रुमिलाय च ।
नमो रेवणसिद्धाय चमसाय च योगिने ॥ ५ ॥
नमो गहिनीनाथाय करभाजनयोगिने ।
प्रणमामि श्रीनिवृत्तिनाथं ज्ञानेश्वरं तथा ॥ ६ ॥
सोपानं मुक्तिजननीं दत्तछात्रपरम्पराम् ।
वन्दे दत्तगुरुं वासुदेवं गुरुपरात्परम् ॥ ७ ॥
योगिराजावतारं तं योगज्ञानाब्धिनाविकम् ।
मूलप्रकृतिकविष्ण्वीशावतारा: पान्तु न: सदा ॥ ८ ॥

इति नवयोगीन्द्रस्तोत्रम्

